॥ श्री ॥

# संतवचनसुधा

अर्थात्

श्रीज्ञानेश्वर, निळोबा, एकनाथ, नामदेव, जनाबाई, तुकाराम, इत्यादि संतांच्या निवडक अभंगांचा संग्रह.

( अभंगांची सूची व कठीण शब्दांचा कोश यांसह )

प्रकाशक,
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
प्रिंटर्स, पब्लिशर्स, कमिशन एजंट्स इ. ठाकुरद्वार—मुंबई.

सन १९१७ इ.

किंमत १ रुपया.

# विषयानुक्रमणिका.

# संतवचनसुधा.

## मंगलाचरण.

(ज्ञानदेव.)

रूप पाहतां लोचनी । सुख झालें वो साजणी ॥
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥
बहुता सुकृताची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी ॥
सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥ १ ॥

(नामदेव.)

प्रथम नमूं गजवदनु । गौरीहराचा नंदनु ।
सकळ सुरवरांचा वंदनु । मूषकवाहनु नमियेला ॥
त्रिपुरावधीं गणाधिपति । हरें पूजिला भावें भक्ति ।
एकें बाणें त्रिपुर पाडिला क्षितीं । तें पशुपति संतापला ॥
इंद्रादिकीं अष्टलोकपाळीं । लंबोदरू पुजिला कनककमळीं ।
त्यांसी प्रसन्न झाला तयेवेळीं । म्हणवूनी सकळीं पूजियेला ॥
सटवें रात्रीं मदनु शंभरें नेला । प्रद्युम्न समुद्रामाजीं टाकिला ।
तैं कृष्णें विघ्नहरु पूजिला । प्रद्युम्न आला रतीसहित ॥
युधिष्ठिरें पुजिला चतुर्थी । राज्यप्राप्ति झाली तया ॥
म्हणवूनि सुरवरीं केली पूजा । त्रिभुवनीं आणिक नाहीं दुजा ।
विष्णुदास नामा म्हणे स्वामी माझा । भावें भजा एकदंता ॥ २ ॥

(तुकाराम.)

समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥
आणीक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥

ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित्त ह्मणी जडो देसी॥
तुका म्हणें ज्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥३॥

सदा माझे डोळां जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पति सोयरिया ॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देई मज प्रेम सर्व काळ ॥
विठो माउलिये हाचि वर देई । संचरोनि राहिं हृदयामाजीं ॥
तुका म्हणें कांहीं न मागे आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४॥

---

## श्रीहरिस्वरूपवर्णन.

( निवृत्ति. )

वैभव विलास नेणोनि सायास । कल्पनेची आस नाहीं जेथें ॥
तें रूप दुर्लभ कृष्णमूर्तिठसा । वोतल्या दशदिशा नंदाघरीं ॥
योगियाचें ध्यान मनाचें उन्मन । भक्ताचें जीवन गाई चारी ॥
निवृत्ति साकार ब्रह्मींचा प्रकार । ॐतत्सदाकार कृष्णलीला ॥५॥

निर्दोषरहित सर्वगुणी हेत । द्वैतविवर्जित अरूप सदा ॥
तें रूप स्वरूप कृष्णबाळलीला । माजि त्या गोपाळा सदा वसे ॥
गुणागुणीं धीट वासना अवीट । तद्रूप प्रगट निरंजन ॥
विकारविवर्जित विकरण सोपें । आकार पै लोपे एका नामें ॥
निःसंदेह छंद वासनेचा कंद । ब्रह्माकार भेद नाहीं नादा ॥
निवृत्ति परिवार ब्रह्मरूप गोकुळीं । वृंदावन पाळी यमुनातटीं ॥६॥

गोत वित्त चित्त गोतासी अचुक । चाळक पंचक तत्त्वसार ॥
तें रूप सादृश्य कृष्णनामें सोपें । नंदा यशोदा खोपें बाळलीला ॥
निरसूनि गुण उगवली खूण । गोकुळीं श्रीकृष्ण खेळे कैसा ॥
निवृत्तीचें सार कृष्णनामें पार । सर्व हा आचार हरी हरी ॥७॥

हरपली सत्ता मुराली वासना । सांवळाचि नयना दिसतसे ॥
काय करूं माय सांवळा श्रीकृष्ण। सांगितला प्रश्न निवृत्तीनें ॥

आपरखुमादेविवरु सांवळीये तेज। सेजबाज निज कृष्ण सुखें ॥
विश्वाद्य अनाद्य विश्वरूपें वंद्य। आणि हा अभेद्य भेद नाहीं ॥
तें रूप साजिरें नंदाचें गोजिरें। येशोदे निर्धारें प्रेममुख ॥
द्वारपती दिशा सृष्टीचा कडवसा। आपरूपें कैसा ओळलासे ॥
निवृत्तिसाधन वसुदेव खूण। गोपिकांचें धन कृष्ण माझा ॥८॥

ज्या रूपा कारणें वोळंगती सिद्धी। द्वारपती बुद्धी शास्त्राचिया ॥
तें रूप साजिरें गोकुळीं गोजिरें। यशोदे सोपारें कडिये शोभे ॥
न संठे त्रिभुवनीं नाकळे साधनीं। नंदाच्या अंगणीं खेळे हरी ॥
निवृत्ति निधडा रूप चहूंकडा। गोपाळ बागडा गोकुळीं वसे ॥९॥

हरीविण व्यर्थ आचार समर्थ। हरि हेंचि हीत, अरे जना ॥
तें रूप पंढरी पुंडरिकसंगें। एका नामें पांग पाश तोडी ॥
सर्व ब्रह्मार्पण कर्म करी जाण। वेदमतें खुण ऐसी असे ॥
निवृत्तीचा देव सर्व हा गोविंद। नाहीं भिन्न भेद विश्वीं इये॥१०॥

उघडें स्वरूप प्रत्यक्षाचे दीप। नाम घेतां पाप हरे, जना!॥
तें रूप विठ्ठल विनट सकळ। सेवा दिनकाल पंढरीयेसी ॥
रजतमें दुरी नामाची माधुरी। निशाणी एकसरी रामकृष्ण ॥
भवाब्धितारक नावाडा विवेक। पुंडलिक देख सेवितुसे ॥
विश्व हें तारिलें नामाचि पिकलें। केशवी रंगलें मन हेतु ॥
निवृत्ति विठ्ठल सेवितु सकळ। दिनकाळफळ आत्माराम ॥ ११ ॥

भवजळ काया पंचतत्वमाया। भजन उपाया पंढरीरावो ॥
तारक पंढरी प्रसिद्ध भीमातीरी। श्रीदें चराचरी बोले वेदु ॥
माया मोहजाळ ममता निखळ। सेवितां सकळ होय हरी ॥
वृत्तीचें फळ सकळ गोपाळ। तोडी मायाजाळ संकीर्तनें ॥ १२ ॥

नसे तो ब्रह्मांडीं नसे तो वैकुंठीं। दुजियाची गोष्टी नाहीं जेथें॥
तें रूप सुंदर देवकी-उदरीं। वसुदेवाघरीं कृष्ण माझा ॥

ब्रह्मांड-कडवा मनाचा ओणवा । साधितां राणिवा हारपती ॥
निवृत्ति सुंदर कृष्णरूप सेवी । गयनी गोसावी उपदेशिलें ॥ १३ ॥
वेदबीज साचें संमत श्रुतीचें । गुह्य त्या शास्त्रांचें हरि माझा ॥
तो हरि खेळत प्रत्यक्ष मूर्तीमंतु । द्रष्टा मुक्ति देतु जीवघाते ॥
अर्जुना सहकारी द्रौपदी कैवारी । तो विदुराचे घरीं अन्न मागे ॥
निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्ण । यादव सहिष्णु हरि माझा ॥१४॥

( एकनाथ. )

साक्षात्कार होतां । साच बद्धता नुरे तत्वतां ॥
माझा होतां अनुभव । कल्पनेसी नुरे ठाव ॥
माझे देखतां चरण । संसारचि नुरे जाण ॥
माझी भक्ति करितां । दोप नुरेचि सर्वथा ॥
सर्वाठायीं मी वसे । एका जनार्दनीं भेद नसे ॥ १५ ॥
आणुरेणुव्यापक विठ्ठल अवघा । काय म्हणावा दूर ॥
भक्तिभीमातीर भाव पुंडलीक । आत्मा विठ्ठल धूर ॥
विठ्ठल स्मरणीं विठ्ठल जाला । नाहीं, नाहीं, मना हुरहूर ॥
एका जनार्दन निजगुरू बोधें । भलते ठाई निसूर ॥ १६ ॥
न माये ध्यानीं योगीया चिंतनीं । नाचतो कीर्तनीं संतापुढें ॥
डोळियाची धणी फिटली पारणी । उभा तो सज्जनी पंढरीये ॥
एका जनार्दनीं देखियेला डोळां । परब्रह्म पुतळा बाईयेवो ॥१७॥
येथुनी पाहं तेथवरी । तंव तंव अवघा दिसे हरी ॥
आतां जाउनी कोठें पाहूं । जेथें पाहूं तेथें देवूं ॥
गिरीकपाटीं कंदरीं । जिकडे पाहे तिकडे हरी ॥
एका बैसला निरंजनीं । जनार्दन दिसे जनी वनीं ॥ १८ ॥
बरी ओळख झाली आतां । चित्त जडलें अच्युता ॥
आम्हां ईखू आला काळ । काळ झालासे कृपाळ ॥
नियमानियम सांडोनी दोन्ही । आम्ही रत हरिकीर्तनीं ॥

सर्वांभूतीं भगवद्भाव । भूतमात्रीं असे देव ॥
एका जनार्दनाचे पायीं । द्वैत भावचि उरला नाहीं ॥ १९ ॥

## नामसंकीर्तनमाहात्म्य.

( निवृत्ति. )

न जाणती कळा कुसरी गोपाळा । नाम हे मंगळा अच्युताचें ॥
हेंचि मज द्यावें सप्रेम आपुलें । ध्यातूसे पाउलें एवढ्यासाठीं ॥
न मागे नेणें कांहीं याविण आणिक । सप्रेमाची भूक तृष्णा करी॥
समर्थाचे घरीं कांहीं नाहीं उणें । अखंड प्रेम देणें कृष्णनामीं ॥
तुकेंची दातारा पुरवीं माझें कोड । यावीण काबाड भार नेघे॥
निवृत्ति सप्रेम संजीवनीमूळ । स्मरतां काळवेळ नाहीं नामीं ॥२०॥
भावभक्ति प्रेम दया शांति क्षमा । अखंडित प्रेमा असों द्यावा ॥
सर्वभूतीं भजन करावें सर्वथा । रामनाम कथा आरंभाव्या ॥
आपपर देहीं विचार करावा । हरिनामें दोहावा सर्वांरूपीं ॥
निवृत्तीचें जाप्य आनु नाहीं चित्तीं । रामनामें तृप्ती सदा असे॥२१॥
जनीं जनार्दन हाचि भावो दृढ । अवघेंचि गूढ नारीजना ॥
जड मूढ तरती हरिनामछंदें । एका नाम पदें वैकुंठस्था ॥
सत्वर उच्चार रामनाम चित्तीं । संसार-खंती नाहीं तथा ॥
निवृत्ति सत्पद इच्छित सर्वदा । भिन्नभेद कदा नाहीं चित्तीं ॥२२॥
शांतीचें भजन क्षमेचा कळवळा । गोपाळ सकळा देहीं नांदे ॥
आचार पवित्र नामचि पैं पात्र । सांठविलें अक्षर दों अक्षरीं ॥
रूपाचें सगुण निर्गुण दादलें । नामेंचि आटलें मोहजाळ ॥
निवृत्ति पडळ उडालें तें भान । गयनीनें ज्ञान उपदेशिलें ॥२३॥
परापवाद कानीं परनिंदा श्रवणीं । ऐकतां निजमौनी कृष्णजप ॥
हरी हरी म्हणे नायके ते मातु । द्वैत तया आंतु नेघे बापा ॥

दुजियाची निंदा अपवाद सदा । वाचेसि गोविंदा जप करी ॥
निवृत्ति तत्पर नाइके ते शब्द । नित्यता गोविंद जपतसे ॥ २४ ॥
परनिंदा ह्मणीं परपीडा जनीं । नित्यता कीर्तनीं हरि जपे ॥
उधार पापाचा विभाग ये त्याचा । वेगें हरि वाचा जपे त्या ॥
दुजिया पिंडणें द्वैत तेंचि जाण । अद्वैत ते खूण हरी एकू ॥
निवृत्ति तटाक सर्व कृष्ण एक । अद्वैत हे लेख ब्रह्म सत्य ॥ २५ ॥
सर्वभूतीं दया शांति पैं निर्धारी । तो योगी साचार जनीं इये ॥
नलगे मुंडणें काया हे दंडणें । अखंड कीर्तनें स्मरे हरी ॥
शिव जाणे जीवीं क्षरला चैतन्य । हें जीवीं कारुण्य सदाभावी ॥
गगनीं सूर्य तपे अनंत तारा लोपे । एकुचि स्वरूपें आत्मा तैसा ॥
उगवला काळीं उल्हासु कमळीं । तैसा तो मंडळीं चंद्र देखा ॥
निवृत्तिमंडळ अमृत सकळ । घेतलें रसाळ हरिनाम ॥ २६ ॥
उपरति मनाची साधन विदेही । तरिजेल बाही रामनामें ॥
हरिवीण सुटिजे ऐसें नाहीं बोलिलें । सर्वही शोधिलें शास्त्र आम्हीं
द्वैताची हे वाढी प्रपंचाच्या घरीं । अद्वैत कामारी भोगिजेसु ॥
निवृत्तीचें सार हरी हरी निर्मळ । साधन केवळ हरिपाठें ॥ २७ ॥

( ज्ञानदेव. )

भक्तीचें तें ज्ञान वाचे नारायण । दया ते संपूर्ण सर्वांभूतीं ॥
ज्ञान नारायण ध्यान नारायण । वाचे नारायण सर्वकाळ ॥
संसारमार्गी नाम हाचि सांठा । पावाल वैकुंठा नामें एकें ॥
गोविंद गोपाळ वाचेसी निखळ । पद पावाल अढळ अच्युताचें ॥
नामेंचि तरलें शुकादिक दादुले । जडजीव उद्धरले कलीयुगीं ॥
स्मरण करीतां वाल्मीक वैखरी । वारुळा भीतरीं रामराम ॥
सर्वांमाजी श्रेष्ठ पुण्य भूवैकुंठ । विठ्ठल मूळपीठ जगदोद्धार ॥
निवृत्ति सिरोपण ज्ञानदेवा ध्यान । सर्वत्र नारायण एकरूप ॥ २८ ॥

भावाचेंनि बळें घेतलें वैकुंठ । हरिनाम नीट वैकुंठ मार्ग ॥
सोपें हो साधन साधावयालागीं । नलगे उपाधि नाना मतें ॥
ज्ञानेसहित ज्ञान विज्ञानेसि धन । वृत्तीचें समाधान निवृत्ति करी
शांति दया क्षमा करुणानिधि प्रेम । नेउनि परब्रह्म भावें मिळती ॥
ज्ञानदेवो सांगे भावो मिनला गंगे । सुस्नात सर्वांगें हरी गंगा॥२९॥

नाममाला घे पवित्र । अंतीं हेंचि शस्त्र ।
राम हा महामंत्र । सर्व बाधा निवारी ॥
भवकर्मविख । रामनामीं होय चोख ।
हरेल भवव्यथादु:ख । पुढें सुख उपजेल ॥
माळा घालीं हेचि गळां । घे अमृताचा गळाळा ।
होईल वैकुंठीं सोहळा । रामकृष्ण उच्चारणीं ॥
ज्ञानदेवीं माळा केली । सुखाची समाधि साधिली ।
जिव्हा उच्चारणीं केली । अखंड हरिनाम ॥ ३०॥

विठ्ठलु नाहीं जये शरीरीं । वाया कांगा जन्मले संसारीं ।
विठ्ठलु नाहीं जये नगरीं । तें अरण्य जाणावें ॥
विठ्ठलु नाहीं जये देशीं । स्मशान भूमी ते परियेसी ।
रविशशिवीण दिशा जैसी । रसना तैसी विठ्ठलेंवीण ॥
विठ्ठलावेगळें जितुकें वर्म । विठ्ठला वेगळा जितुका धर्म ।
विठ्ठला वेगळें बोलती ब्रह्म । तितुकाही श्रम जाणावा ॥
सच्चिदानंदघन । पंढरिये परिपूर्ण ।
कर ठेवोनियां जघन । वाट पाहे भक्तांची ॥
विठ्ठलेंविण देवो म्हणती । ते संसार पुढती पावती ।
विठ्ठलाविण तृप्ती । नाहीं प्रतीति विठ्ठलेंविण ॥
श्रीगुरुनिवृत्तीनें दिधलें । तें प्रेम कोणे भाग्यें लाधलें ।
बापरखुमादेविवर विठ्ठलें दिधलें । ऐसें केलें ज्ञानदेवा ॥ ३१ ॥

सकळ धर्मांचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन ।
दया क्षमा समाधान । संतजन साधिती ॥
निजधर्म हा चोखडा । नाम उच्चारु घडघडां ।
भुक्तिमुक्तीचा संगवडा । हा भवसिंधुतारक ॥
लावण्य मान्यता विद्यावंत । सखे स्वजन पुत्रकलत्र ।
विषयभोग वयसा व्यर्थ । देहासहित मरणांतीं ॥
जें जें देखणें सकळ । तें हें स्वप्नींचें मृगजळ ।
म्हणोनि चिंती चरणकमळ । रखुमादेविवर विठ्ठलाचें ॥ २२॥

(ज्ञानदेव हरिपाठ.)

जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥
न सोडी रे भावो टाकिरे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥
जाती वित्त गोत कुळ शीळ मात । भजें कां त्वरित भावनायुक्त ॥
ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । तेणें वैकुंठभुवनीं घर केलें ॥ २३ ॥
नित्य नेम नामीं ते प्राणी दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तया जवळी ॥
नारायण हरी नारायण हरी । भक्ति मुक्ति चारी घरीं त्यांच्या ॥
हरिवीण जन्म तो नरकचि पैं जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ॥
ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड । गगनाहूनि वाड नाम आहे ॥ २४ ॥
हरिवंश पुराण हरिनाम संकीर्तन । हरिवीण सौजन्य नेणें कांहीं ॥
तया नरा लाधलें वैकुंठ जोडलें । सकळही घडलें तीर्थाटन ॥
मनोमार्गें गेला तो येथें मुकला । हरिपाठीं स्थिरावला तोचि धन्य ॥
ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णीं आवडी सर्वकाळ २५
तीर्थ व्रत नेम भावेंविण सिद्धि । वायांचि उपाधि करिसी जना ॥
भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे । करतळीं आंवळे तैसा हरी ॥
पारियाचा रवा घेतां भूमीवरी । यत्न परोपरी साधन तैसें ॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधलें संपूर्ण माझ्या हातीं ॥ २६ ॥

भावेंविण भक्ति भक्तिविण मुक्ति । बळेंविण शक्ति बोलूं नये ॥
कैसेंनि दैवत प्रसन्न त्वरीत । उगा राहें निवांत शिणसी वायां ॥
सायास करिसी प्रपंच दिननिशीं । हरीसी न भजसी कोण्या गुणें॥
ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें । तुटेल धरणें प्रपंच्याचें ॥ ३७ ॥

योग याग विधी येणें नव्हे सिद्धि । वायांचि उपाधि दंभ धर्म॥
भावेंविण देव नकळे निःसंदेह । गुरुविण अनुभव कैसा कळे ॥
तपेंविण दैवत दिधल्याविण प्राप्त । गुजेंविण हित कोण सांगे ॥
ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूचे संगतीं तरणोपाय ॥३८॥

पर्वताप्रमाणें पातक करणें । वज्रलेप होणें अभक्तांसी ॥
नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त । हरिसी न भजत दैवहत ॥
अनंत वाचाळ बरळती बरळ । त्या कैसेनि गोपाळ पावे हरी ॥
ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान । सर्वांघटीं पूर्ण एक नांदे॥३९

(मुक्ताबाई.)

आधीं तूं मुक्तचि होतासिरे प्राणिया ।
परि वासनें पापिणिया नाडिलासी ॥
आधींचें आठवीं मग घेईं परी ।
हरिनाम जिव्हारीं मंत्रसार ॥
आदि मध्य हरी ऊर्ध्व पैं वैकुंठ ।
जाईल वासना हरि होईल प्रगट ॥
एकतत्त्व धरीं हरिनाम गोड ।
येर तें काबाड विषय ओढी ॥
नानामतें सांडीं वासना पापिणी ।
एक नारायणीं चाड धरीं ॥
मुक्ताई मुक्तलग सांडिली हे वासना ।
मुक्तामुक्ती राना हरिपाठ ॥ ४० ॥

मुक्ताई जीवन मुक्ता हा संसार । हरी पारावार केला आम्हां॥४१॥

(नामदेव.)

नामाचा महिमा नेणेची पैं ब्रह्मा । म्हणोनियां कर्मा अनुसरला ॥
नाम हेंचि कर्म, नाम हेंचि धर्म । केशव हेंचि वर्म सांगितलें ॥
नाम शुद्ध स्नान, नाम शुद्ध संध्या । नामाविणें वेद आणिक नाहीं ॥
करितां आचमन केशव नारायण । करिती उच्चारण आधीं हेंची ॥
लग्नाचिये काळीं म्हणती सावधान । लक्ष्मीनारायण चिंतन करा ॥
देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती । शेवटीं वदविती रामनाम ॥
ऐसिया नामापरतें नाहीं सार । गिरिजेसी शंकर उपदेशी ॥
करिती पितृश्राद्ध कर्म आचरती । शेवटीं म्हणती एकोविष्णु ॥
नामें होय गति, नामें होय मुक्ति । नामयाचे चित्तीं रामनाम॥४२॥

नामें सदां शुद्धि प्राणिया होतसे । नामापाशीं असे भक्तिमुक्ति ॥
नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं । नाम संजिवनी साधकांसी ॥
नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे । नामें सदा चढे मोक्ष हातां ॥
यज्ञ दान तप नामें आलीं हातां । नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥
नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं । नाहीं याच्या तुकीं दुजा कोणी४३

जन्मजन्मांतरीं असेल सामोग्री । तरीच नाम जिव्हाग्रीं येईल राम
कर जोडूनि दोन्ही मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासांचा
तरि हें तुच्छ करूनि न पाहती दृष्टी । आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानीं
नामाचेनि बळें उडविलीं साधनें । तोडिलीं बंधनें संसाराचीं ॥
मुक्तिपद कोणी न घेती फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूपें ॥
योगियांचें घर रीघे काकुळती । अव्हेरिलें संतीं म्हणोनियां ॥

रिद्धीसिद्धी म्हणती आमुची कवण .ती ।
यावें काकुलती कवणा आम्हीं ॥
मोक्षमुक्ती जिहीं हाणितल्या लाथीं ।
तें काय धरिती आमुची सोय ॥
ऐसें सर्व देवांसी श्रीदेव ते पुज्य ।
केलें एक राज्य पुंडलिकें ॥
हर्षें निर्भर नामा नाचे महाद्वारीं ।
मुखीं निरंतरीं नामघोष ॥ ४४ ॥

असत्याचे मळ बैसले ये वाचे । ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥
हरी नामामृत प्रक्षाळीं जिव्हेतें । पाणीयें बहुतें काय करिती ॥
गंगासागरादी तीर्थें कोडीवरी । हरीनामाची सरी न पवती ॥
हरीनामसंगें सुस्नात पैं झाला।नाम्याजवळी आला केशिराज॥४५॥

साराचेंही सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गातां वाचे ॥
कासया करावें आणिक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी
दया शांति क्षमा हेंचि पैं भूपण । नामसंकीर्तन अहर्निशीं ॥
नाम म्हणे जप अखंड नामाचा।काळ हा सुखाचा सर्वोदित ॥४६॥

अखंड मुखीं रामनाम । धन्य तयाचाचि जन्म ।
स्नानसंध्येसी नेम । तो पुरुष महापवित्र ॥
धन्य धन्य तयाचा जन्म । रामार्पण अवघें कर्म ।
तोचि तरला हाचि नेम । रामकृष्ण उच्चारणीं ॥
अनंत जन्माचें साकडें । तेणेंचि उगवलें कोडें ।
जप तप येणें नावडे । रामकृष्ण उच्चारणीं ॥
नामा म्हणे नाममात्रें । अवघीं निवारलीं शस्त्रें ।
रामकृष्ण नाम वक्त्रें । उच्चारी तो धन्य ॥ ४७ ॥

कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव । कोणतें वैभव वाणी आतां ॥
अंत्यज आणि जातिवंता । मुखीं नाम घेतां उडी घाली ॥
बैसोनी आसनीं आळवितां नाम । उभा सर्वोत्तम तयापुढें ॥
प्रेमाचिया भरें उभ्यानें गर्जतां । नाचे हा अनंत तयासवें ॥
नामा म्हणे तया कीर्तनाची गोडी । घालीतसे उडी नेटेपाटे ॥४८॥

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंच नीच योनी हेंहि नसे ॥
धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील
कृपाळु कोंवसा सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥
नामा ह्मणे फार सोपें हें साधन । वाचे नाम घेणें इतुकेंची ॥ ४९॥

( जनाबाई. )

एक नाम अवघें सार । वरकड अवघें तें असार ॥
म्हणोनियां परतें करा । आधीं विठ्ठल हें स्मरा ॥
जनी देवाधिदेव । एक विठ्ठल पंढरीराव ॥ ५० ॥

विठ्ठल नामाची नाहीं गोडी । काळ ह्याणोनि तोंड फोडी ॥
गळां बांधोनि खांबासी । विंचू लाविती जिव्हेसी ॥
ऐसा अभिमानी मेला । नर्ककुंडीं थारा त्याला ॥
नाम बोध करी मना । दासी जनी लागे चरणा ॥ ५१ ॥

येऊं ऐसें जाऊं । जनासंगें हेंचि दाऊं ॥
आपण करूं हरिकीर्तन । जाणोनी भक्तीचें जीवन ॥
नाम संशयछेदन । भवपाशाचें मोचन ॥
जनी म्हणे हो देवासी । होईल त्याला कसणी ऐसी ॥ ५२ ॥

( एकनाथ. )

हरीचिया दासा हरि दाही दिशा । भावें जैसा तैसा हरि एक॥
हरि मुखीं गातां हरपली चिंता । त्या नाहीं मागुता जन्म घेणें॥
जन्म घेणें लागे वासनेच्या संगें । तेंचि झाली अंगें हरिरूप ॥

हरि हरि बोला नाहीं तरी अबोला । व्यर्थ गलबला करूं नको ॥
नको नको मान नको अभिमान । सोडी मीतूंपण तोचि सुखी ॥
सुखी जेणें व्हावें जग निववावें । अज्ञानी लावावे सन्मार्गासी ॥
मार्ग जया कळे भाव भक्तीबळें । जगाचियें मेळे न दिसती ॥
दिसती जनीं वनीं प्रत्यक्ष लोचनीं । एका जनार्दनीं ओळखिले॥५४॥

हरि बोला देतां हरि बोला घेतां । हंसतां खेळतां हरि बोला ॥
हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ॥
हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं । देह त्यागा अंतीं हरि बोला ॥
हरि बोला भांडतां हरि बोला कांडतां । उठतां बसतां हरि बोला ॥
हरि बोला जनीं हरि बोला विजनीं । एका जनार्दनीं हरि बोला॥५५

पिंडीं देहस्थिति ब्रह्मांडीं पसारा । हरीवीण सारा व्यर्थ भ्रम ॥
शुक याज्ञवल्क्य दत्त कपिलमुनि । हरीसी जाणोनि हरिच झाले ॥
यारे यारे धरूं हरिनाम तारूं । भवाचा सागरू भय नाहीं ॥
साधु संत गेले आनंदीं राहिले । हरिनामें झाले कृतकृत्य ॥
एका जनार्दनीं मांडिलें दुकान । देतो मोलाविण सर्व वस्तु ॥५६॥

आवडीनें भावें हरिनाम घेशी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥
नको खेद धरूं कोणत्याही गोष्टीचा । पति तो लक्ष्मीचा जाणतसे ॥
सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥
जैशी स्थिति आहे तैशा परी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥
एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश झाला॥५७॥

दुर्बलाची कन्या समर्थानें केली । अवदशा निमाली दरिद्राची ॥
हरिकृपा होतां भक्तां निघती दोंदें । नाचती स्वानंदें हरिरंगीं ॥
देवभक्त दोन्ही एकरूप झाले । मुळीचें संचलें जैसें तसें ॥





पाजळली ज्योति कापुराची वाति। ओवाळितां आरति भेद नुरे॥
एका जनार्दनीं कल्पचि मुराला। तोचि हरि झाला ब्रह्मरूप ॥५८॥

गाऊं नाचूं प्रेमानंदें। रामनामाचेनि छंदें॥
म्हणा श्रीराम जयराम। भवसिंधु तारकनाम॥
रामनामाची आवडी। काळ गेला देशोधडी॥
आवडीनें नाम घोका। म्हणे जनार्दन एका॥ ५९॥

आनंदें करोनि संसारीं असावें। नाम आठवावें श्रीरामाचें॥
नामाचिया योगें संसार तो चांग। येरव्हीं तें अंग व्यर्थ जाय॥
ऋषि मुनि सिद्ध संत महानुभाव। रामनामें भव सुखें केला॥
नामें होय सुख नामें निरसें दुःख। रामनाम एक हृदयीं धरा॥
एका जनार्दनीं नामाचा आठव। सुख दुःख भाव दुराविला॥६०॥

राम राम म्हणतां वाचें। रामरूप होय साचें॥
रामें तारिले शबरी। नित्य राम ती उच्चारी॥
रामें तारिली गणिका। केला अजामेळ सखा॥
शिळा तारिल्या सागरीं। राम अहल्या उद्धरी॥
एका जनार्दनीं पाहीं। राम भरला जनीं वनीं॥ ६१॥

शम-दम-साधन। नामावांचून न करी जाण॥
नाम गावें नाम गावें। वेळोवेळां नाम गावें॥
नामावांचुनी साधन नाहीं। ऐसीं वेदशास्त्रें देती ग्वाही॥
मज भरंवसा नामाचा। एका जनार्दनीं म्हणे वाचा॥ ६२॥

अवघे ते दैवाचे। विठ्ठल विठ्ठल वदती वाचे॥
अवघा धंदा दुजा नाहीं। वाचे विठ्ठल रखुमाई॥
अवघा संसार करिती। वाचे अवघे विठ्ठल म्हणती॥
अवघीं कर्में घडली तया। अवघे विठ्ठलची पाया॥
अवघा एका जनार्दन। अवघा जनीं जनार्दन॥ ६३॥

दाता तोचि म्हणावा । नामावांचूनी नेणें जीवा ॥
थोर तोचि म्हणावा । नेणे भूतांचा तो हेवा ॥
लहान तोचि म्हणावा । काया वाचा भजे देवा ॥
एका जनार्दनीं म्हणे । देवांवाचुनि कांहीं नेणें ॥ ६४ ॥

उंच नीच नाहीं नामाचीया पुढें । जातीचें तें गाढें नाहीं काम॥
अनामिकाहुनी असोत चांडाळपरि नामाचा उच्चार मुखीं वसे॥
यवनादि नीच असोत भलते । परि नाम सर्वदा तें मुखीं वसो॥
एका जनार्दनीं नाम वसो मुखीं।तेणें तो तिहीं लोकीं सरता होय६५

नामधारक हो का भलता । त्याचे चरणीं ठेवीन माथा ॥
न ह्मणे उत्तम अधम । मुखीं जपतां रामनाम ॥
याति कुळाचें कारण । नाहीं नाहीं नामाविण ॥
नाम जपे तोची श्रेष्ठ । एका जनार्दनीं वरिष्ठ ॥ ६६ ॥

असोनी उत्तम कुळीं । नाम नाहीं ज्याचे कुळीं ॥
जन्मुनी अधम कुळीं । सदा जपे नामावळी ॥
कुळासी तों नाहीं काज । नाम वदतांची निज ॥
नाम पावन हें जनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ६७ ॥

नाम न म्हणे तो आवडी । वाचे भलतेंचि बडबडी ॥
जिव्हा नामची वाचक । आळसें भोगित तो नर्क ॥
व्यर्थ टवाळ्याच्या गोष्टी । वाचे रामनाम तुटी ॥
आस त्याची पैं वांकुडी । अखंड वाचेसी रोकडी ॥
आराधियां करी निंदा । पण न म्हणे तो गोविंदा ॥
निंदे परतें नाहीं पाप । सत्य जाणा माझे बाप ॥
गर्जेती नामाचे पवाडे । कळीकाळ पायां पडे ॥
एका जनार्जनीं नाम । तया न बाधी क्रोध काम ॥ ६८ ॥

मन धांवे विषयावरी । राम म्हणतां हे वैखरी ॥
कैसें होता हें स्मरण । स्मरण नाहीं विस्मरण ॥
नामरूपा नाहीं मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥
एका जनार्दनीं छंद । बोलामाजीं तो गोविंद ॥ ६९ ॥

संतसंगें अंतरंगें नाम बोलावें ।
कीर्तन रंगीं देवा सन्निध सुखें डोलावें ॥
सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ॥
निराभिमानें सज्जन वृंदें आधीं वंदावीं ॥
भक्ति ज्ञानाविरहित गोष्टी इतरां न कराव्या ॥
मनोभावें वैराग्याच्या युक्ति जोडाव्या ॥
जेणें हृदयीं सत्वर मूर्ति ठसावे हरिची ॥
कीर्तन मर्यादा हे आहे या संता घरची ॥
श्रवणें मननें अद्वैतभजनें वाजवि करटाळी ॥
एका जनार्दनीं मुक्ति झालों तत्काळीं ॥ ७ ॥

ज्ञान वैराग्य कावडी खांदीं । शांतिजीवन तयामधीं ॥
शिवनाम तुह्मी घ्यारे । शिवस्मरणीं तुह्मी रहारे ॥
हरीहर कावड घेतली खांदी । भोवतीं गर्जती संत मांदी ॥
एका जनार्दनीं कावड बरी । भक्ति फरारा तयावरी ॥ ७१ ॥

सुखें संसार हा करी । वाचें उच्चारावा हरी ॥
दु:खरूप हा संसार । रामनामें सुख साचार ॥
रामनामाचें स्मरण । नाश पावे जन्ममरण ॥
जयापाशीं नाम असे । नारायण तेथें वसे ॥
एका जनार्दनी नाम । संसार हा परब्रह्म ॥ ७२ ॥

राजाला आळस, संन्याशा सायास ।
विधवेसी विलास, विटंबना ॥

व्याघ्रासी शांतता, गाईसी उग्रता ।
वेश्येसी हरिकथा, विटंबना ॥
दानेंविण पाणी, घ्राणेंविण घाणी ।
नामेंविण वाणी, विटंबना ॥
एका जनार्दनीं भाव भक्तिविना ।
पुण्य केलें नाना, विटंबना ॥ ७३ ॥

अवघे सुखाचे सांगाती । दुःख देखतां पळती ॥
सुख देखोनी ह्मणती माझें । दुःख देखतां पळती वोजे ॥
या परी अवघें लटिकें देख । एका जनार्दनीं पाहे सुख ॥७४॥

नामपाठें ज्ञान नामपाठें ध्यान । नामपाठें मन स्थिर होय ॥
जगांत हें सार नामपाठ भक्ति । आणिक विश्रांति नाहीं नाहीं ॥
जनार्दनाचा एका अखंड नाम गाये । हर्षें नाचताहे प्रेमरंगीं ॥७५॥

काय सांगावें कवणा । आपुलें आपण कां नेणा ॥
काशी जाताती उदंडें । त्याचीं पाठमोरीं तोंडें ॥
मन वासनेसी गोविलें । स्नानारितें धेंड नेलें ॥
देह जाऊनी तीर्थी बुडे । मन तैसेंचि कोरडें ॥
आंत मद्य आहे भरलें । वरीवरी भांडें तें धुतलें ॥
मनीं वासनेच्या जटा । देह मुंडी तो करंटा ॥
सवें चोरांचा सांगात । कैंवि चालवेल वाट ॥
मनीं भरलें आहे पाप । वरीवरी घेतला ताप ॥
मुलामायाचे ताप । राजद्वारीं त्या संताप ॥
मनीं नाहीं शुद्ध मती । काश्यादिका एक रीती ॥
एका जनार्दनीं चित्त । तीर्थें होती तैं सत्य ॥ ७६ ॥

नामपाठ पसारा घे रे मुखें सदा । कलिकाळाची बाधा तुज नोहे ॥
नाम तें सोपें नाम तें सोपें । नाम तें सोपें विठ्ठलाचें ॥
जनार्दनाचा एका नामपाठ वाणी । कीर्ति त्रिभुवनीं नामपाठें॥७७॥

नामपाठ गोविंद ह्याची लागे छंद ।
न करी भेदाभेद हृदयामाजीं ॥
गोविंदनाम गाय गोविंदनाम गाय ।
गोविंदनाम गाय हृदयीं सदा ॥
जनार्दनाचा एका हृदयीं ध्याये सच्चिता ॥
गोविंद गीतीं गातां सुख जोडे ॥ ७८ ॥

लेंकुरें खेळती वो साचें । मायबाप प्रेमें नाचे ॥
तैसा हेत पांडुरंगीं । धरितां उणें काय जगीं ॥
जैसा जैसा छंद त्याचा । पुरवणें लागे साचा ॥
एका जनार्दनाचें बाळ । कौतुकें खेळतसे खेळ ॥ ७९ ॥

बोल बोलतां वाचे । नाम आठवीं विठ्ठलाचें ॥
व्यर्थ बोलणें चावटी । वांचुनी नको नाम ओंठीं ॥
नाम हें परमामृत । नामें पावन तिन्ही लोक ॥
नाम सोपें भूमंडळीं । महापापां होय होळी ॥
एका जनार्दनीं शरण । नाम पतीतपावन ॥ ८० ॥

कलियुगामाजीं थोर झालें पाषांड ॥
पोटासाठीं संत झाले उदंड ॥
नाहीं विश्वास संत दया मानसीं ॥
बोलती वायांविण सौरस अवघा उपहासी ॥
वेदपठण शास्त्रसंभाषण पुराण मत ।
अवघें बोधोनी ठेविती बोलती वाचाळ मत्त ॥
देवभजन संतपूजन तीर्थमहिमा न कळे मूढा ॥
ऐसे कलियुगीं झाले जाणत जाणत दगडा ॥
एका जनार्दनीं काया वाचा राम जपा ।
सोपें हें साधन तेणें नोहे पुण्यपापा ॥ ८१ ॥

लज्जा अभिमान टाकुनी परता । परमार्थे सरता करीं कां रे ॥
वादक निंदक भेदक ऐसे त्रिविध । यांचा टाकुनी भेद भजन करीं॥
एका जनार्दनीं त्रिविधा परता । होउनी परमार्थी हित करी ॥८२॥

घालीं देवावरी भार । आणिक न करीं विचार ।
योगक्षेम निर्धार । चालवील तुझा ॥
वाचें गाय नामावळी । वासुदेवीं वाहीं टाळी ।
प्रेमाचे कल्लोळीं । नित्यानंदें सर्वथा ॥
सोस घेई कां रे वाचे । रामकृष्ण वदतां साचें ।
धरणें उठतें यमाचें । निःसंदेह ॥
शरण एका जनार्दनीं । करी रामनामध्वनी ।
कैवल्याच्या दानी । रक्षी तुज निर्धारें ॥ ८३ ॥

येणें पंथें बहुत तरले निश्चितीं । आवडीं जे गाती विठोबासी ॥
तारक हा मंत्र सोपा पैं सर्वांसी । उच्चारितां अहर्निशीं सर्व सिद्ध ॥
पापा प्रायश्चित्त कलियुगीं नाम । आणिक सोपें वर्म संतसेवा ॥
नलगे दंडन मुंडन दे आटी । नाम घेतां होटीं सर्व जोडे ॥
एका जनार्दनीं संतांसी शरण । चुके जन्ममरण नाना पीडा ॥८४॥

अभिमान नको धरूं पोटीं । होय अर्थासवें तुटी ॥
म्हणोनी स्मरा राम राम । तेणें पावाल निजधाम ॥
विहित करा आपुलें कांहीं । आठवा वाचे राम देहीं ॥
काकुलती येतां जना । शरण एकाजनार्दना ॥ ८५ ॥

जग राम राम ह्मणे । तया कां न येती विमानें ॥
नवल स्मरणाची ठेव । नामीं नाहीं अनुभव ॥
नष्ट गणिका राम म्हणे । तिसी वैकुंठींचें येणें ॥
एका जनार्दनीं ध्यात । राम पाहे ध्याना आंत ॥
रुक्मांगदा कारणें एकादशीचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥
अंबऋषी कारणें द्वादशीचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥

प्रल्हादाकारणें हरिनामाचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥
एका जनार्दनीं एकविध छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥ ८६ ॥

नाम घेतां हें वैखरी । चित्त धांवे विषयांवरी ॥
केसें होताहे स्मरण । स्मरणामाजीं विस्मरण ॥
नामरूपा नव्हता मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥
एका जनार्दनीं छंद । बोलामाजीं परमानंद ॥ ८७ ॥

एकनाथ.

धन्य भाग्याचे जन इहलोकीं । कीर्तन जाळे सुखी कृतकृत्य ॥
पातकी घातकी यांसी सोपा पंथ । कीर्तनें सरतें कलीमाजीं ॥
योग याग व्रत तप कल्पकोडी । कीर्तनीं श्रवण गोडी तेथें नाहीं ॥
वेद शास्त्र पुराण स्मृतीचें अनुमोदन । करारे कीर्तन कलीमाजीं ॥
एका जनार्दनीं आल्हादें कीर्तन।करितां श्रोते वक्ते जाण पावन होती।८८

नारदें केलासे प्रश्न । सांगतसे जगजीवन ॥
कलीमाजीं प्रमाण । कीर्तनें करावें ॥
महा पापीया उद्धार । पावन करती हरीहर ॥
ब्रह्मादि समोर । लोटांगण घालिती ॥
श्रुति स्मृति वाक्यार्थ । कीर्तन तोची परमार्थ ॥
शास्त्राचा मथितार्थ । कीर्तन पसारा ॥
एका शरण जनार्दन । कीर्तनें तरती विश्वजन ॥
हें प्रभूचें वचन । धन्य धन्य मानावें ॥ ८९ ॥

काया वाचा मनें निग्रह करी । कीर्तन सर्वभावें ऐके निर्धारीं ॥
अष्टांग साधन न करी । सुखें करी कीर्तन ॥
देव तुष्टेल तुष्टेल । सर्व भाव तुझा पुरवेल ॥ ध्रु० ॥
शांति क्षमा दया उन्मनी । आशा मनीषा तृष्णा दवडोनी ॥
काम क्रोध मद लोभ बंदीखानीं ॥ घाली नेउनी निर्धारें ॥

सर्वांभूतीं समदृष्टी । पाहे सर्व एकमय सृष्टी ॥
तरी ऐक्य कीर्तन गोष्टी । परमानंदें आल्हाद ॥
धरीं संतांची सांगात । कीर्तनीं करीं शुद्ध चित्त ॥
एका जनार्दनीं वचनार्थ । राम हरि गोविंद ॥ ९० ॥
कीर्तन ते पूजा कीर्तन ते भक्ति । कीर्तनें होय मुक्ति सर्व जीव. ॥
पातकी चांडाळ असोत भलते । कीर्तनीं सरते कलियुगीं ॥
कीर्तन श्रवण मनन पठण । कीर्तनें पावन तिन्ही लोक ॥
एका जनार्दनीं कीर्तनीं आवडी । घालितसे उडी वैकुंठाहुनी ॥ ९१॥
जन्ममरणाचें निवारेल दुःख । करितां देख कीर्तन ॥
नारद प्रल्हाद अंबऋषी । विनटले कीर्तनासी ॥
व्यास शुक वासुदेव । धरिती भाव कीर्तनीं ॥ ९२ ॥
कीर्तनासाठीं चारी मुक्ती । उभ्या राबती द्वारिंवासा ॥
कलियुगीं हेंची सार । करावें कीर्तन साचार ॥
कृत त्रेत द्वापारीं । कीर्तनमहिमा परोपकारी ॥
एका तयांसी शरण । कीर्तन करिती अनुदिन ॥ ९३ ॥
कीर्तनीं स्वधर्म वाढे । कीर्तनीं जोडे चित्तशुद्धी ॥
ऐसा महिमा कीर्तनाचा । शुक सांगे परीक्षिती साचा ॥
होती पावन अधम जन । करितां कीर्तन कलियुगीं ॥
एका त्याचा दासानुदास । जाती कीर्तनास आवडी जे ९४
हरिकीर्तनें चित्त शुद्ध । जाय भेद निरसुनी ॥
काम क्रोध पळती दुरी । होत भोंवरी महापाप ॥
गजरें हरीचें कीर्तन । पशु पक्षी होती पावन ॥
स्त्रीपुरुषां अधिकार । कीर्तनसार कलियुगीं ॥
एका जनार्दनीं उपाय । तारावया भवनदीसी ॥ ९५ ॥
सदैव आवडे ज्यां कीर्तन । धन्य पावन जगीं ते ॥
ब्रह्मचारी गृहस्थाश्रमी । करिती कीर्तन निजधामीं ॥

शुद्ध अथवा अतिनिंद्य । कीर्तनीं वंद्य सर्वथा ॥
यवन मातंगादी जन ॥ कीर्तनीं पावन कलियुगीं ॥
एका शरण जीवेंभावें । सदा कीर्तन करावें ॥ ९६ ॥

अपाय उपाय न टाकीं कीर्तन । सदा सर्वकाळ ध्यान राम कृष्ण॥
तयाचीये घरीं वसे नारायण । लक्ष्मीसह आपण कार्य करी ॥
एका जनार्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे पाठीं त्या मागें ॥ ९७ ॥

कीर्तनाची मर्यादा कैसी । देव सांगे उद्धवासी ॥
गावें नाचावें साबडें । न घालावें कोडें त्या कांहीं ॥
मिळेल तरी खावें अन्न । अथवा पर्णें तीं भक्षून ॥
जाईल तरी जावो प्राण । परी न संडावें कीर्तन ॥
किरकिर आणूं नये पाठीं । बोलूं नये भलती गोष्टी ॥
स्वयें उभा राहून । तेथें करी मी कीर्तन ॥
घात आलीया निवारी । माता जैसी बाळावरी ॥
बोले उद्धवासी गुज । एका जनार्दनीं बीज ॥ ९८ ॥

उद्धवा तूं करीं कीर्तन । अनन्यभावें माझें भजन ॥
नको आणीक साधन । या परतें सर्वथा ॥
धरीं प्रेम सदा वाचे । कीर्तन रंगीं तूं नाचें ॥
मी तूं पण साचें । अंगीं न धरीं कांहीं ॥
भाळे भोळे जन । गाती अनुदिनीं कीर्तन ॥
तेथें अधिष्ठान । माझें जाण सर्वथा ॥
नको चुकूं तया ठाईं । वसें सर्वदा मीही ॥
एका जनार्दनीं पाहीं । कीर्तनीं वसे सर्वदा ॥ ९९ ॥

पुरुष अथवा नारी । नाचती कीर्तनीं गजरीं ॥
तया कोण्ही जे हांसती । त्यांचे पूर्वज नर्का जाती ॥
आपुली आपण । कीर्तनीं सोडवण ॥

ऐशी शांति जयासी देखा । तोचि सर्व भूतांचा सखा ॥
सर्व लोकीं आवडता । जाला सरता कीर्तनीं ॥
नवलावो तयाचा भावो । सर्वांठाईं देख देवो ॥
सर्व दृष्टीचा देखणा । शरण एका जनार्दना ॥ १०१ ॥

दीन ह्मणोनि नाच रे कीर्तनीं । तेणें चक्रपाणी करी कृपा ॥
अनाथाचा नाथ पतीतपावन । ह्मणोनि कीर्तन तया गोड ॥
एका जनार्दनीं गोडाचें तें गोड । कीर्तन सुरवाड तिहीं लोकीं १०२

वेदाचिया मतें विसरूनी कीर्तन । करिती जे पठण शीण त्यांसी ॥
वेदाचा अर्थ नकळेची पाठका । कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥
श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार । परी सारासार विचार कीर्तनची ॥
एका जनार्दनीं पुराणाच्या गोष्टी । कीर्तन वाक्पुटीं करा सुखें १०३

कर्मी गुंतले उत्तमोत्तम । भजनीं उद्धरिले अधमाधम ॥
भजनमहिमा निःसीम । अधमा पदवी हे उत्तम ॥
एका जनार्दनीं भजन । पावन होती अधम जन ॥ १०४ ॥

नरदेह उत्तम चांग । धरा लाग कीर्तनीं ॥
वाया जाऊं नेदी घडी । करा जोडी कीर्तन ॥
क्षणभंगुर हा देहो । करा लाहो कीर्तनीं ॥
संसार अवघा नासे । खरें दिसे कीर्तन ॥
ह्मणे जनार्दनीं एका । उपाय निका कीर्तन ॥ १०५ ॥

सर्वात्मक भरला देवो । तेथें न ठेविती भावो ॥
ऐशीं भुललीं कर्मासी । आचरती तीं दोषासी ॥
सर्वांठाईं व्यापक हरी । कोण द्वेषी कोण वैरी ॥
ऐसे अभागी ते हीन । भोगीताती जन्मपतन ॥
नको ऐसें अज्ञान । एका जनार्दनीं शरण ॥ १०६ ॥





सप्रेम करितां भजन । नोहे भवाचें बंधन ॥
भक्तांचे आधीन देवो । नाहीं नाहीं हो संदेहो ॥
भक्तीची एवढी गोडी । वैकुंठाहूनी घाली उडी ॥
भक्तामाजीं देव असे । देवाअंगीं भक्त दिसे ॥
ऐशी परस्परें मिळणी । शरण एका जनार्दनीं ॥ १०७ ॥

नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥
दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम ॥
नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरतीं ॥
तुका ह्मणे नाम । चैतन्य निजधाम ॥ १०८ ॥

पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥
मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥
नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥
तुका ह्मणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ १०९ ॥

काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥
सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥
योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥
तुका ह्मणे जपा । मंत्र त्रिअक्षरी सोपा ॥ ११० ॥

फळकट तो संसार । येथें सार भगवंत ॥
ऐसें जागवितों मना । सरसें जनासहित ॥
अवघें निरसूनि काम । ध्यावें नाम विठोबाचें ॥
तुका ह्मणे देवाविण । केला सीण तो मिथ्या ॥ १११ ॥

झांकूनियां नेत्र काय जपतोसी । जों नाहीं मानसीं प्रेमभाव ॥
रामराम ह्मणा उघड मंत्र जाणा । चुकती यातना गर्भवास ॥
मंत्र यंत्र संध्या करिसी जडीबुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥
तुका ह्मणे ऐक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक रामनाम ॥११२॥

विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य। त्या देखिल्या पतित उद्धरती॥
विठ्ठलविठ्ठल भावें ह्मणे वाचे । तरी तो काळाचे दात ठेंसी ॥
बहुत तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥
तुका ह्मणे म्यां ही ऐकोनियां कीर्ती। धरिला एकांतीं हृदयामाजीं ११३

हाकेसरशी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥
करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥
तुका ह्मणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ११४ ॥

ठाव देऊनियां राखें पायांपासीं । मी तों आहें रासी पातकांची ॥
पातकांची रासी ह्मणतां लागे वेळ । ऐके तो कृपाळ नारायण ॥
नारायणनामें अवघें सांग जालें । असंगाचि केलें एकमय ॥
एकमय जालें विठोबाच्या नामें । भेदाभेदकर्में आणिक कांहीं ॥
तुका ह्मणे चित्तीं चिंतिलें जें होतें। तें होय आपैतें नामें याच्या॥ ११५॥

काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र लाज नाहीं ॥
मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥
नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥
तुका ह्मणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥११६॥

आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देंठीं ॥
नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥
चालिला पंथ तो पाववील ठायां । जरि आड तया नये कांहीं ।
तुका ह्मणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ॥ ११७॥

ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥
तो हा पंढरीचा राणा । पुसा सा चौं अठरा जणां ॥
चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी ॥
वैकुंठासी जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें ॥ ११८ ॥

मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥
वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ॥
भस्म दंड लगे काठी । तीर्थी आटी भ्रमण ॥
तुका ह्मणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ११९ ॥

विठ्ठल नांवाडा फुकाचा । आळविल्या साही वाचा ॥
कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥
न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥
तुका ह्मणे भेटी । हाक देतां उठाउठीं ॥ १२० ॥

जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम तो ठाय रम्य स्थळ ॥
रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त तें ते घडी ॥
धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहतां संकल्प गोविंदाचे ॥
तुका ह्मणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायण उत्तम तें ॥ १२१ ॥

वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥
अमुप हें गांठीं बांधूं भांडवल । अनाथा विठ्ठल आम्हां जोगा ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥
गेले पुढें त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आह्मी ॥
तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ १२२

कथा दुःख हरी, कथा मुक्त करी । कथा याचि बरी विठोबाची ॥
कथा पाप नासी, उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥
कथा तप ध्यान, कथा अनुष्ठान । अमृत हें पान हरिकथा ॥
कथा मंत्र जप, कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी॥
तुका ह्मणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लावोन उभा तेथें १२३

करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण ॥
सर्व कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाच्या क्रोधा ॥

दया क्षमा शांति । तेथें देवाची वसति ॥
पावे धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥
कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥
तुका ह्मणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥ १२५ ॥
धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥
नेदी होऊं सीण । वाहों चिंता दासांसी ॥
सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण ॥
वारी सुदर्शन । आपणचि कळिकाळ ॥
जीव वेची माता । बाळा जडभारी होतां ॥
तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा ॥
हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें ॥
तुका ह्मणे सत्य व्हावें । आहाच नये कारणा ॥ १२६ ॥
न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आह्मांसी हें सोपें गीतीं गातां ॥
न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजीं हरि ॥
जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा विटे ॥
अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आह्मां संपुष्टीं भक्तिभावें ॥
तुका ह्मणे वर्म जाणती लडिवाळें । जें होती निर्मळें अंतर्बाहीं॥१२७॥
स्वर्गीचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आह्मां ॥
नारायणनामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥
वैकुंठींचे जन सदा चिंतिताती । कइं येथें येती हरिचे दास ॥
यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥
तुका ह्मणे पावावया पैल पार । नाममंत्र सार भाविकासी ॥१२८॥
होईं आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ॥
आठवुनी पाय राहिला हृदयीं । निवारली तई सकळ चिंता ॥





अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धेंचि ॥
तुका ह्मणे जालें एकचि वचन । केलिया कीर्तन आराणुक ॥ १२९॥

( निळोबा )

नामापाशीं भुक्ति मुक्ति । ज्ञान विरक्ति हरिनामीं ॥
नामापाशीं दया शांति । साधना समाप्ति हरिनामीं ॥
नामें प्राप्त नित्यानंद । स्वरूपावबोध हरिनामें ॥
नामीं तिष्ठती रिद्धि सिद्धी । तुटती उपाधि हरिनामें ॥
निळा म्हणे हरिनाम सार । उतरि भवपार हरिनाम १३०
हेंचि परमार्थाचें सार । हरीचिया उच्चार नामाच्या ॥
जिहीं केला पावले ते । वैकुंठीं सरते सुखी झाले ॥
गातां वानितां हरि गुणरासी । झाले त्रैलोक्यासी पूज्य ते ॥
निळा म्हणे निका उपावो । सांपडला ठावो वैष्णवां १३१
हाचि उपाव सुगम सार । तरणें संसार जया नरा ॥
नाम गातां गोविंदाचें । फिटे जीवाचें जीवपण ॥
भुक्ति मुक्ति वोळंगे येती । अंगींचि ठाकती दया क्षमा ॥
निळा म्हणे अवघींच सुखें । येती हरिखें चोजवित ॥ १३२
हरीचें नामचि एक पुरे । सकळां साधनांचिये धुरें ॥
पावावया वैकुंठासी । लहानथोरां विश्वासीयांसी ॥
न लगे जाणे वनांतरा । सोडोनियां घरदारा ॥
निळा ह्मणे मुक्तिपदा । जावया हे संपदा ॥ १३३ ॥
सहजचि नाम आलें वाचे । करीत दोषांचें निर्मूळ ॥
ऐशी व्यास गर्जे वाणी । महिमा पुराणीं विख्यात ॥
पापी चांडाळ दुरात्मे ते । नामेंचि सरते वैकुंठीं ॥
निळा ह्मणे गणिका वाल्हा । अजामेळ उद्धरिला गजेंद्र १३४
केले सुखी फार । कांहीं न करितां विचार ॥
कोण याती कैसें कुळ । नामें आळवितां कृपाळ ॥

केले वरिष्ठ सकळां । प्रेमें देऊनियां गळां ॥
निळा ह्मणे वाढविले । वैकुंठीं ते सरते केले ॥ १३५ ॥
केला प्रतिपक्ष आपुल्या अभिमानें । तोडिलीं बंधनें बहुतांचीं ॥
जिहीं उच्चारिलें अनुतापें नाम । त्यांचें जन्ममरण निवारिलें ॥
कोणीये यातीचा हो कां कोणी । एका केलें कवतुक त्याचें तुह्मी ॥
निळा म्हणे सजना जातीचा कसायी।रंका बंका तिहीं उद्धरिलीं१३६
तेचि धन्य तेचि धन्य । सुकृती जन नरदेही ॥
जिहीं करूनि नामपाठ । भरला घोट द्वैताचा ॥
निरसूनियां ममता माया । कीर्तनें काया प्रक्षाळिली ॥
निळा ह्मणे अंतर्साक्षी । केला कैं पक्षीं जगाचा ॥ १३७ ॥
पशु पक्षी श्वापद याती । भृंग पतंग कीटक जाती ॥
हरीतें भजतां हरिरूप झालीं । निजानंदीं निमग्न ठेलीं ॥
दैत्य दानव निशाचर । मानव याती नारी नर ॥
निळा ह्मणे भजतां हरी । अगाधपणें पावले थोरी ॥१३८॥
काम क्रोध पळती दुरी । माया तृष्णा आपापरी ॥
विठ्ठल नामाचिया गजरें । दोष गेले दिगंतरें ॥
अहं ममता देशधडी । आशा चिंता झाली वेडी ॥
निळा ह्मणे ऐसें झालें । हरिच्या नामें हरीचि केलें ॥१३९॥
संत एकांतीं बैसले । सर्वेहि सिद्धांत शोधिले ॥
ज्ञानदृष्टी अवलोकिलें । सारांश काढिलें निवडुनी ॥
तें एक श्रीहरीचें नाम । सकळ पातकां करी भस्म ॥
अधिकारी उत्तम आणि अधम । चारी वर्ण नरनारी ॥
विठ्ठल नामें उच्चार ओंठीं । मूर्ती पाहतां दृष्टी ॥
लाभे ब्रह्मतेची पुष्टी । वाढे पोटीं निज शांती ॥
देखतां कांपती त्या काळ । हरिच्या ऐसें अंगीं बळ ॥
प्रगटे वैराग्य अढळ । तुटती मळ ममतेचे ॥

महा दोषांची झाडणी । अहंभावादिकांची गाळणी ॥
उभय कुळें बैसवोनि । जाती विमानीं वैकुंठा ॥
ऐसा नामाचा प्रताप । नेदी उरों पुण्य पाप ॥
भंगूनियां त्रिविधताप । ठाकती सद्रूप होऊनि ॥
दृश्य नुरे त्याचिये दृष्टी । ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी ॥
निळा ह्मणे धरितां कंठीं । बीजमात्र हरिनाम ॥ १४० ॥
आवडोनी रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम ॥
त्याचें सांग झालें सफळ । आलियाचें फळ नरदेहा ॥
रुचला संतसमागम । आपुलिया धर्म कुळाचा ॥
निळा ह्मणे भगवत्कथा । गातां ऐकतां निज मोक्ष ॥१४१॥
भवरोगें जे पिडले लोक । तिहीं आवश्यक सेवावें ॥
महा मात्रा हरिकीर्तन । उरलें रसायन निज निगुतीं ॥
मागें बहुतां गुणासी आलें । आरोग्यचि ठेविलें करूनियां ॥
निळा ह्मणे सांगतां फार । होईल विस्तार नामें त्यांचीं ॥१४२॥
जो जो काळ कीर्तनीं जाय । तो तो होय सार्थक ॥
घटिका पळही न वचे वांयां । चुकवी अपायापासुनी ॥
न लगे जन्मांतरा येणें । पुढतीं मरणें मागुती ॥
निळा ह्मणे ऐसा निका । उपाय नेटका सकळांसी ॥ १४३ ॥
कीर्तनरंगें रंगले जे जे । ते ते सहजें हरिप्रीय ॥
येर मुमुक्षू जे जे होती । कीर्तनें पावती ते लाभा ॥
महा अनुष्ठान हरिची कथा । नित्य जोडतां सुखप्राप्ती ॥
निळा ह्मणे कैवल्यपद । पावती अभेद हरिकीर्ति ॥ १४४ ॥
लोंढा आला सात्त्विकाचा । पूर अद्भुत या प्रेमाचा ॥
तेणें लागती वोसाणें । स्वानंदचि नामस्मरणें ॥
सलोसीन तळपताती । गोड अर्थीतें कवळिती ॥
निळा ह्मणे उभय तीरें । श्रोते वक्ते निर्मळ नीरें ॥ १४५ ॥

शिंपी सोनार चांभार । ब्राह्मणादि नारीनर ॥
हरीच्या कीर्तनें हरीचे भक्त । होऊनि ठेले जीवन्मुक्त ॥
सुतार कुंभार यवन । अंत्यजादि हीन जन ॥
निळा म्हणे क्षेत्री शूद्र । वैश्यहि पावले मुक्तिपद ॥ १४६ ॥
कथाश्रवणें उपजे विरक्ति । कथाश्रवणें वाढे शांति ॥
कथाश्रवणें उपाधी तुटे । कथाश्रवणें भवाब्धि आटे ॥
कथाश्रवणें सच्चिदानंद भेटे । समूळ तुटे मायाजाळ ॥
कथाश्रवणें स्वरूपस्थिति । कथाश्रवणें विषयसमाप्ति ।
कथाश्रवणें निजात्मप्राप्ति । होय उपरति कथाश्रवणें ॥
कथाश्रवणें मीपण नुरे । कथाश्रवणें अभिमान विरे ॥
कथाश्रवणें कल्पनाहि चुरे । ब्रह्म साक्षात्कारें भेटिसी ये ॥
निळा ह्मणे प्रथम पायरी । हरिकथा श्रवण मनन वरी ॥
निजध्यासें आत्मया हरी । भेटीजे निर्धारीं साक्षात्कारें १४७

## भक्तिस्वरूप

ज्ञानदेव

अवघाची संसार सुखाचा करीन । आनंदे भरीन तिन्ही लोक ॥
जाईनगे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन परब्रह्मीं ॥
बापरखुमादेविवरा विठ्ठलाची भेटी । आपुलिये संवसाठीं घेऊन राहे ॥

नामदेव

पुष्पासी परिमळु दूध घृत मेळ । ऊस तो रसाळु बीज नाहीं ॥
तैसें परब्रह्म आहे तें निर्वाण । वर्णितां पुराण नपडे ठायीं ॥
दीपाचीही दीप्ति दर्पणाची कांति । तैसी ब्रह्ममति कवण जाणे ॥
नामा ह्मणे जैसें सर्वांघटीं आकाश । केशव परमहंस तैसा जाणे ॥ १४९
निर्गुण सगुण नाहीं ज्या आकार । होऊनि साकार तोचि ठेला ॥

जळीं जळगार दिसे जैशा परीं । तैसा निराकारी साकार हा ॥
सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण । निर्गुण सगुण ययापरी ॥
ऐसा पूर्णपणें सहजीं सहज । सखा केशिराज प्रगटला ॥
पांडुरंगीं अंगें सर्व झालें जग । निववी सर्वांग नामा ह्मणे ॥ १५०
आपणची कर्ता आपणची मित्र । आपण सर्वत्र हरी झाला ॥
साधन साधितां हरि दिसे पूर्ण । प्रपंच हें भान न देखें डोळां ॥
किमर्थ हें टवाळ मायामोह जाळ । वांयांच पाल्हाळ कोरडे करा ॥
नामा ह्मणे सखोल विठ्ठल पूर्ण बोल।उच्चारितां मोल नलगे कांहीं॥ १५१
वंदावें तें काय निंदावें तें काय । सर्वांठायीं पाहें कोंदाटलें ॥
आहे कवणा ठायीं,नाहीं कवणा ठायीं। ठायींच्या पै ठायीं कोंदाटलें॥
रविरश्मीचें तेज सर्वांठायीं असे । त्या परि अनायासें बजतु जाय ॥
भाव तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । जाणोनियां वर्म ह्मणे नामा ॥ १५२

माता पिता बंधु भगिनी इष्टमित्र विठ्ठला तूं रे ।
बापा यावें भेटावें विसांवा माझा गा तूं ॥
माझा कुळाचार माहेर रे जिव्हार विठ्ठला तूं ।
माझें विद्याधन आयुष्य आरोग्यता विठ्ठला तूं गा ॥
माझें तप व्रत तीर्थ दान पुण्य विठोबा तूं गा ।
माझा गुरुमंत्र दैवत आगमं निगम विठ्ठला तूं गा ॥
भूपति सुरपति ब्रह्ममूर्ति विठोबा तूं गा ।
माझा आचार विचार सत्यवाद धीर धर्म विठोबा तूं गा ॥
यश कीर्ति निवृत्ति भातां साक्षी तृप्ति विठोबा तूं गा ।
माझे यम नियम प्राणायाम प्रत्याहार विठोबा तूं गा ॥
नामा ह्मणे विठोबा केशव परमात्मा माझा तूं गा ॥ १५३॥

विठ्ठलेंविण जया न गमे एक घडी । सर्वस्व आवडी विठ्ठलाची ॥
विठ्ठलचि माता विठ्ठलचि पिता । भगिनी आणि भ्राता विठ्ठलचि ॥

विठ्ठलचि क्रिया विठ्ठलचि कर्म । विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत ॥
गुज गौप्य जीविंचें विठ्ठला सांगावें । विठ्ठलें पुरवावें कोड त्याचें ॥
सर्वकाळ करणें विठ्ठलाची कथा । विठ्ठल जडला चित्ता जयाचिया ॥
विठ्ठल जागृति स्वप्न आणि सुषुप्ति । अखंड वदती विठ्ठल विठ्ठल ॥
ऐसें सर्वस्वेसीं विठ्ठल भजतां । सुख आलें हातां विठ्ठलाचें ॥
नामा म्हणे त्याचे चरणरज होऊन । जाहलोंसे पावन म्हणे आतां ॥
देव दाखवी असा नाहीं गुरु । जेथें जाय तेथें दगड शेंदुरु ॥
देव दगडाचा बोलेल कैंचा । कोणे नाळीं त्यास फुटेल वाचा ॥
देव देव करितां शिणलें माझें मन । जेथें जाय तेथें पूजा पाषाण ॥
नामा तोचि देव हृदयीं पाहे । नामा केशवाचे न सोडी पाय १५५
विठ्ठल माउली कृपेचि सावली । आठवितां घाली प्रेम पान्हा ॥
न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळी व्यापक न विसंबे ॥
माया मोह कैसा करावा सर्वथा । अंतरींची व्यथा तोचि जाणे ॥
सुवर्णाचि रूपें लेवविलीं अंगीं । लागों नेदी धगी संसाराची ॥
येऊनि अभय करें कुरवाळी । करित सावली पीतांबरें ॥
मुखीं नाम माळा कीर्तन श्रवणीं । लेवविलीं लेणीं नवविध ॥
नयनीं अंजन सूदलें सांवळें । समाधान झालें सर्व अंग ॥
अच्युत अनंत सुवर्णाची पेटी । घातलीसे कंठीं निर्विकार ॥
चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणि । प्रभा त्रिभुवनीं विराजित ॥
मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरी । पद्महस्त शिरीं स्थापितसे ॥
संत पायरव कपाळीं टिळका । नाहीं भय शंका कळिकाळा ॥
सगुण साजिरा कटीं कडदोरा । श्रवणें तुर्भरा दृढबोधु ॥
काम क्रोधादिक करूनि पुतळे । पायीं जे घातले पायवाट ॥
वासनेची दृष्टि लागेल त्या क्षणीं । उभा चक्रपाणि मागें पुढें ॥
संतपायीं नामा शृंगारमंडितु । अभंग क्रीडतु महाद्वारीं ॥ १५६ ॥

डुरोनिओळंगिल्याअविनाशदेताहे । तोजवळीजातांकायवेईलतेणों ॥
ऐसा तूं कृपाळु लक्ष्मीचा कांत । सांडुनि होतास कष्टी प्राणी ॥
सेवा मागा स्वामि वैकुंठनायक । भुक्तिमुक्तिनायक पांडुरंग ॥
साधिलें नगर देऊनियां शिर । कष्ट दशशिरें एवढे केले ॥
तें दिलें भिषणा एका नमस्कारा । त्या माझ्या उदारा कां न भजा ॥
मांडीवरी बैसों नेदी सापत्न माता । म्हणे राजसुता नव्हसी तूं ॥
हें ऐकोनी वना जाय तो तत्वता । सकल देवा माथां वरिष्ठ केला ॥
दुर्योधनें भोजना बहु केले सायास । परि न घे ग्रास तया घरीं ॥
विदुराचे घरीं न पुसतां जाय । भक्तिप्रिय होय स्वामी माझा ॥
अर्जुनाचे काजीं सांडी निज पैजा । सुदर्शन वोजा धरियेलें ॥
आपणलटिकाझालाभीष्मसाचकेला । काळाचाअंकुशस्वामीमाझा ॥
दीक्षित अवदान देती निज करीं । परि सुख न करी तयाकडे ॥
सुदाम्याचे पोहे देखे दृष्टिभरी । तयासी श्रीहरी पसरी हात ॥
म्हणुनि हा गावा म्हणूनियां ध्यावा । तोचि आराधावा हृदयकमळीं ॥
हरिगुण नाम हेंचि प्रिय आम्हां । कीर्ति गाय नामा होऊनि भाट ॥१५७
संतोषा कारणें सज्जन जीवासी । साक्षात्कारी होसी नारायणा ॥
समान करिसी सर्वांभूतीं जाण । पतीतपावन भाक तुझी ॥
भक्ति भाव ज्यांचा भाग्यें आपुलिया । होसी देवराया सर्वविध ॥
समर्थपणासी कोणा विचारावें । नामा म्हणे भावें कारण हा ॥१५८॥
योगि मुनि जन तपस्वी याज्ञिक । ते तव पादुका वंदिती शिरीं ॥
हरिहर ब्रह्मा सूर्य चंद्रादिक । ओढवी मस्तक रजरेणु ॥
गंगा भागीरथी होती शुचिमंत । आणिकांची मात काय सांगों ॥
नामा म्हणे मेणों मार तुझा देवा । कृपाळु केशवा केशिराजा॥१५९॥
सर्वांभूतीं नांदे सर्व नारायण । सर्व संस्थापन पांडुरंगा ॥
सर्वा देवांच्या जया गोपवेशा । पावन परेशा परमाशोसी ॥

मूर्त अमूर्तांचा मुक्त परांगता । सर्व मायातीता साक्षिरूपा ॥
नामा म्हणे देवांदानवां जिंकिसी । ते भाके आम्हांसी सांभाळावें ॥ १६०
संताची विश्रांति ज्ञानियांचें गूज । मुक्तिचें हें बीज मोक्षदानी ॥
कृष्णा विष्णु हरी मुकुंद मुरारी । अच्युता नरहरी नारायणा ॥
तूंचि हें सकळ आदि मध्य अंतीं । निज सुख संमति सज्जनांची ॥
सकळ नारायण पातकभंजन । हरि जगज्जीवन परमानंद ॥
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि घेता देता प्रेमसुख ॥
नामदेव ऐसें नाम त्वां ठेविलें । येणें अनुभविलें प्रेमसुख ॥ १६१ ॥
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा । सोडवीं भवभ्रमापासोनियां ॥
देऊनि भातुकें गळां घाली मिठी । सखा जगजेठी भक्तीभावा ॥
आधार करोनि राहिले पंढरी । तेथें निरंतरीं प्रेम दावी ॥
नामा म्हणे सेवा करोनियां शुद्ध । संसार संबंध नाहीं तया ॥ १६२ ॥
योगी हे शिणती तुझिये प्राप्तिलागीं । नातुडसी जगीं कवणासी ॥
एक जटा नखें स्वयें वाढविती । दिगंबर होती एक देवा ॥
त्यांसी तुझी भेटी नव्हेचि कल्पांतीं । अखंड शिणती साधनानें ॥
आमचे सन्निध सर्वदा राहसी । आमच्या भाग्यासी पार नाहीं ॥
धन्य झालों आम्ही तुझिया प्रसादें । नाचे तुझ्या छंदें नामदेव ॥
मजसाठीं काय लाजतोसी देवा । तृणा आणि जीवा साच होसी ॥
ते काय पवाडे वानाविलों श्रीरें । ब्रह्मादिकें वृंदें ध्याती कैसी ॥
जाणतां नेणतां सर्वांसी उद्धार । भवसिंधु पार पावविसी ॥
नामा म्हणे तुझे उपकार ऐसे । दावी जगदीशा हेळामात्रें ॥ १६३ ॥
लव निमिष म्हणतां आहे नाहीं पाहतां । क्षण एक संपादितां विषयो हा ॥
स्वहित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥
संपत्तीचें बळें एक जाहले आंधळे । वेढिले कळिकाळें स्मरण नाहीं ॥
एक विद्यावंत जातीचा अभिमान । ते मेले तमोगुणें रसातळीं ॥
मिथ्या मायामोह करूनि हव्यास । वेंचिलें आयुष्य वायांविण ॥
नामा म्हणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवीं केशवा मायबापा १६४ ॥

पराकारणें प्राण वेंचि जो सर्वथा । जाणे परव्यथा कळवळोनि ॥
परसुख संतोष धरी जो मानसीं । जरी परलोकासी जाणें आहे ॥
देहींचा अभिमान न धरावा चित्तीं । धरावी उपरति उपशमु ॥
सर्वकाळ प्रीति संतांचि संगति । गावीं अनुरागें प्रीति नामें साक्षी ॥
सर्वभूतीं सर्वदा ऐसी समबुद्धि । सांडावी उपाधि प्रपंचाची ॥
सर्वकाळ परमात्मा आहे सर्वदेशीं । हे भावना अहर्निशीं दृढ धरी ॥
संतसमुदाय मिळती जेथें जेथें । जावें तेथें तेथें लोटांगणीं ॥
चिंता न करीं नाम्या येणें तरसी जाण । तुज सांगितली खूण निर्वाणींची
संग खोटा परनारीचा । नाश होईल या देहाचा ॥
रावण प्राणासी मुकला । भस्मासुर भस्म झाला ॥
गुरुपत्नीशीं रतला । क्षयरोग त्या चंद्राला ॥
इंद्रा अंगीं सहस्र भगें । नामा म्हणे विषयासंगें ॥ १६९ ॥
कायारूप जिचें हिनवट अती । माऊली धन्य ती आहे नारी ॥
तिचेवरी मन कदापि नव जाये । भजना न होये कदा चळ ॥
ऐसिये माउली परउपकारी । घात हा न करी भजनाचा ॥
नामा म्हणे त्याचे चरण वंदावे । वदन पहावें माउलीचें ॥ १७० ॥
परदारा परधन परनिंदा परपीडण । सांडोनियां भजन हरिचें करा ॥
सर्वांभूतीं कृपा संतांचीं संगति । मग नाहीं पुनरावृत्ति जन्ममरण ॥
शास्त्राचें हें सार वेदांचें राव्हार । तें नाम परिकर विठोबाचें ॥
नामा म्हणे मळो साधन आणिक । दिधली सूज भाक पांडुरंगें ॥
धीर धरीं सत्य हें तो नारायणा । शुद्ध आचरणा न सांडावें ॥
लौकिकाची कांहीं न धरावी लाज । हेंचि निज काज साधावें तें ॥
दंभ अभिमान सर्व त्यजोनियां । शरण त्या सखीया जावें आतां ॥
निंदा करीती तो मानावा आदर । स्तुति तें उत्तर नायकावें ॥
न धरावी चाड मानासन्मानाची । आवडी भक्तीची रूढवावी ॥
नामा म्हणे हेंचि रूढवावें मानसीं । क्षणएक नामासी विसंबू नये १७२

एकी एकादशी करितां काय वेंचे । उपवासी राहतां काय वेंचे ॥
एक तुळसीदळ वाहतां काय वेंचे । पायली वंदितां काय वेंचे ॥
गुज जागरणा जातां काय वेंचे । हरिहर म्हणतां काय वेंचे ॥
संतसमागमा जातां काय वेंचे । चरणरज वंदितां काय वेंचे ॥
एक दंडवत करितां काय वेंचे । अपराधी म्हणवितां काय वेंचे ॥
एक प्रदक्षिणा करितां काय वेंचे । तीर्थयात्रेसी जातां काय वेंचे ॥
ऐसी निमाली भक्ति कां न करिसी निर्दैवा । नामा म्हणे केशवा अनुसरपा
निंदिलें हें जन सुखें निंदूं द्यावें । सज्जनी क्षोभावें नये बापा ॥
निंदा स्तुति ज्याला समान पैं झाली । त्याची स्थिति आली समाधीला ॥
शत्रुमित्र ज्याला समसमानत्वें । तोचि पैं देवातें आवडला ॥
माती आणि सोनें ज्या भासें समान । तो एक निधान योगीराज ॥
नामा म्हणे ऐसे भक्त जे असती । तेणें पावन होती लोक तिन्ही १७४
मूषक हव्यासें चालूनि भूमीतें । मांजर तयातें टपतसे ॥
तसा तुज काळ टपे वेळोवेळां । वेळीं त्या गोपाळा भजावें बापा ॥
भातुकेनि माप आयुष्य वोसरे । अवचितां कोरे डोळा झांकी ॥
नामा म्हणे अरे निश्चिती हे मूढा । हरिनाम दृढा सेवीसीना १७५
ज्वरास भरण सकळ दुर्वासि कारण । त्याचें परिहरण रामनाम ॥
कामसंदीपन दोष आचरण । त्याचें परिहरण रामनाम ॥
दुर्वासना गहन दुर्बुद्धि आचरण । त्याचें परिहरण रामनाम ॥
नामा म्हणे कारण संसारतारण । जरी मनीं निधान रामनाम १७६
आम्हां संगती नावडे कांहीं । म्हणोनि झालों या विदेही ॥
सुखमूळ संगतीचें । आम्ही नव्हे त्या गांवींचे ॥
आम्हां नाहीं रूप नांव । वस्तीसी नाहीं एक ठाव ॥
मन त्या वृत्तीसि धांव । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥
स्नान केलें गंगातीरीं । गंध लाविलें पंढरपुरी ॥
सेव्या केली कृष्णातिरी । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥
भिक्षा केली कोल्हापुरीं भोजन केलें महाद्वारीं ॥

निद्रा केली माहुरी । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥
ऐसियाची संगत करी । त्याचे चरण हृदयीं धरीं ॥
नामा म्हणे या संसारीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ १७७ ॥
माझिया मनें मज उपदेश केला । तो मज बिंबला हृदयकमळीं ॥
निर्वाणींची एक सांगितली खूण । कैवल्य चरण केशवाचे ॥
वेदशास्त्र श्रुति आणिक पुराणें । पढोनि जाणणें होंचि सत्य ॥
क्रिया कर्म धर्म करणें ज्या कारणें । ते खूण निर्वाण चरण हेचि ॥
जप तप अनुष्ठान करोनि साधन । प्रत्यक्ष निधान चरण हेचि ॥
नामा म्हणे मज कळलें अनुभवें।न विसंबें चरण जीवें तुझे॥१७८॥
घरीं नांदती बरवेपरी । म्हणूनि केलीस अंतुरी ॥
नित्य भांडण तया घरीं । आणिक कांहीं न देखों ॥
दुसरी न करावी बाईल । भंड फजिती होईल ॥
बोभाट वेसदारा जाईल । बायकांच्या पाणवठ्या ॥
धाकटीकडे पाहतां कोडें । वडील धडधडां रडे ॥
मेल्या तुझें गेलें मढें । तिकडे कां रे पहातोसी ॥
वडील बाईल म्हणे उण्या । धाकटी बाईल केली सुण्या ॥
लाज नाहीं तुझ्या जिण्या । काळतोंड्या बैसलासी ॥
वडील बाईल धरी दाढी । धाकटी ओढून धरी शेंडी ॥
सांपडलासी यमसांडी । लाशीपरी पडलाशी ॥
सवती सवतीचा करकरा । उभा शिणलों घालारा ॥
भेटी करी वनींच्या व्याघ्रा । परी संसारा उबगलों ॥
सवती सवतीची कैशी धरणी । कौतुक पहाती शेजारणी ॥
तया पुरुषाची विटंबनी । थोर जाचणी तयाशीं ॥
नामा म्हणे गा श्रीहरी । दोघी बायका ज्याचे घरीं ॥
त्याचें नसावें शेजारीं । थोर दुःख तयाशीं ॥ १७९ ॥

पैईला तो जाणरे सद्गुरुवचनीं निर्धारें ॥
विपरीत भावना विसर पडिला कैंचा जया परिहार रे ॥
आपणा पैं पहावया कवण लावूं दिवा रे ।
चंद्र सूर्य जेणें प्रकाशे तो मी कैसा पाहूं येई रे ॥
अंत त्यासी नाहीं रे स्थान मान कांहीं रे ।
पैईला तेणें ओळखिला येरासी अगम्य भाई रे ॥
पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर नाहीं दाही दिशा रे ।
महाप्रळयीं समसाम्य एक होती अनुभविया तो तैसा रे ॥
दाही दिशा व्यापूनियां तो अंधकार महा रे ।
रवि प्रकाश जाहल्या आपोआप निरसला रे ॥
काष्ठीं पावक उपजला तोही तया सम रे ।
नामा म्हणे केशीराजा पैईल्या आज्ञा तुझी रे ॥ १८० ॥
क्रिया कर्म धर्म तूंचि होसी माझें । राखण मी तुझें द्वार देवा ॥
मज पाळिसी तैसें पाळीं दीनानाथा । न सोडीं सर्वथा नाम तुझें ॥
गाईन तुझें नाम हृदयीं धरोनि प्रेम । हाचि नित्य धर्म सर्व माझा ॥
नामा म्हणे विठो कृपेच्या सागरा तूं आम्हां सोइरा अधिकांतीं १८१
उडाली पक्षिणी गेली अंतराळीं । चित्त बाळाजवळी ठेवूनियां ॥
तैसें माझें मन राहो कां ईश्वरीं । मग सुखें संसारीं असेन कां ॥
धेनु चरे वनीं वत्स असे घरीं । चित्त वत्सावरी ठेवूनि फिरे ॥
दुबीपरी दुबी सखिसीं गोष्टि करी । चित्त दुबीवरी ठेवूनियां ॥
विष्णुदास नामा विनवी परोपरी । हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ १८२ ॥
बहुत दिवस तुमचे गांवीं । आलों कृपा असों द्यावी ॥
आम्ही जातों आपुल्या गांवा । विठोबा लोभ असों द्यावा ॥
तुझे पायीं माझें मन । माझे ठायीं तुझा प्राण ॥
लिहित पत्र पाठवावें । माझें स्मरण असों द्यावें ॥
नामा म्हणे जी केशवा । अखंड प्रेमभाव द्यावा ॥ १८३ ॥

226776

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥
पंढरीभूमि परसें घर । तेथें राहूं निरंतर ॥
सर्वसत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता ॥ १८४ ॥

(जनाबाई.)

भक्ति ते कठीण इंगळासी खाई । रिघणें त्या डोहीं कठीण असे ॥
भक्ति तें कठीण विषग्रास घेणें । उदास पै होणें जीव भावें ॥
भक्ति ते कठीण भक्ति ते कठीण । खड्गाची धार बाण न सोसी तया ॥
भक्ति ते कठीण विचारूनि जनी । भक्तियोगें संतसमागमीं सर्व सिद्धी ॥
जनी ह्मणे नामदेवासी । चला जाऊं पंढरिसी ॥
आला विषयाचा कंटाळा । जाऊं भेटूं त्या गोपाळा ॥
आवडीनें जगजेठी । गळां घालूनियां मिठी ॥
आवडीनें गुज कानीं । ह्मणे नामयाची जनी ॥ १८६ ॥
आतां भीत नाहीं देवा । आदि अंत तुझा ठावा ॥
झालें नामाचेनि बळकट । तेणें वैकुंठ पायवाट ॥
ज्ञान वैराग्य विवेक बळें । तें तंव आह्मांसवें खेळे ॥
दया क्षमा आह्मांपुढें । जनी ह्मणे झाले वेडे ॥ १८७ ॥
आह्मी पातकांच्या राशी । आलों तुझ्या पायांपाशीं ॥
ममा वैद्य तूं करीं । आतां तारीं अथवा मारीं ॥
जनी ह्मणे सृष्टीवरी । एक असशी तूं बा हरी ॥ १८८ ॥
आह्मी स्वर्ग लोक मानूं जैसा ओक । देखोनियां सुख वैकुंठीचें ॥
न लगे वैकुंठ न वांछूं कैलास । सर्वस्वाची आस विठोपायीं ॥
न लगे संपत्ति धन आणि मान । एक करणें ध्यान विठोबाचें ॥
सत्य की मायिक आमुचें बोलणें । तुमची तुह्मां आण सांगा हरी ॥
जीवभाव आह्मी सोडूं ओवाळूनि । ह्मणे दासी जनी नामयाची ॥

मी तों समर्थाची दासी । मिठी घालीन पायांसीं ॥
हाचि माझा दृढभाव । करीन नामाचा उत्सव ॥
आम्हां दासीस हें काम । मुखीं विठ्ठल हरिनाम ॥
सर्व सुख पायीं लोळे । जनी संगे विठ्ठल बोले ॥ १९० ॥

(एकनाथ.)

न लगतां क्षण । करी आपुल्यासमान ॥
तो हा पंढरीचा राणा । बहु आठवतो मना ॥
न पाहे यातीकुळ । शुद्ध अथवा चांडाळ ॥
दीनाचा दयाळ । बहु दासांची कळवळ ॥
एका जनार्दनी भावें । त्यासी एकवेळ गावें ॥ १९१ ॥
जेथें जावें तेथें देवची सांगातें । ऐसें केलें नाथें पंढरीच्या ॥
अंतरीं बाहेरीं एकमय झालें । अवघें कोंदाटलें परब्रह्म ॥
शब्द तेथें झाला समूळची वाव । गेला देहभाव हारपोनी ॥
एका जनार्दनीं ऐशी झाली वृत्ती । वृत्तीची निवृत्ति चिदानंदीं ॥ १९२ ॥
अणुरेणूपासोनी ब्रह्मांडीं भरला । तो म्यां देखिला विटेवरी ॥
स्थावर जंगम भरूनी उरला । तो म्यां देखिला पंढरीये ॥
वेद शास्त्र पुराणें गाती जयासाठीं । तो पुंडलीका पाठीं उभा दिसे ॥
वेडावल्या श्रुति न कळे म्हणती । तो उभा श्रीपति वाळुवंटीं ॥
संताचा समागम गाती आनंदानें । तो हरि कीर्तनें नाचतसे ॥
एका जनार्दनीं सुखाचा सागरु । विठ्ठल कल्पतरु बोळला आम्हां ॥
जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें । मग या विठ्ठलें कृपा केली ॥
जन्मोनी संसारीं झालों याचा दास । माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥
भ्रमर सुवासीं मधावरी माशी । तैसें या देवासी मन माझें ॥
चातका मेघासी तेथें माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें ॥
एका जनार्दनीं मज तेथें न्यावें । हाडवोनी यावें संतापाशीं ॥ १९४ ॥

भक्ति मुक्तीस कारण । हरीचें जन्म कर्म गुण ॥
हरिकीर्तनाची जोडि । सकळ साधनें होतीं बापुडी ॥
शिळा तारिल्या सागरीं । गोवर्धन उचलिला करीं ॥
तिमाला गुरुपुत्र आणिला । मुखें दावाग्नि प्राशिला ॥
तो सांवळा श्रीहरी । एका जनार्दनीं चरण धरी ॥ १९५ ॥

( तिळोबा. )

चौदा भुवनें पोटीं । सकल तीर्थें ज्या अंगुष्ठीं ॥
तो हा देखियेला डोळां । विठो घननीळ सांवळा ॥
जों जों दिसे दृश्याकार । तों तों जयाचा विस्तार ॥
निळा म्हणे उत्पन्न होती । जीवें जेथें तया जाती ॥ १९६ ॥
जेणें पृथ्वीसी धरिलें । सूर्या प्रकाशें उदिलें ॥
चंद्रबिंबीं अमृत ठेविलें । तेणें निववीत जगा तो ॥
गगना पवाडू दिधला । मेरु स्तंभ उभारिला ॥
गती पवनही उडविला । दाही दिशा फिरतसे ॥
जेणें अग्नीसी दीपन । जीवनीं ठेविलें जीवन ॥
आपोनिधी जळें पूर्ण । क्षीरें सागर भरियेला ॥
नाना अन्नीं ठेविली तृप्ति । नाना परिमळ पुष्पयाती ॥
नाना रसस्वाद फळाप्रति । एवढी युक्ती कोणाची ॥
अपार चांदणें फुलोरा । जेणें शोभविलें अंबरा ॥
पर्जन्याच्या वर्षति धारा । जेणें पिकाविलें धरणीतें ॥
जेणें इंद्रादिकां देवां । पदीं स्थापुनी वांटिल्या सेवा ॥
जेणें मर्दुनी दैत्यदानवां । केला सांभाळ भक्तांचा ॥
जो या प्राणातें चाळिता । जीवा जिवणें ज्याचिया सत्ता ॥
मनीं संकल्पाचिया चळथा । उठवी सत्ता हे कोणा ॥
जो या श्रुतीतें पढविता । परमामृतातें जीववीता ॥
सूर्या अंजन लेवविता । अवघी सत्ता हे ज्याची ॥

चराचर व्यापूनियां उरला । उभा विटेवरी ठाकला ॥
निळा म्हणे तेणें केला । बुद्धी माझिये प्रकाश ॥ १९७ ॥
भाविकांचें अवघेंचि गोड । करूनि कोड स्वीकारी ॥
भोळानाथ पंढरीचा । न करी दासांचा अतिक्रम ॥
न म्हणे रुक्ष थोडें कांहीं । घाली अवघेंही मुखींचि तें ॥
निळा म्हणे कृपावंत । उभा तिष्ठत विटेवरी ॥ १९८ ॥

## भेट.

(नामदेव.)

वारंवार काय विनवावें आतां । समजावें चित्त आपुलिया ॥
तूं काय म्हणसी कंटाळेल हाचि । जाईल उगाचि वोळंबिया ॥
मजलागीं देवा जासी चुकवोनी । आणिन धरूनि तुजलागीं ॥
दृढ भक्ति भाव प्रेमाचा हा दोरा । बांधीन सत्वर तुझे पायीं ॥
नामा म्हणे बोल काय विठो आतां । भेटावें सर्वथा यांत बरें ॥ १९९ ॥
भेटी लागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥
पौर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥
दिवाळीच्या मूळा मोठी आस केली । पाहतां वाटुली मायबापा ॥
नामा म्हणे आम्ही लेंकरांची जाति । भेटावया खंती वाटतसे ॥ २०० ॥
संसारपडचक्रीं पडिलों महाडोहीं । सोडवण्या येई पांडुरंगा ॥
कृपावंती धांव दुबळा बराडी धांव । नको भक्तिभाव पाहों माझा ॥
माझी चित्तवृत्ति अज्ञान हे नाहीं । क्रोधें भरिली आहे अहंकारें ॥
पंचाननीं मज वेढलें वेढोनि । नेताति काढोनि प्राण माझा ॥
गजेंद्राकारणें धावली तुझी उडी । तैसा लवडसवडी पावें मज ॥
नामा म्हणे मज तुझाचि आधार । पोसणा डिंगर जन्मोजन्मीं ॥ २०१ ॥
सांडी मोकळिलें कवणा निववीलें । कठिण कैसें झालें चित्त तुझें ॥
कवणा कळोळणी जवळ संजीवनी । चित्तीच्या निर्वाणीं पाजेसी ॥

अपराधी अनाथ जरी झाले अमंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥
नामा म्हणे विठ्ठले आलों मी तुजपाशीं । केशवा भेटसी अनाथनाथा ॥
अनाथ अनाथ म्हणती मातें । अनाथनाथ म्हणती तूतें ॥
आपुलें ब्रीद साच करी । भेट मज एक वेळ मुरारी ॥
पतीत पतीत म्हणती मातें । पतीतपावन म्हणती तूतें ॥
दीन दीन म्हणती मातें । दीनानाथ म्हणती तूतें ॥
आर्त आर्त म्हणती मातें । आर्तपरायण म्हणती तूतें ॥
नामा म्हणे ऐकें सुजाणा । नाइकसी तरी लाज कवणा ॥ २०३ ॥
बोलावूं पाठवूं एवढी कैंची शक्ति । या रंगा श्रीपती त्वां बा यावें ॥
येईंगा विठ्ठला बाहातसें आतां । या रंगीं अनंता त्वां बा यावें ॥
धांवत त्वां यावें धांवत त्वां यावें । या रंगीं नाचावें पांडुरंगा ॥
तिन्हीं त्रिभुवनीं तुझीच करणी । ठाव मागे चरणीं नामदेव ॥ २०४ ॥

---

## चरणसेवा.

(नामदेव.)

बहु पुरें पाहिलीं बहु दुःखें साहिलीं । बहु चिंता वाहिली दुर्धर हे ॥
बहु असक्तता बहु बोळंगणा । बहु विटंबना झाली माझी ॥
बहु काळ गेले अनुचित केलें । परि नाहीं गाइलें नाम तुझें ॥
बहु जन्मांशेवटीं स्वामी तुझी भेटी । बहुत हिंपुटी झालों देवा ॥
नामा म्हणे केशवा एक उरली वासना । ध्यावी नारायणा चरणसेवा ॥
रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवीं । अनुदिनीं आठवी चरण तुझे ॥
नेरे पांडुरंगा आपुलिया गावां । तूं माझा विसांवा जीवलग ॥
मी एक आपुडें रंकाहूनि रंक । त्रिभुवननायक कीर्ति तुझी ॥
मी तुझें पोसणें दास पैं दुर्बळ । तूं दीनवत्सल स्वामि माझा ॥
तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा । सांभाळीं समर्था ब्रीद तुझें ॥
नामा म्हणे विठो झालों कासावीस । पुरवीं माझी आस मायबापा ॥

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥
चरण न सोडीं सर्वथा । तुझी आण पंढरिनाथा ॥
वदनीं तुझें मंगळनाम । हृदयीं अखंडीत प्रेम ॥
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवीं माझा ॥२०७॥
तुझे पायीं माझ्या मनें दिल्ही बुडी । इंद्रियें बापुडीं वेडावलीं ॥
इंद्रियें विषय जाणावे कवणें । जाणोनि भोगणें कवणें स्वामी ॥
देह सहजस्थिती पाहिलें निष्काम । हृदयीं सप्रेम वोसंडत ॥
नामा म्हणे भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करीं मज ॥
माझें सर्व भाग्य केशवाचे पायीं । आणिक उपाय नेणों आम्ही ॥
पक्षी अवचित अंगणांत आला । घेऊनियां गेला चारा तेणें ॥
हाटकरी आम्ही हाटासी पैं गेलों । फिरोनियां आलों गांवामाजीं ॥
नामा म्हणे नमूं सर्व जीववंत । दिसे ते अनंत दृष्टीपुढें ॥ २०९ ॥
गाणीं मी गाईलों भाटीं वाखाणिलों । जन्मोनियां झालों दास तुझा ॥
आतां माझी लाज राखें नारायणा । झणीं केविलवाणा देशोदेशीं ॥
माय तुम्हाविलों मोहें मोकलिलों । सोय पैं चुकलों संसाराची ॥
विषयां विटलों गोत्रजां तुटलों । जन्मोनि पैं आलों तुझे पायीं ॥
पढवरी सांडिलों प्रवृत्ती दंडिलों । मीपणा मुकलों मायबापा ॥
नामा म्हणे तुझ्या चरणाची आवडी । लागली न सोडीं चित्त माझें ॥
नको गा मोकलूं दीना पंढरिनाथा । तुजविण आतां कोण धांवे ॥
अपराधरूपा कोठीं पाहूं नको कांहीं । येगे विठाबाई भक्तकरी ॥
माझ्या बोलासाठीं पाठमोरा होसी । पावन जीवासी करी बोळ ॥
नामा म्हणे जननी तूंचि चराचर । तारिले अपार जड जीव २११
तुझा विष्णुदास म्हणतासी जरी । नाहीं माझे अंगीं प्रेमभावो ॥
तेणें थोर लाज वाटे पंढरिराया । जे माझ्या हृदया एक वेळां ॥
द्वैताद्वैतभाव आहे माझे ठायीं । अनुभव नाहीं स्वरूपाचा ॥

देखावेखी बैसे संतांचे संगती । नाहीं माझे चित्तीं ध्यान तुझें ॥
नामा म्हणे माझा उजळ करीं माथा।भेटी देउनि संतां निरवीं मज ॥
थरे स्फुरती भुजा दंड वक्षस्थळ । हर्षे नेत्रकमळ विकासले ॥
आनंदें रोमांच उभारले अंगीं । क्षेम दे गा वेगीं भक्तराया ॥
मज नानारूपें तुमचेनि संभ्रमें । केलीं जन्म कर्मे असंख्यात ॥
तुमचे आवडी असे मी विकिला । नुठसी कां वहिला आलिंगना ॥
हृदयींचें गुज सांगतों सकळिकां । तेणें मज सुख होईल जीवा ॥
परतोनि दिठी पाहे आळुमाळ । तेणें हरे सकळ श्रम माझा ॥
भक्तजनवत्सल भक्तांचा विसांवा । भक्ताचिया भावा भुलला कैसा
कटीं कर ठेवूनि उभा पुंडलिका द्वारीं।नामया स्वामि हरि न विसंबे॥
भेटिलागिं माझा फुटतसे प्राण । काया वाचा मनें जीवेंभावें ॥
जया देखें तया पुसें हेचि मात । कैं मज अनंत बोलावील ॥
संतसमागमें दसरा दिवाळी । ठेवूनि निढळीं वाहें सदा ॥
सखे पंढरीचे येती वारकरी । आर्ते निरंतरी त्यांचे पायीं ॥
नामा म्हणे ऐसे करीं दंडवत । आमुचे पुनीत मायबापा ॥२१४॥
वेदपरायण मनीं तो ब्राह्मण । चित्त समाधान संतुष्ट सदा ॥
येरा माझें नमन सर्वसाधारण । ग्रंथाचें राखण म्हणोनियां ॥
शास्त्रज्ञपंडित तोचि मी बहुमानी।जो आपणांतें जाणोनि तन्मय झाला
पुराणिक ऐसा मानितों कृतार्थ । विषयीं विरक्त विधी पाळी ॥
मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास । मी त्याचा दास देहेंभावें ॥
नामा म्हणे ऐके कई भेटविसी विठ्ठला । त्यालागीं फुटला प्राण माझा
जैसा वृक्ष नेणे मान अपमान । तैसे ते सज्जन वर्तताती ॥
येऊनीयां पूजा प्राणि जे करिती । त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ॥
अथवा कोणी प्राणि येऊनि तोडिती । तया न म्हणती छेदूं नका ॥
निंदास्तुति सम मानिती जे संत । पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे ॥
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी । तरी जीव शिवा गांठी पडूनि जाय

मंत्रयंत्र दीक्षा सांगतील लक्ष । परि राम प्रत्यक्ष न करी कोण्ही ॥
प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय । आणिकांची काय चाड मज ॥
सर्व कामीं राम भेटविती मातें । जीवेंभावें त्यातें ओंवाळीन ॥
नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला । सोइरा भेटला अंतरींचा ॥
ज्याचियारे मनें देखियेलें तुज । त्याची लोकलाज मावळली ॥
नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म । वर्णाश्रमधर्म सुख दुःख ॥
नाहीं देहस्फूर्ति जाती कूळ भेद । अखंड आनंद ऐक्यतेचा ॥
नामा म्हणे त्याचे चरणरज व्हावें । हेंचि भाग्य द्यावें केशिराजा॥ २१८
सांडोनि अभिमान झालों शरणागत । ऐसियाचा अंत पहासी कांई ॥
माझे गुण दोष मनीं गा न धरीं । पतीतपावन जरी म्हणविसी ॥
पडलिया पापराशी झणीं देसी देवा । हे लाज केशवा कोणाची जी ॥
नामा म्हणे देवा चतुरा शिरोमणी । लेंकुरा होसी झणी मायबापा ॥
वासनेचा फांसा पडिला माझे कंठीं । हिंडलों जगजेठी नाना योनी ॥
सोडवीं गा देवा दीनदयानिधी । मी एक अपराधी दास तुझा ॥
शरण आलियाचे न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण तुज साजे ॥
त्रिभुवनीं समर्थ उदार मनाचा । कृपाळू दीनाचा ब्रीद तुझें ॥
गजेंद्र गणिकेची राखिली तुवां लाज । उद्धरिला द्विज अजामेळ ॥
नामा म्हणे देवा अव्हेरसी मज । तरी थोर लाज येईल तुजा ॥
तुज रीतीं गातां नयेसी पांडुरंगा । प्रेमेंचि वढें गा पायांपाशीं ॥
वांकुडें तिकडें जैसें आलें तैसें । गावया उल्हास उजवला ॥
त्याचि भरें तोंडा आलें तें बोललों । नाम सुखें केलों अखंडित ।
तुझा म्हणविलों सांभाळावें देवा । नामया केशवा सर्वकाळ ॥ २२१ ॥
अपराधाच्या कोडी हेंचि माझी जोडी । पतीत पावन थोडी तुसी देवा ॥
माझियाति दैवें ऐसेंचि घडलें । तूं तंव आपुलें न सांडिसी ॥
सकळ अपराध माझी माझे पोटीं । तारीं जगजेठी म्हणे नामा ॥
देवा माझें मन ठेवीं तुझे चरणीं । पाहीं माझें मनीं रूप तुझें ॥

मज या लोकांचा शीण असे मनांतु । तुजाचि चिंतीतु हृदयकमळीं॥
चंदनाच्या हतीं वेधलें तरुवर । सबाह्य अभ्यंतर काय झालें ॥
सरिता सिंधुमाजीं मिळोनि लपाली । नामा म्हणे तैसी परि झाली॥
काय अपराध पाहसी कोणाचे । धांवे भाविकांचे कामकाजीं ॥
काय केशीराजा वाणूं मी तुमचें । शरणागता लळे पुरविसी ॥
पतीतपावन ब्रीद चराचरीं । तेथें मी भिकारी कोणीकडे ॥
नामा म्हणे तूंचि करिशी उद्धार । मज देवा पार नाहीं भाग्या॥२२५

काय करूं आतां देवा विश्वंभरा । मजलागीं थारा नाहीं कोठें ॥
स्वगोत्र सोयरीं धायरीं समस्त । काय करूं अंत पहाती माझा ॥
तूंचि मातापिता गुरुबंधु होसी । जाऊं मी कोणासी शरण आतां ॥
पायीं थारा मागे नाम्याची विनंती । चित्त या श्रीपती आतां देसी॥
संसारीं गांजलों म्हणोनि शरण आलों । पाठीसि रिघालों देवराया॥
कळिकाळा वास पाहों न देसी । भरंवसा मानसीं आहे मज ॥
नामा म्हणे देवा स्वामिया तूं एक । आवडता सेवक करीं मज॥२२६

जन्ममरणाची कायसी हे चिंता । तुझ्या शरणागता पांडुरंगा ॥
वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कवण ॥
हृदयीं तुझें रूप बिंबलें साचार । तेथें कवण पार संसाराचा ॥
नामा म्हणे तुझ्या नामाचा परिवार । असतां कळिकाळ पायांतळीं॥ [illegible]

अनाथाचा नाथ भक्तांचा कैवारी । पुराणीं हे थोरी आयकिली ॥
ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारीं दुःखासी केशिराजा॥
त्रितापें तापलों दुःखें आहळलों । कासाविस झालों दयासिंधू ॥
तुजवीण आतां कोणातें मी सांगूं । तोडीं हा उद्वेगु नारायण ॥
नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । धांवरी त्वरित पांडुरंगा॥२२८॥

असिसांजि पडे बाळू । माता धांवे कनवाळू ॥
तैसा धांवें मासिया काजा । आकंदा मी बाळ तुझा ॥

कवेंचि झेंपावे पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणी ॥
भुकेलें वत्सरावें । धेनु हुंबरत धांवे ॥
वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतीत हरणी ॥
नामा म्हणे मेघा जैसा । विनविती चातक तैसा ॥ २२१ ॥

तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । नेलें माझें मन षड्वर्गीं ॥
धांव गा विठ्ठला सोडवीं आपुला दास । थोर कासावीस केलें बापा ॥
कामें कुळाचार क्रोध हा अनिवार । मदें निरंतर भ्रांत केलें ॥
मत्सरें तुजसि दुराविलें देवा । लोभें केला गोवा गर्भवासीं ॥
दंभ रसातळीं जातसे घेऊनि । विश्वचक्षु होऊनि पाहसी कैसा ॥
नामा म्हणे मज तुझाचि भरंवसा । अनाथा कुंवसा होसी देवा ॥
काया मनें वाचा मेणों भक्तिभाव । करिसी उपाव केशिराजा ॥
चोरपणासाठीं मन घे हव्यासु । मी तो कासाविसु होय देवा ॥
सर्वभूतांमाजीं समत्व दिससी । नामा म्हणे ऐसी दावी लीला ॥
येणें भाकें कांहीं करूं कैसी सेवा । हें तों मज देवा समजेना ॥
करूं कैसा जप करूं कैसें ध्यान । नाहीं माझें मन स्थिर देवा ॥
कामक्रोध यांची मोठी हे जाचणी । झालों वेडावाणी समजेना ॥
नामा म्हणे माझे सांवळे विठाबाई । घेऊनियां राहीं हृदयामाजीं ॥
अज्ञान बापुडें नेणें कांहीं वेडें । जन्मोनि सांकडें तुजचि देवा ॥
जाणसी तें करीं कृपाळु बा हरी । लाज सर्वांपरी आहे तुज ॥
मी तंव अपराधी आहें लक्षकोटी । परी म्हणवितों जगजेठी दास तुझा ॥
नाहीं तुझी सेवा केली मनोभावें । लोभ दंभ गर्वें भ्रांत सदा ॥
बहुतां मुखीं तुझी ऐकिली बा कीर्ति । दीनानाथ म्हणती आर्तबंधु ॥
नामा म्हणे मज मोकलिसी झणीं । अनाथ म्हणवूनि पाळीं देवा ॥
हेंचि माझी संध्या हेंचि माझें ध्यान । तुझ्या पायीं मन लागो देवा ॥
हेंचि माझी रिद्धि हेंचि माझी सिद्धि । अखंड समाधी पाय तुझे ॥
नामा म्हणे हेंचि देईं श्रीपति । कर्माची निभ्रांति जन्मोजन्मीं ॥

हेंचि देवा पैं मागत । चरणसेवा अखंडित ॥
वास द्यावा पंढरीचा । सदा संग हरिदासांचा ॥
जन्म होका भलते याति । परि मी न चुकें हरिभक्ति ॥
नामा म्हणे कमळापति । हेंचि द्यावें पुढता पुढती ॥ २२५ ॥

माझें मागणें तें किती । दाता लक्षुमीचा पति ॥
मेघ वर्षे मुसळाधारी । तेथें चातक चंचुभरी ॥
महाडोह गंगाजळ । तृप्त एखादा अंजुळ ॥
साखरेची साठी । तेथें मुंगीची मुखवटी ॥
नामा म्हणे मी सेवेसी । तूं तो उदाराचा राशी ॥ २२६ ॥

मुक्तिपद मी या अभिलाषीं न चित्तीं । क्षणीं अंतरती पाय तुझे ॥
निर्वासना चित्तें भजन तुझें करितां । क्षणीं सायुज्यता देसी मज ॥
मग मी काय करूं वैकुंठनायका । ऐशा प्रेमसुखा कोठें पाहों ॥
ध्यान सुखें करूं पाहें हृदयकमळीं । पाक्षिणी ऐशी आळी करशी क्षणीं ॥
संकल्पें यावें वाटे चरणाजवळी । विकल्प काजळी क्षणीं देशी ॥
नामा म्हणे आतां कांहींच मी न करीं । मज होत कोटीवरी गर्भवास ॥

तुझें भक्तिसुख द्यावें मज प्रेम । वसो तुझें नाम माझे मुखीं ॥
सद्भक्ति विचार राहो माझे चित्तीं । हेंचि कृपामूर्ति द्यावें मज ॥
तुझा दास जनीं म्हणवितों विख्यात । पसरिला हात फिरवूं नको ॥
नामा म्हणे देवा इतुकें द्यावें मज । पैकोनि केशवराज काय बोले ॥

माझिया मनासीं म्यां केला विचार । तेणें मज निर्धार सांगितला ॥
मज नलगे मुक्ति नलगे ब्रह्मज्ञान । सांडोवा होईन पंढरीचा ॥
इंद्रियां मारितां येती काकुळती । तुज ओळगूं म्हणती ठायीं ठायीं ॥
श्रवणीं श्रवण अखंड तुझी कीर्ति । विश्व विठ्ठल मूर्ति देखेन डोळां ॥
नामामृतें रसना निवाली त्या सुखें । नाठवती दुःखें जन्मांतरींचीं ॥
नामा म्हणे ऐसा कोण भाग्यहीन । जो धरी वासना वैकुंठीची २२९

वतन आमुची मिरासी पंढरी । विठोबाचे घरीं नांदणूक ॥
सेवा करूं नित्य नाचूं महाद्वारीं । नामाची गजरी जागऊं तेथें ॥
साधुसंतां शरण जाऊं मनोभावें । प्रसाद स्वभावें देती मज ॥
नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संत पाय हिरे देती वरु ॥२४०॥
संकल्प विकल्प निरसूनियां भ्रांति । दावीन विश्रांति अभिनव तुज ॥
सर्वभावें माझी धरूनि आवडी । आस तूं रे सोडी इंद्रियांची ॥
जें जें विषयसुख लागेल तुझे मनीं । तें तूं देवा घालुनी घेई मज ॥
श्रवण घ्राण रसना त्वचा आणि लोचन । हे सकळ होऊनि मीचि भोगीं ॥
यासाठीं तुज न घालीरे सायास । धरिं माझा विश्वास दृढ मनीं ॥
अंतरींचें गुज बोलोनि पंढरिनाथ । आलिंगन देत नामयासी ॥२४१॥

---

## भक्तिमाहात्म्य.

(नामदेव).

पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । विठ्ठला भेटावें जीवलगा ॥
कायावाचामन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥
बाहेरी भीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलावें [illegible] ॥
चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥२४२॥
राम म्हणतां रामचि होसी । भाक घेई मजपाशीं ॥
लवण समुद्रीं जाता मागे । तेंहि समुद्र झालें अंगें ॥
वात दीपासंगें पेटी । तेंहि दीप अंगें झाली ॥
नामा म्हणे भाविक लोकां । नाम घेतां राहूं नका ॥२४३॥
नित्य नेम आम्हां चिंतन श्रीरामा । आणिक उपमा नेणों नेणों ॥
बळकट धरिं भूल भाव निर्धारीं । दिसे चराचरीं हरिरूप ॥
जें जें पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टी । हरिरूपीं भेटी देखि दिसे ॥
नामा म्हणे विठ्ठल सर्वभूतीं आहे । आणिक उपाय न जाणती ॥२४४॥

साठी घडीमाजी । एक वेची देवकाजीं ॥
आराणूक सारूनि काजीं । सर्वभावें केशव पूजी ॥
होचि भक्तीचें लक्षण । संतोषला नारायण ॥
कोटि कुळें पावन तुझीं । नामा ह्मणे भाक माझी ॥ २४५ ॥

गुरूच्या वचनें होईल पैं ज्ञान । न कळे प्रेम खूण विठोबाची ॥
वेदीं हें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेम भाव ॥
साधकासी सिद्धि होईल पैं प्राप्ति । न कळे निरुति प्रेम खूण ॥
नामा ह्मणे सोडा जाणीवेचा सीण । संतांची हे खूण जाणे संत२४६॥

---

## भक्ति.

(जनाबाई.)

गंगा गेली सिंधुपाशीं । त्याणें अव्हेरिलें तिसी ॥
तरी तें सांगावें कवणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला ॥
जळ काय जळचरा । माता अव्हेरी लेंकुरा ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ २४७ ॥

माझी आंधळ्याची काठी । अडकली कवणे बेटीं ॥
आतां सांगूं मी कवणाशी । धांवें पावें हृषीकेशी ॥
तुजवांचुनी विठ्ठला । कोणी नाहींरे मजला ॥
माथा ठेवी तुझे चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ २४८ ॥

कां गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ॥
मायबाप तूंचि धनी । मला सांभाळी निर्वाणीं ॥
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें किती मी पामर ॥
दीनानाथा दीनबंधू । जनी म्हणे कृपासिंधू ॥ २४९ ॥

नाहीं केली तुझी सेवा । दुःख वाटतसें माझे जिवा ॥
नष्ट पापीण मी हीन । नाहीं केलें तुझें ध्यान ॥

जें जें दुःख झालें मला । तें त्वां सोसिलें विठ्ठला ॥
रात्रंदिवस मजपाशीं । दळूं कांडूं लागलासी ॥
क्षमा करावी देवराया । दासी जनी लागे पाया ॥ २५० ॥
अहो नारायणा । मजवरी कृपा कां कराना ॥
मी तो अज्ञानाची राशी । म्हणोन आलें पायांपाशीं ॥
जनी म्हणे आतां । मज सोडवी कृपावंता ॥ २५१ ॥
अविवेकाच्या वो पाशीं । आकळलों अंधारीं ॥
वेधुनी काढावें गोविंदा । यशोदेच्या परमानंदा ॥
तुझे सन्निधेचे पाशीं । ठाव नाहीं अविद्येसी ॥
तुझे संगतीं पावन । उद्धरिले अधमें पूर्ण ॥
अजामेळ शुद्ध केला । म्हणे दासी जनी भला ॥ २५२ ॥
मी वत्स माझी गायी । नये आतां करूं काई ॥
तुम्ही तरी सांगा कांहीं । शेवटीं निमवा विठाबाई ॥
वेडी माझिये हरणी । चुकलें पाडस दासी जनी ॥ २५३ ॥
सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पायां ॥
ऐसें करीं अखंडित । शुद्ध प्रेम शुद्ध चित्त ॥
प्रेम माझ्या चित्ता । द्यावें लागो पंढरिनाथा ॥
जावें ओंवाळूनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ २५४ ॥
माय मेली बाप मेला । आतां सांभाळीं विठ्ठला ॥
मी तुझें गा लेंकरूं । नको मजशीं अव्हेरूं ॥
मतिमंद मी तुझी दासी । ठाव द्यावा पायांपाशीं ॥
तुजविण सखें कोण । माझें करील संरक्षण ॥
अंत किती पाहसी देवा । थोर श्रम झाला जीवा ॥
सकळ जिवांच्या जीवना । म्हणे जनी नारायणा ॥ २५५ ॥
काय करूं या कर्मासी । धांव पाव हृषीकेशी ॥
जन्म होतो आयुष्याचा । तुझें नाम नये वाचा ।

काय जिणें या देहाचें । अखंड अवघ्या रात्रीचें ॥
व्यर्थ कष्टविली माता । तुझें नाम नये गातां ॥
जन्ममरणाचें दुःख । म्हणे जनी दाखवी मुख ॥ २५६ ॥

वाट पाहतें मी डोळां । कां गा न येसी विठ्ठला ॥
तूं वो माझी निज जननी । मज कां टाकियेलें वनीं ॥
धीर किती धरूं आतां । कव घालीं पंढरिनाथा ॥
मला आवड भेटीची । धनी घेईन पायांची ॥
सर्व जिवांचे स्वामिणी । म्हणे जनी माय बहिणी ॥ २५७ ॥

कां गे निष्ठुर झालीसी । मुक्या बाळातें सांडिसी ॥
तुज वांचोनियां माये । जीव माझा जावों पाहे ॥
मी वत्स माझी माय । न ये आतां करूं काय ॥
प्राण धरियेला कंठीं । जनी म्हणे देईं भेटी ॥ २५८ ॥

माझिये जननी हरिणी । गुंतलीस कवणे वनीं ॥
मुके तुझें मी पाडस । चुकलें माय पाहें त्यास ॥
चुकली माझिये हरिणी । फिरतसे रानोरानीं ॥
आतां भेटवा जननी । विनवितसे दासी जनी ॥ २५९ ॥

देहाचा पालट विठोबाची भेटी । जळ लवणा गांठीं पडोन ठेली ॥
धन्य मायबाप नामदेव माझा । तेणें पंढरिराजा दाखविलें ॥
रात्रंदिवस भाव विठ्ठलाचे पायीं । चित्त ठायींचे ठायीं मावळलें ॥
नामयाचे जनी सानंद पैं झाला । भेटावया आला पांडुरंग ॥२६०॥

पंढरीचें सुख पुंडलिकासीं आलें । तेणें हें वाढिलें भक्तालागीं ॥
भुक्ति मुक्ति वरदान दिधलें । तेंहि नाहीं ठेविलें आपणापाशीं ॥
उदार चक्रवर्ती बाप पुंडलिक । नामें विश्वलोक उद्धारिले ॥ २६१॥

विठो माझा लेंकुरवाळा । संगें लेंकुरांचा मेळा ॥
निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ॥

पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥
गोरा कुंभार मांडिवरी । चोखा जीवा बरोबरी ॥
बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥
जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ २६२ ॥
वेदांतीं हें बोलिलें । सिद्धांतीं हें नेमियेलें ॥
लागा लागा भक्तिवाटा । धरा हेंचि नेमनिष्ठा ॥
वेदबाह्य तें कर्म । सांडी न करी अधर्म ॥
बोचि एक होय ज्ञानी । देवनिष्ठ म्हणे जनी ॥ २६३ ॥

---

## भक्तवत्सलता.

(नामदेव).

आपुली पदवी सेवकासी द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग ॥
नामाचा आळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥
प्रेमाच्या जिव्हाळा नामाची आवडी । क्षणएक सोडी संग त्याचा ॥
नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥ २६४
देव कृपानिधि भक्तांचा कैवारी । नामसाठें तारी सर्वांलागीं ॥
तया देवराया नामें ही आवडी । लागी मनीं गोडी सर्वकाळ ॥
नाहीं यातिकूळ उंच नीच भेद । भाव एक शुद्ध पाहातसे ॥
नामा म्हणे काय सांगावें नवल । अखंड दंडलें व्योमाकार ॥ २६५ ॥
नाचतां वळतां रडतां पडतां । नामया अवचितां हासें आला ॥
बैसें जातां हरि हरि हरि वाटे । नाम तें चोखटें स्मरा मुखीं ॥
खेळतां खेळतां घरीं वारीं पारीं । मुखीं हरि हरि म्हणे बारे ॥
खातां जेवितां अनन्ति वाटी । सांडी मांडी हरि सर्वकाळ ॥
नामा म्हणे नामीं आसिनांतिल ठसा । केशव हरि सन्मुख तुम्हां दिसे
त्यासी आहे नाहीं पहातां क्षण एक । संपत्तीचें सुख विषय हा ॥

हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥
संपत्तीच्या बळें एक झाले आंधळें । वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं ॥
एक विद्यावंत जातीच्या अभिमानें । नेलें तमोगुणें रसातळा ॥
मिथ्या माया मोह करोनी हव्यास । वेंचिलें आयुष्य वांयांविण ॥
नामा म्हणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवी केशवा मायबापा ॥
ब्रह्मांडनायक विश्वाचा गोसावी । तो केला पांडवीं म्हणियारा ॥
भावाचा लंपट भक्तां पराधीन । सोडोनी अभिमान दास्य करी ॥
भाजीचिया पानां संतोषला हरी । जयाचे उदरीं चौदा भुवनें ॥
जनक श्रुतिदेवें धरियेला करीं । दोघांचिये घरीं घेतो पूजा ॥
पुंडलिकें कैसों टाकियेली वीट । तैसेंचि वैकुंठ वसविलें ॥
नामा म्हणे तुम्ही विठ्ठलचि धरा । चरणीं तुम्हां थारा देईल देवा २६८

(जनाबाई.)

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥
आंगा आपुलें ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी ॥ २६९ ॥

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥
घार हिंडे आकाशीं । झांप घाली पिल्लांपाशीं ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥
वानर हिंडे झाडावरी । पिली बांधोनी उदरीं ॥
तैसी आम्हांसी विठ्ठल माये । जनी वेळोवेळां पाहे ॥ २७० ॥

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तांचा कळवळा ॥
त्याचा झाला म्हणीयारा । राहे घरीं धरी थारा ॥
देह बाटविला त्याणें । हांसे जनी गाय गाणें ॥ २७१ ॥

भक्तीसाठीं याति नाहीं । नाहीं तयासी ते सोई ॥
रोहिदास तो चांभार । त्याचा करी कारभार ॥
जो कां भक्त यातिहीन । देव करी त्याचा मान ॥
त्यासी भक्तांचा आधार । वाट पाहे निरंतर ॥
जनी म्हणे भक्तांसाठीं । विठो सदा गोण्या लोटी ॥ २७२ ॥

( जनार्दन ).

भक्ति नाहीं ज्यासी तो चांडाळ पतित । तोची जाणावा कुटिल नष्ट येथें ॥
प्रपंचकर्दमीं बुडोनिया ठेले । संताविण उगले फजील होती ॥
पुत्र मित्र कांता मानुनी भरंवसा । याचा मोह फांसा जन्मवरी ॥
एका जनार्दनीं अंतीं आहे कोण । न कळे संतांविण निश्चयेसी २७३
व्यापुनीयां भरला देव । रिता ठाव कोठें पा ॥
तयाचें करावें चिंतन । मग तुम्हां न पडे न्यून ॥
नामें वदा विठ्ठल साचा । सोहळा त्याचा अंतकाळीं ॥
मागें पुढें उभा असे । एका जनार्दनीं दिसे ॥ २७४ ॥
मायेचा आठवा बाळावरी जैसे । तैसा धरा देवो मनीं सदा ॥
बाळा पाहुनीयां माता संतोषत । तैसी धरा हेत देवावरी ॥
नोवडें सावडें असोच तें बाळ । तैसा धरा कळवळ देवावरी ॥
एका जनार्दनीं देव धरा मनीं । आसनीं शयनीं विसरूं नका २७५
वत्सालागीं गाय धाऊनी येतसे । तैसें असो पिसें देवाठाई ॥
पाडस चुकलीं हरीण पाहे वास । तैसा धरा आस देवाठाई ॥
मातेलागीं चुके बाळ पडुळतें । तैसें देवापरतें न धरा मनीं ॥
एका जनार्दनीं देव करा सखा । प्रपंच पारिखा सहज तेणें ॥२७६॥
भोळा देव भोळा देव । जंव नेणीं भाव ॥
चोखीयाच्या मागें धांवे । ढेढे कबिराचे विणावे ॥
सुरदूर जाये वोनवासी । नाहीं देवो नेदी कोणासी ॥

भावाचेसि घळें जीवपण वोवळें । मन हें सोंवळें ब्रह्मसाम्य ॥
एका जनार्दनीं भावाचि कारण । सच्चिदानंदावरी खूण दाविली ते ॥

देह सांडावा ना मांडावा । येणें परमार्थुची साधावा ॥
जेणें देहीं वाढे भावो । देहीं दिसतसे देवो ॥
ऐसें देहें भजन घडे । त्रिगुणात्मक स्वयें उडे ॥
त्रिगुणात्मक देहो वावो । एका जनार्दनीं धरा भावो॥२७९॥

उंच उंचपण नीचा नीचपण । तें नाहीं कारण विठ्ठल भेटीं ॥
उंच नीच याति असो भलते जाती॥विठ्ठल म्हणतां मुक्ति जडजीवां॥
उभारुनी बाहे कटीं कर उभा । एका जनार्दनीं शोभा विटेवरी ॥

(तुकाराम.)

भाग्यें ऐसी जाली जोडी । आतां घडी विसंबेना ॥
विटेवरि समचरण । संतीं खूण सांगितली ॥
अवघें आतां काम सारूं । हाचि करूं केवाड ॥
तुका म्हणे खंडूं खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥ २८१ ॥

आम्ही पद्मा कैसीं एकतत्त्व जालों । राखणें लागलों वासतेसी ॥
तुम्हांविण कांहीं नावडावें जीवा । केला तोचि देवा केला पण ॥
वर्म नेणों परि वृत्ति भंगों नेदूं । वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥
तुका म्हणे कळे नामाचें जीवन । वारवाही भिन्न नेणों आतां ॥२८२॥

आम्हां एकविधा पुण्य सर्वकाळ । चरण सकळ स्वामीचे ते ॥
चित्ताचे संकल्प राहिलें चळणं । आज्ञा तें प्रमाण करूनी असों ॥
दुजियापासून परतलें मन । केलें यावें पात होईल तें ॥
तुका म्हणे आतां पुरला नवस । एकाविण ओस सकळही ॥२८३॥



एकविध आम्ही न धरूं पालट । न संडूं हे वाट सांपडली ॥
म्हणवूनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धीबळ पाय तुझे ॥
बहुत बोलतां न कळे प्रकार । अंतरा अंतर साक्ष असे ॥
तुका म्हणे आगा जीवांच्या जीवना । तूंचि नारायणा साक्षी माझा ॥
नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें । स्वामिसेवा काज निर्धार हा ॥
आज्ञा तें प्रमाण हा मनीं निर्धार । येणें फिटे भार निश्चयेसी ॥
आळी करूं आम्ही एकविध चित्तें । तैसें होऊं येतें मायबापें ॥
तुका म्हणे माझी हे जातीची सेवा । चालवितसे देवावरी भार २८५॥
परपीडक तो आम्हां दावेदार । चिंतीं विश्वंभर म्हणऊनि ॥
वंचूं त्यागूं बळें मावळोकूं डोळा । राखूं तो चांडाळा ऐसा दुरी ॥
अनाचार कांहीं न साहे अवगुण । बहु होय मन कासाविस ॥
तुका म्हणे माझी एकविध सेवा । विमुख तें देवा वाळी चित्तें ॥२८६
लौकिकापुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केशवा दास तुझा ॥
म्हणऊनि करीं पायांसवें आळी । आणिक वेगळी नेणें परि ॥
एकविध आम्ही स्वामिसेवेसाठीं । वरि तोंचि पोटीं एकभाव ॥
तुका म्हणे करीं सांगितलें काम । तुम्हां धर्माधर्म ठावे देवा॥२८७॥
आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासूनियां ॥
पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥
पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥
तुका म्हणे नेत्रीं केलें ओळखण । सदस्थ तें ध्यान विटेवरी॥२८८॥
[illegible] नव्हे ताक पशूचें पाळण । त्यामध्यें कारण घृतसार ॥
तैसें धन आम्हां भाविकांचे हातीं । म्हणऊनि चित्तीं धरिला राम॥
कोंडी कण पारा जमीचिया काजें । येन्हवी तें ओझें कोण वाहे ॥
तुका म्हणे खोटीं माझ्या जतन । जोंवरि हें धन हातीं लागे॥२८९
न कळे जी भक्ति काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें ॥
वोणोनिया कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥

तुझांचे गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥
बाळ मायेवीण क्षणही न राहे । न देखतां होये कासाविस ॥
आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥
नावडती तया बोल आणिकांचे । देखोनियां नाचे माय दृष्टी ॥
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली।आणिकांचे बोलीं चाड नाहीं॥२९२
हेंचि सर्व सुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां ॥
हेंचि एक सर्व साधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥
न लगती कांहीं तपांचिया रासी । करणें वाराणसी नाना तीर्थें ॥
कल्पना हे तीळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्यांच्या ॥
तुका म्हणे नामें देव नेदी भेटी । म्हणे त्याचे होंटीं कुष्ठ होय॥२९३
विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल हा चित्तीं बैसलासे ॥
विठ्ठलें हें अंग व्यापिली हे काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥
सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तेंही करी ध्यान विठोबाचें ॥
तुका म्हणे या विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥ २९४॥
विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥
विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥
विठ्ठल जागृती स्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठ्ठलेंविण ॥
भूषण अलंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार जयां नरा ॥
तुका म्हणे तेही विठ्ठलचि जाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥२९५॥

एक धरिला चित्तीं । आम्हीं रखुमाईचा पती ॥
तेणें जालें अवघें काम । निवारला भवभ्रम ॥



परद्रव्य परनारी । जाली विषाचीये परी ॥
तुका ह्मणे फार । नाहीं लागत व्यवहार ॥ २९६ ॥

देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपत्ति ज्या ज्या कांहीं॥
येथे माझी वाचा पुढें कांहीं वाव । आणि तुझें भाव बोलायाचे ॥
मनाची वांटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥
तुका ह्मणे येई विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल ॥२९७॥

मज अभयदान देई तूं दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं तुझें नेणें ॥
सेवा भक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥
तुका ह्मणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्तन विठोबाचें ॥२९८॥

काम क्रोध आह्मीं वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥
आतां कोण पाहे मातें परतोनि । गेला हारपोनि देहभाव ॥
रिद्धिसिद्धि दुःखें हाणितल्या लाता । तेथें या मुक्तता कोण मानी॥
तुका ह्मणे आह्मी विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा॥

(निळोबा.)

परम कृपेचा सागर । भक्तवत्सल करुणाकर ॥
ऐसी वाणिती वेदें । भक्तिकाजीं निज वैभवें ॥
म्हणवी दासाचा अंकित । शरणागतां शरणागत ॥
निळा म्हणे साचचि करी । न वसे पासुनी दया दुरी॥३००

निस्सीम भाव देखोनियां हरी । केली स्वीकारी पूजा त्याची ॥
पत्र पुष्प तोय फळ । धाली सकळ सुखीचि तें ॥
कांहींच नेघे जाऊं वांयां । पाहे भक्तांचिया हाताकडे ॥
निळा म्हणे संतोष त्यासी । क्षीराब्धीहुनी परमामृता ॥ ३०१ ॥

सदा सेवकांचा लाभ । पुरवा करुनियां कोड ॥
जैसी कृपावंत माय । तान्हयाच्या धणी धाय ॥

घरीं दारीं वसे हरी । विश्वभरी भाव ज्या ॥
निळा ह्मणे संदेह नाहीं । भक्तां पाहीं यावरी ॥ २०३ ॥
भक्तांचाचि वोरस देवा । धांवे सेवा करूं त्यांची ॥
जें जें गोड वाटे मनीं । तें तें वदनीं भरी तयां ॥
अपूर्व तेथें पूर्ण करी । पुरवी कामारी होउनी ॥
निळा ह्मणे रक्षी हेत । उभा तिष्ठत त्यांपाशीं ॥ २०४ ॥
न विसंबे त्या घटिका पळ । त्याचिपाशीं सर्वकाळ ॥
उत्तीर्णत्वालागीं हरि । त्याची परिचर्या करी ॥
न ह्मणे दिवस रात्रीं कांहीं । संचरोनि वसे त्याच्या देहीं ॥
निळा ह्मणे भक्तांघरीं । गणें नामें रूपें हरी ॥ २०५ ॥
आपणासमान केलें त्यासी । धरिलें ज्यासी निज हातीं ॥
ऐसा देवो कृपासिंधु । म्हणोनि बंधु दीनांचा ॥
हीनत्व देखोनि भक्तां अंगीं । लाजे जगीं त्याचेनि ॥
निळा म्हणे करुनी थोर । चालती बडिवार निजांगें ॥ २०६ ॥
अनुसारें भजती देवा । त्यांच्या भावा साक्षी तो ॥
म्हणोनियां मागें पुढें । धांवे कोडें सांभाळी ॥
भुके तान्हे करी चिंता । लागीं भेदी त्या अनवारा ॥
निळा म्हणे अंतरसाक्षी । सदा कैं पक्षी दासाचा ॥ २०७ ॥
देवासी दासाचा कळवळा । माये बाळावरी जैसा ॥
नेणे मोठीं भुक तहान । करें कुर्वाळोनि स्तन पाजी ॥
विठावेल म्हणोनि प्राण । निंबलोण उतरी त्या ॥
निळा म्हणे करोनी कोड । पाळी लाड प्रीतीनें ॥ २०८ ॥





भक्त करिती तैसा होय । ठेविला ठाय तया स्थळीं ॥
प्राचारिती भाविती जेथें । प्रगटे तेथें रूप धरी ॥
जे जे उपचार करिती भक्त । ते ते स्वीकारित बाळापरी ॥
निळा म्हणे भक्तांपाशीं । नाहीं यासी दुराग्रह ॥ २०९ ॥
भक्तहाका ऐकावया । पसरूनियां कान उभा ॥
कोणी गांजील एखादा । म्हणोनि गदा सांभाळी ॥
सर्वकाळ सावधान । निज जन रक्षणा ॥
निळा म्हणे पाळी वडी । भक्त तांतडी देखोनी ॥ २१० ॥
जिहीं धरती हरि मनीं । हृदयीं वदनीं रंजविला ॥
त्यांचा झाला अंकित ऐसा । घरिचा जैसा म्हणियारा ॥
न सांगतां करी सर्व । जाणे गौरव दासाचें ॥
निळा म्हणे दिवसनिशीं । त्याजपाशीं सर्वदा ॥ २११ ॥
जाणे सकळां अंतरींचा । भाव साचा मिथ्या तो ॥
तया करी तैसाचि मान । जैसें भजन ज्यापाशीं ॥
जेवीं एकाचि स्वातीजळ । सर्पी गरळ शिंपां मुक्तीं ॥
निळा म्हणे एकचि हरी । जैशापरी तैसाचि ॥ २१२ ॥
अवघें टाळूनि निमित्त । वरुनी बोलत आपण ॥
ऐसीं करितो हरि लाघवें । सर्वांहि ठावें सर्वज्ञा ॥
बुद्धि बुद्धीचा हा जनिता । स्फूर्ति प्रसविता स्फूर्तीचा ॥
निळा म्हणे आपुल्या गोष्टी । तया आवडी स्वजनाची २१३
ऐसें ऐकोनियां उत्तर । देव म्हणे उदार थोर तुम्ही ॥
तुमच्याचि काजा कराया येणें । मजलागीं घडणें अवतार ॥
तुम्ही साहे मी तुमचा । आहेचि ठायींचा ऋणानुबंध ॥
निळा म्हणे देवभक्तां । ऐसी एकात्मता हो सरली ॥२१४॥

काही कार्य मांडेल जेव्हां । मजचि प्रगट होणें तेव्हां ।
जवळिच आहे भिऊं नका । माझिया बळें दुर्जन लोकां ॥
तुम्हां गांजिती द्वेषिती । त्यांची समूळ विनशति ॥
निळा म्हणे भगवद्वाणी । ऐसी प्रविष्ट झाली श्रवणीं ॥ २१५ ॥
भक्तीं आराधिला देव । जाणवला भाव देवासीं तो ॥
बहुत बरवें म्हणती भक्ता । न वजे परता जवळूनियां ॥
सुखी असा माझ्या बळें । पुरवीन ललें इच्छाल ते ॥
निळा म्हणे कृपाळु हरी । भक्तांवरी तुष्टमान ॥ २१६ ॥
देवाचें वर्म सांपडला भाव । नवजाये जवळुनी आकळला देव ॥
देव म्हणे माझी नव्हेचि सुटका । भावेंविण म्हणती देवोचि लटिका ॥
वर्म हें यासी दाविलें कोणें । संतांसी ठाउकें येर कोणीही नेणें ॥
निळाम्हणेभक्तासीतिहीँचिदाविलें । न सोडिती आतां जिवेंसीबांधलें ॥
कैसेनि आकळतें मन । देवावीण भक्तांचें ॥
काम क्रोध लोभा शांती । कैसेनि होती मना त्याची ॥
काळदंड चुकविता । कोण होता देवावीण ॥
निळा ह्मणे मोकळा भक्तां । करूनि ठेविती कोण पदीं ॥ २१८ ॥
देवामाजीं भक्त असे । भक्ता अंगीं देव दिसे ॥
ऐशी परस्परें मिळणी । जेवीं प्रभा आणि तरणी ॥
भक्त देवा तेचि भजती । देवें भक्तीं ठेविली प्रीति ॥
निळा ह्मणे एकपंक्ती । जैसा अळंकार कनकीं ॥ २१९ ॥
देव चालिला सांगातें । भक्त जाती ज्या ज्या पंथें ॥
परम आनंद उभयतांसी । देव भक्तां सुखाच्या रासी ॥
चालतां मारगीं । कथा कीर्तन प्रसंगीं ॥
निळा ह्मणे देवभक्तां । परम विश्रांती चालतां ॥ २२० ॥
अंगीं ऐश्वर्य येऊनि बाणे । तुमचे भक्तीचीं लक्षणें ॥
तें तो मान्य होय जगीं । विघ्न वंदी तयालागीं ॥

शांती क्षमा आलिया वस्ती । संतलक्षणाची प्रशस्ती ॥
काम क्रोध मोडली चाली । सर्वभूतीं साम्यता झाली ॥
तुटोन गेले आशापाश । तुटोनि कल्पना निःशेष ॥
निळा म्हणे नाहीं ममता । कृपा तुमची ते अनंता ॥ ३२१ ॥
भूतीं भगवंत देखिला । मीतूंपण सहजचि गेला ॥
तुमचे कृपेची हे जाती । स्वरूपीं वेध झाला वृत्ती ॥
द्वेषाद्वेष निंदा भेणें । चिंता असूया पळती भेणें ॥
निळा म्हणे भूतमात्रीं । झाला कृपेसी तो पात्री ॥ ३२२ ॥
भक्त म्हणावें तयासी । न गुंते जो आशापाशीं ॥
अहंकार निरसिला । देहभाव पालटला ॥
निंदा स्तुति हे नावडे । पाहतां परब्रह्म आवडे ॥
निळा म्हणे तया ध्यातां । स्वानंद तो येत हातां ॥ ३२३ ॥
देश काळ वर्तमान । तया नाठवेचि भिन्न ॥
जया कृपावंत माय । विठाई कवळुनी राहे ॥
आपुलें पारिखें । नेणती ते इच्छासुखें ॥
निळा म्हणे केली । ओळखी ठायींची ते भली ॥ ३२४ ॥
नाहीं तरि संत सकळित कोणा । ते थोर कळाला सारखेचि ॥
नाहीं तेथें कामें क्रोधें । उपमा वाचे उच्चार ॥
न लगे पूजनासी धन वित्त । एकचि चित्त भाव पुरे ॥
निळा म्हणे उपदेश देती । कानीं सांगती विठ्ठल म्हणा ॥ ३२५ ॥
संतांचा वास जये स्थळीं । तेथें स्वप्नीं पापाची ॥
काम क्रोध जाती विलया । ममता माया देशधडी ॥
तृष्णेकल्पनेच्या गांव । वोस ठाव संदेहा ॥
निळा म्हणे अहंकारा । मदमत्सरां उरी नुरे ॥ ३२६ ॥
संतप्रसाद लाधले । तेचि धाले ब्रह्मरसें ॥
सदा नामीं जडली प्रीति । तेचि करिती उच्चार ॥

भाग्य भाग्य वोसंडलें । वैराग्य आलें सोहोनी ॥
निळा म्हणे अंगीं शांति । क्षमा विश्रांति ज्ञानाची ॥ ३२७ ॥
संतकृपा त्यांसीचि फळे । ज्यांचें चित्त वोळे परमार्थी ॥
काय उणें सुखा मग । संतसंग जोडतां ॥
देवाचि हातीं लागे तयां । संत जयां प्रसन्न ॥
निळा म्हणे संतांपाशीं । आहे अनायासीं सर्व सिद्धी ॥ ३२८ ॥
सोडोनियां जातीं पोतीं । कृपा करुनी दिधलीं हातीं ॥
संत उदार उदार । लुटविलें निज भांडार ॥
सायासें जोडिलें । निक्षेपींचें तें दाविलें ॥
निळा म्हणे उदारपणा । मेरु संतांच्या ठेंगणा ॥ ३२९ ॥
केली पायवाट । उल्लंघिला मायाघाट ॥
जिहीं हरी आठविला । जिवें हृदयीं धरिला ॥
जिंकोनियां काळा । वरि गेले भूमंडळा ॥
निळा म्हणे ब्रह्मीशान । पावोनी लाविलें निशाण ॥ ३३० ॥
एकीं देव अनेकीं देव । नेणेचि भाव पालटों ॥
देवचि भासे धरामंडळ । सूक्ष्म स्थूळ महदादि ॥
अन्न जीवन भूक तहान । देवचि भोजन तृप्तीचें ॥
निळा म्हणे अंगें मनें । जीवें प्राणें देवचि ते ॥ ३३१ ॥
एकाहुनी आगळे एक । झाले हरिभक्त अनेक ॥
भक्ती निजज्ञानें वैराग्यें । देवाचि होऊनि ठेले अंगें ॥
प्रेमभक्ति अनुसरले । विठ्ठल देवें ते पूजिले ॥
निळा म्हणे सांगों किती । न पुरे अल्प माझी मती ॥ ३३२ ॥
अहो एका भाविक । संत आर्तक मुमुक्षु ते ॥
शुद्धचर्या आचरण । हेंचि पूजन संतांचें ॥
न लगे सांगावें मागावें । जाणती स्वभावें हृदय ते ॥
निळा म्हणे अकस्मात । भेटती संत भावशुद्धी ॥ ३३३ ॥

भाग्यें जोडे सत्संगती । जरि होय हातीं सुकृती ॥
भाव शुद्ध संचित गांठीं । तरीच भेटी तयासवें ॥
शुद्धचर्या आचरण । लाभती चरण तरि हातीं ॥
निळा म्हणे सज्जनसंग । देवा भाग दुर्लभ तो ॥ २१४ ॥
आपपर ते नोळखती । अवघाचि देखती विठ्ठल ॥
पूर्ण होऊनि ठेलें काम । आत्माराम देह त्याचा ॥
विठ्ठल कानीं विठ्ठल घ्राणीं । विठ्ठल नयनीं मनामाजीं ॥
निळा म्हणे विठ्ठल अंगें । रंगले रंगीं विठ्ठलाच्या ॥ २१५ ॥
हरिरूप ध्यानीं हरिनाम वदनीं । हरीच्या चिंतनीं तद्रूपता ॥
हरि तयां अंतरीं हरि तयां बाहेरी । रक्षी निरंतर श्रीहरी त्यां ॥
हरि तयां आसनीं हरि तयां भोजनीं । हरि तयां शयनीं निद्रा करी ॥
निळा म्हणे हरि देह गेह दारा । हरी दुजा थारा लागों नेदी २१६
दृढ विश्वासें हरिसी भजतां । सायुज्यता पावले ॥
ऐसे भक्त नेणों किती । झाले मानिती पुराणें ॥
जिहीं केलें पिंडदान । पर्वी मन प्राणेंसी ॥
निळा म्हणे त्यांची कीर्ति । संतहि गाती कीर्तनीं ॥ २१७ ॥
घडो त्याचा समागम । ज्याचें प्रेम विठ्ठलीं ॥
सहज त्याच्या ऐकतां गोष्टी । परमार्थ पोटीं दृढावे ॥
अनुतापासी दुणीव चढे । वैराग्य वाढे चढोवढी ॥
निळा म्हणे वाढे भाव । संचरे स्वानुभव निजांगीं ॥ २१८ ॥
म्हणोनियां संतजनां । देती आलिंगना पूजिती ॥
त्यांचिया मुखें ऐकती कथा । मानिती परमार्था फळ आलें ॥
म्हणती आजी धन्य झालों । प्रसाद पावलों संतांचा ॥
निळा म्हणे उत्साह देवा । मानला वैभवा देखोनियां ॥ २१९ ॥
प्राणें तन्हीं जेणें वेचतां जीवें । ऐसे बरवे उपकार याचे ॥
सांगावे ते कोणाप्रती । जे जे अवसरीं जे केले ॥

वाटे तिठे घरीं दारीं । आपुल्यापरी सांभाळी ॥
निळा म्हणे आपुल्या नेमा । न टळे महिमा हाचि याचा ॥ २४० ॥

सुखी केलें सुखी केलें । संतीं दाविलें निज हित ॥
जन्मोजन्मीं दास त्यांचा । पोसणा ठायींचा पुरातन ॥
नित्य आपुला आठव देती । आणि पुरस्करिती निज सेवे ॥
निळा म्हणे हेंचि त्यांचें । वर्तन ठायींचें पूर्वापार ॥ २४१ ॥

आवरूनियां ज्यांनीं चित्त । ठेविलें सतत हरीचरणीं ॥
झाली त्याची कार्यसिद्धि । तुटल्या व्याधि जन्म जरा ॥
एकविध भजले देवा । उतरले भव समुद्रातें ॥
निळा म्हणे निश्चय पदा । पावले गोविंदा आठवितां ॥ २४२ ॥

वाचेतें वदवी रसनेतें चाखवी । नेत्रातें दाखवी परि त्या दुरी ॥
बुद्धी बोधविता चित्ता चेतविता । देहीं देहातीता कैसेनि पावूं ॥
भावाभावातीत अद्वैता अद्वैत । ज्यातें श्रुती म्हणत नेति नेति ॥
निळा म्हणे कांहीं न होऊनियां जें आहे ।
दाविती त्याचि सोय सद्गुरु संत ॥ २४३ ॥

तुमच्या पायीं ठेविलें मन । एवढेंच धन मजपाशीं ॥
जरि हा देव दाखवाल । अभय बोल वचनाचें ॥
तरि हा प्राण ओंवाळीन । जिवें चरण न सोडीं ॥
निळा म्हणे कृपा करा । यावरि धरा मज हातीं ॥ २४४ ॥

तुम्ही संत दयाघन । आम्हां म्हणऊन विनवितों ॥
सलगी केली पायांपाशीं । करा अपराधासी क्षमा त्या ॥
मी तों नेणतेंचि अपत्य । तुम्ही संत मायबाप ॥
निळा म्हणे बोबडे बोल । बोलेन शिकवाल तुम्ही ते ॥ २४५ ॥

मज तों माझें न कळेंचि हित । पतितां पतित आगळा ॥
परी तुम्हीं लाविलें कांसे । उतरा जैसें उतराल ॥

कर्महीन मतिहीन । न कळेचि ज्ञान विहिताचें ॥
निळा ह्मणे धरिलें हातीं । हेचि निश्चिती मानियेली ॥ २४६ ॥
शोधूनियां आले संत । हिताहित जगाचें ॥
तेचि वचनें अनुवादती । सकळां नीतीप्रमाणें ॥
सत्यासत्य ठावें तयां । पाहोनियां ठेविलें ॥
निळा ह्मणे गुंता गोंवा । कांहींजिवा न करिती ॥ २४७ ॥
पाहोनियां आले ठाव । संत गांव सुखाचा ॥
त्याचि दाविताती वाटा । सुगमा वैकुंठा जावया ॥
भोळ्या भोळ्या सात्विक लोकां । करुनी नेटका उपदेश ॥
निळा ह्मणे परोपकारा । लागीं वसुंधरा विचरती ॥ २४८ ॥
जया नाहीं आपपर । सांगतां विचार स्वहिताचा ॥
जेणें देव जोडे जोडी । दाविती परवडी त्या साच्या ॥
संदेहाचे तोडिती पाश । सहज उपदेश बोलणें ॥
निळा म्हणे अनुताप उठी । ऐकतां गोष्टी भाविका ॥ २४९ ॥
आपणचि ते येती घरा । देखोनि बरा निजभाव ॥
आप्तपणें आलिंगिती । मनीचा पुरविती हेत सकळ ॥
अनाथ अनन्य देखोनी रंक । करिती कौतुक खेळविती ॥
निळा ह्मणे लाविती सेवे । आपुलिया वैभवें गौरविती ॥२५०॥
सारुनी अवघींच मतांतरें । जे लटिक्यासी खरें मानिती ॥
एकचि दृढाविती भावो । जेणें देवो जोडे तो ॥
सत्य भजन सत्य भक्ति । सत्याचि बोधिती परमार्थ ॥
निळा ह्मणे एकाचि वचनीं । ब्रह्मसनातनीं मेळविती ॥ २५१ ॥
सर्व अनर्थ पापें हारी । जया येऊं ते बोलती ॥
ते ते तात्काळचि पावले । जगामाजी धन्य झाले ॥
नाहींचि येक काळ गुंती । येतां रंक थोर नेणती ॥
निळा ह्मणे अवलोकनें । तोडिती भवाचीं बंधनें ॥ २५२ ॥

उदार संत उदार संत । जया तैसा हेत पुरविती ॥
अपार देणें अपार देणें । पावती घेणें वैकुंठींचें ॥
न सरे ऐसें न सरे ऐसें । देती सहवासें निजात्मसुख ॥
निळा ह्मणे यांचिये पायीं । निज वस्ती देई देवा मज ॥ २५३ ॥

माझे माझे हातीं हात । दिधले संत मुलीश्वरीं ॥
काय उत्तीर्ण होऊं कैसा । उपकारें आकाशा झांकोळिलें ॥
जिहीं पाहिलें अमृत धणीं । तयां कांजवणी काय देऊं ॥
निळा ह्मणे रत्न पालटा । सागरगोटा काय तुके ॥ २५४ ॥

जन्ममरणा निवारिती । जे दाविती सुपंथ ॥
बैसविती अक्षय पदीं । ब्रह्मानंदीं कृपाळु ॥
एकाचि वचनें सिद्धासनीं । करिती बैसउनी अगाध ॥
निळा ह्मणे उत्तीर्णत्वासी । दुर्लभपाशीं कवण वस्तु ॥ २५५ ॥

उत्तीर्ण त्याचें नव्हिजे आतां । जिवही आर्पितां थोडाची ॥
ओंवाळूनि सांडू काया । वरुनी पायां संतांच्या ॥
मायबापा काय द्यावें । कैसें व्हावें उतराई ॥
निळा ह्मणे ज्याची कृपा । जन्म खेपा निवारी ॥ २५६ ॥

धन्य झालों कृपा केली । भेटी दिधली अवचिती ॥
सांभाळिलें तुह्मीं संतीं । केल्या आर्ती परिपूर्ण ॥
मी तों दीन तुमचा रंक । घातली भीक अभयाचि ॥
निळा ह्मणे न भेणें आतां । सन्मुख येतां काळिकाळ ॥ २५७ ॥

मज तों सांभाळिलें संतीं । धरिलें हातीं दीन ह्मणुनी ॥
सांगतां नये विश्वास लोकां । बाधी अशंका ज्याची त्या ॥
मी तों भोळे त्याचिया सत्ता । पुढें विचारितां कळेल ॥
निळा ह्मणे जुनाट साणें । सव्हें हें उणें पारखितां ॥ २५८ ॥

(सेना न्हावी.)

हित व्हावें मानसीं । दवडा दंभ मानसीं ॥
अलभ्यलाभ येईल हातां । शरण जावें पंढरिनाथा ॥
चित्तशुद्धि करा । न द्यावी दुजियासी थारा ॥
हेंचि शस्त्र निर्वाणीचें । सेनाचें म्हणे धरा साचें ॥ १५९ ॥
करसी खटपटी । पोटासाठीं आटाआटी ॥
नाम घेतां विठोबाचें । काय तुझ्या बाचें वेचें ॥
धनाचिया आशा । वाउगा फिरसि दाही दिशा ॥
जावें हरिकीर्तना । लावावें तुझ्या मना ॥
सेना म्हणे ऐशा नरा । जवळूनि दूर करा ॥ १६० ॥
बुडतो भवसागरीं । मज काढी बा मुरारी ॥
आतां न मानीं भार कांहीं । माझी पाही माऊली ॥
करीं जतन श्रीदावळी । वागविशी तें सांभाळीं ॥
मी महादोषी चांडाळ । सेना म्हणे तूं दयाळ ॥ १६१ ॥
पांडुरंग दास । म्हणती सांभाळी निदास ॥
नाहीं भाव अंगीं । भूषण मिरविलों जगीं ॥
व्रत आचरण । नाहीं केलें तुझें ध्यान ॥
सेना आहे अपराधी । सांभाळावें कृपानिधी ॥ १६२ ॥
संतसंगतीनें थोर लाभ झाला । मोह निरसला मायादिक ॥
घातले बाहेरी काम क्रोध वैरी । बैसला अंतरीं पांडुरंग ॥
दुरिताचा वारा लागूं नेदी अंगा । ऐसें पांडुरंगा कळों आलें ॥
संतांनी सरता केला सेना न्हावी । भक्ताधिका पाहीं लाजवीलें ॥
आम्ही वारीक वारीक । करूं हजामत बारीक ॥
विवेक दर्पण आयना दाऊं । वैराग्य चिमटा हालऊं ॥
शांती डोई धोऊं । अहंकाराची शेंडी पिळूं ॥
भावार्थाच्या बगला झाडूं । काम क्रोध नखें काढूं ॥
चौ वर्णां देउनी हात । सेना राहिला निवांत ॥ १६४ ॥

नरहरी सेवक सद्गुरूचा । दास हो साधुसंतांचा ॥ २६५ ॥
कांहीं उपाय चालेना । कांहीं स्वहित घडेना ॥
कांहीं केलें नाहीं पुण्य । काय जन्मासी येऊन ॥
केली नाहीं कांहीं भक्ती । देही नाहीं हो विरक्ती ॥
कांहीं केलें नाहीं तीर्थ । जन्म गेला अवघा व्यर्थ ॥
व्यर्थ प्रपंच हा केला । अवघा सेवटीं वायां गेला ॥
गुरुकृपा होय जरी । नरहरी क्षणांत उद्धरी ॥ २६६ ॥
प्रेम शांती दया शरण निर्धारेसी । असले उदासी सर्व काळ ॥
काया वाचा मन निवडुनी प्राण । शुद्ध ज्ञान पूर्ण सर्वसाक्षी ॥
सद्गुरूची कृपा होय जयावरी । तो हा श्रीहरीचा संत झाला ॥
संत साधुजन वंदुनीयां पूर्ण । वाचें नारायण नाम घेतो ॥
नरहरी सोनार म्हणे हरिचा दास । भावें रात्रंदिवस नाम घेतो ॥
ऐरावती बहु थोर । त्याला अंकुशाचा मार ॥
व्याघ्र बहु भयंकर । त्याला सांपळा हो थोर ॥
सर्पविष हो विखार । मंत्रवल्ली केली थोर ॥
देह जठराग्नी मारी । अन्नपाणी शांत करी ॥
गुरु गैबीनाथ । नरहरी पास हा अंकित ॥ २६८ ॥

( मिराबाई )

हरि गुन गावत नाचूंगी ॥ धृ० ॥
आपनें मंदिरमों बैठ बैठकर । गीता भागवत बाचूंगी ॥
ग्यान ध्यानकी गठडी बांधकर । हरीहर संगमें लागूंगी ॥
मीराके प्रभु गिरधर नागर । सदा प्रेमरस चाखूंगी ॥ २६९ ॥



कृष्ण करो जजमान ॥ प्रभु तुम ॥ ध्रु० ॥
जाकी कीरत वेद बखानत । सांखी देत पुरान ॥ प्रभु० ॥
मोर मुकुट पीतांबर सोभत । कुंडल झळकत कान ॥ प्र० ॥
मीराके प्रभू गिरिधर नागर । दे दरशनको दान ॥ प्र० ॥ २७०॥

लाज रखो तुम मेरी प्रभूजी । लाज रखो तुम मेरी ॥ ध्रु० ॥
जब बैरीनें कबरी पकरी । तबही मान मरोरी ॥ प्रभूजी० ॥
मैं गरीब तुम करुनासागर । दुष्ट करत बलजोरी ॥ प्रभुजी०॥
मीराके प्रभु गिरिधर नागर । तुम पिता मैं छोरी ॥ प्रभुजी०॥

मैं तो तेरे भजन भरोसे अविनासी ॥ मैं तो० ॥ ध्रु० ॥
तीरथ बरतते कछु नहीं कीनो । बन फिरे है उदासी ॥ मै तेरे०॥
जंतर मंतर कछु नहीं जानूं । वेद पढो नहीं कासी ॥ मैं तेरे० ॥
मीराके प्रभु गिरिधर नागर । भई चरणकी दासी ॥ २७२ ॥

शरणागतकी लाज । तुमकूं शरणागतकी लाज ॥ ध्रु० ॥
नाना पातके चीर मेलाये । पांचालीके काज ॥
प्रतिज्ञा छांडी भीष्मके कारन । आगे चक्रधरे जदुराज ॥
मीराके प्रभु गिरिधर नागर । दीन बंधु महाराज ॥ २७३ ॥

( कान्होपात्रा )

विठ्ठ दीनांचा दयाळ । वागवी दासाची कळकळ ॥
देव कृपावंत मोठा । उणें पडों नेदी तोटा ॥
देव भक्तांचा अभिमानी । वाहे चिंता सकळ मनीं ॥
देव भावाचा भुकेला । कान्होपात्रे आनंद झाला ॥ २७४ ॥

दीन पतित अन्यायी । शरण आलें विठाबाई ॥
मी तो आहे यातीहीन । नकळे कांहीं आचरण ॥
अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई ॥
राव देईं चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ २७५ ॥

पतित तूं पावना । म्हणविसी नारायणा ॥
तरी सांभाळीं वचन । ब्रीद् वागविसी जाण ॥
याती शुद्ध नाहीं भाव । दुष्ट आचरण स्वभाव ॥
मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥ १७६ ॥

---

## देवापाशीं प्रेमाचें भाषण.

(ज्ञानदेव.)

परिमळाची धांव भ्रमर ओढी । तैसी तुझी गोडी लागो मज ॥
अविद ये माय विटेना जवळी । आहे परि भेटेना ॥
तृषा लागलीया जीवनातें ओढी । तैशी तुझी गोडी लागी या जिवा
बापरखुमादेविवरा विठ्ठलीं आवडी । गोडिमेसि गोडी मिळोनि ठेली.
पाहे पां ध्वजेचें चिरगूट । राया जतन करितां कष्ट ॥
तैसा मी एक पतीत । परि तुझा मुद्रांकित ॥
मलीपत्र तें केवढें । रावो चालवी आपुल्या पाडें ॥
बापरखुमादेविवरदा । सांभाळावें आपुल्या ब्रिदा ॥ १७८ ॥
अवघा डोळां तुज म्यां पाहावें । अवघा श्रवणीं तुजचि ऐकावें
अवघी मूर्ति तुजपें ध्यावें । अवघा चरणीं तुझ्या पंथीं चालावें
रखुमादेविवरु अवट बाविला । माझ्या देहीं वाढला ब्रह्माकारें

(नामदेव).

काय गुण दोष माझे विचारिसी । आहें मी तों राशी अपराधांची ॥
अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ॥
स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ति । पुसशी विरक्ति कोठुनियां॥
तूंचि माझा गुरु तूंचि तारीं स्वामी । सकळ अंतर्यामीं गाऊं तुज ॥
नामा म्हणे माझें चुकवीं जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा॥
तुजविण आम्हां कोण हो पोशिता । अहो जी कृपावंता पंढरिराया॥
न करीं विठ्ठला आतां लाजिरवाणें । मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥

काकुळती कोणा येऊं हो मी आतां । अनाथाच्या नाथा विठ्ठला तूं॥
एकवेळ आतां पाहें मजकडे । नामा म्हणे वेडें रंक तुझें ॥ २८१ ॥
ममता तुटेना मज केशिराजा । आंगीं भाव तुजा लागे पाठीं ॥
शरीरीं तितिक्षा नाहीं क्षमा शांति । यालागीं श्रीपति धायां गेलों॥
नामा म्हणे देवा तारिसी पतीता । म्हणोनियां सत्ता केली आम्हीं ॥
माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥
अनाथाचा नाथ होशी तूं दयाळा । किती वेळोवेळां प्रार्थू आतां॥
नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां धरी ॥
चळिला प्रपंच परि हा लटिका । तेणें तुज व्यापका झांकियलें ॥
कैसियाच्या मज घालोनियां खेवा । स्वामिद्रोहि देवा करिसी कैसा ॥
मेरूचिया गळां बांधोनि मशक । पाहसी कवतुक अनाथनाथा ॥
नामा म्हणे देवा कळली तुझी माव । माझा मी उपाव करीन आतां॥

(जनाबाई).

ऐसा वर देईं हरी । गाईं नाम निरंतरीं ॥
पुरवीं आस माझी देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥
हेंचि आहे माझे मनीं । कृपा करीं चक्रपाणी ॥
रूप न्याहाळूनियां डोळां । मुखीं नाम लागो चाळा ॥
चक्रधराच्या राया । दासी जनी लागे पायां ॥ २८५ ॥

साधु आणि संत । जन्म याचा जी कळींत ॥
समर्पण तें हेंचि देवा । कृपा करीं हो केशवा ॥
संत दयाळ परम । तया साक्षी नारायण ॥
जनी म्हणे ऐसे साधु । तयापाशीं तूं गोविंदु ॥ २८६ ॥

धनधन कामिनी समूळ नाणीं मना । नाहीं हे वासना माझ्या जीवीं॥
तृष्णा हे जाण न व्हावी मजला । प्रेमाचा जिव्हाळा देईं तुझा॥

निरपेक्ष वासना देगा मज देवा । आणि तुझी सेवा आवडीची ॥
शांतीचीं भूषणें मिरविती अंगीं । वैष्णव आणि योगी म्हणावे ते ॥
असो तो अकुळी असो भलते याती । माथां वंदी प्रीती जनी त्यासी ॥

---

## देवाशीं सलगीचीं भाषणें.

(तुकाराम.)

तुज घालोनियां पूजितों संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चौदा भुवनें ॥
तुज नाचवूनि दाखवूं कौतुका । परि रूपरेखा नाहीं तुज ॥
तुजलागीं आम्हीं गातसों गीत । परि तूं अतीत शब्दाहूनी ॥
तुजलागीं आम्हीं घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥
तुका म्हणे आतां होऊनि परिमित । माझें कांहीं हित विचारावें ॥
वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥
ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥
मज माझें कांहीं न दिसे पाहतां । जें तुज अनंता समर्पावें ॥
तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया १८९
उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकसी हे मात शरणागतां ॥
सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरलीं वाचा कायामनें ॥
पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥
चालतांही पंथ सांभाळिसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥
तुका म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥
लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण ॥
परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानी ॥
तुका म्हणे याची लाज नसे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥
पाठवाल तैथें गर्जेन पवाडे । कार्यी देहाकडे नावलोकीं ॥
म्हणऊनि मागें कंठीचा सोरस । पावतील नाश विघ्नें पुढें ॥

कृपेच्या कटाक्षें न भे कळिकाळा । येतां येत बळाशक्तीपुढें ॥
तुका म्हणे गुढी आणीन पायांपें । जगा होईल सोपें नाम तुझें ॥
आडलिया जना होसी सहाकारी । अंधळिया करीं काठी तूंचि ॥
आडिले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायण ॥
प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुम्हीं अपंगिला नामापरी ॥
आपुलेंचि अंग तुम्हीं वोडविलें । त्याचें निवारलें महा दुःख ॥
तुका म्हणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये ॥ २१३॥
मन मानवलें तरी साक्षात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं आलों ॥
म्हणऊनी पंढरिनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥
संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥
तुका म्हणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥
म्हणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोटभरी ॥
खोटें कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥
आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥
तुका म्हणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुम्हां ठावा ॥
जन तरी देवें गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥
म्हणवूनि मागें परतलें मन । चाळणीचें दान देखोनियां ॥
इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ॥
तुका ह्मणे देवा वासनेच्या आटें । केली तळपटें बहुतांचीं ॥ २१४॥
कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देईल धीर माझ्या जीवा ॥
शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥
कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥
मज हा संदेह झाला दोहीं सेवा । भजन करूं देवा किंवा नको ॥
तुका म्हणे आतां दुखवितां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही २१५
तुजविण वाणीं आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥

सेवी आणिकांसि पाहील आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥
कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥
तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥३९८॥

पांडुरंगा आतां ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥
नाहीं आइकिलें संतांचिया मुखें । तें या मज लोकें भेडसाविलें ॥
विष्णुदासां गति नाहीं तरावया । म्हणती गेले वांयां कष्टतही ॥
धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळींचा ॥
तुका ह्मणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥३९९॥

दीनानाथा तुझीं ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥
पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आह्मां रोकडे कळों आले ॥
आपुल्या दासांचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥
चक्र गदा हातीं आयुधें अपारें । न्यून तेथें पुरें करूं धांवे ॥
तुका ह्मणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ४०० ॥

आमुचें उचित हेचि उपकार । आपलाचि भार घालूं तुज ॥
भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शीताचिये ॥
जेणें काळें उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ॥
दुःख येऊं नेदी आमचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥
तुका ह्मणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेचि आम्हां गोड जन्म घेतां ४०१

दिली हाक मनें नव्हे ती जतन । वेगळाले गुण धांव घेती ॥
काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा हिंसा फार माया तृष्णा॥
इंद्रियांचे भार फिरतील चोर । खाणें द्यावया घर फोडूं पाहे ॥
माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥
तुका ह्मणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती॥४०२॥

बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्ही अविश्वासी सर्वभावें ॥
दंभें करीं भक्ती सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥

चिंता तूं रे साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ॥
तुका ह्मणे देवा तूं काय करिसी । कर्मा दुस्तरासी आश्रुचिया ४०३॥
समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥
न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥
मात भलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरि गांठी शीज साहे ॥
तुका ह्मणे हें तूं सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥ ४०४ ॥
येऊनि संसारा काय हित केलें । आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥
विषय सेवितां कोण तृप्त जाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥
देखोनि मृगजळ भांबावलीं वेडीं । विचाराची घडी न टाकिसी ॥
ऐसिया जीवासी सोय न लाविसी । निष्ठुर कां होसी कृपाळुवा ॥
तुका ह्मणे देवा अगाध तैं थोरी । सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ४०५ ॥
फिरविलें देऊळ जगामाजीं ख्याति । नामादेवा हातीं दुध प्याला ॥
भरियेली हुंडी नरसी मेहत्याची । धनाजी जाटाचीं शेतें पेरी ॥
मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥
कबीराचे मागीं विणूं लागे शेले । उठविलें मूल कुंभाराचें ॥
आतां तुम्ही दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ॥
कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नाश केला ॥
आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न भोगतां सुखें पाहें ॥
संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं म्हणती एक ॥
बुडविली भक्ति म्हणती पाषाण । विठ्ठलाचें पाळण स्थापूनियां ॥
न करावी कथा म्हणती एकादशी । भजनाची नासी मांडियेली ॥
न जावें देउळा म्हणती देवघरीं । बुडविले यापरी तुका म्हणे ४०७॥
कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥
कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥
कैसी कीर्ति गाऊं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवण कैसा तुज ॥

कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावी मज ॥
तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ४०८

मिळे हरिदासांची दाटी । रीग न होय शेवटीं ॥
तेथें काय म्यां करावें । माझें कोणें आइकावें ॥
कैसें तुज लाजवावें । भक्त म्हणोनियां भावें ॥
नाचतां नये ताळीं । मज वाजवितां टाळी ॥
अतिमंडित भूषणें । शरीर माझें दैन्यवाणें ॥
तुका म्हणे कमळापति । मज न थावें त्यां हातीं ॥ ४०९ ॥

नो बोलावें ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळा ॥
कोण पाय आड ठाकतें येऊन । पालटी तो गुण अंतरींचा ॥
संसारा हातीं सोडवूनि गळा । हे कां अवकळा येती पुढें ॥
तुका म्हणे सेवे घडे अंतराय । त्यास करूं काय पांडुरंगा ॥ ४१० ॥

मज नष्टा माया मोह नाहीं लोभ । अधिक हा क्षोभ आवराचा ॥
भिरा हें शरीर अनउपकार । न मनीं आभार उपकाराचा ॥
मजहून नष्ट आहे ऐसा कोण । नावडे मिष्टान्न बहुमोल ॥
न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणें मागें ॥
तुका म्हणे माझें देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ४११

बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझे गांठीं ॥
जालों आतां आज्ञा वेऊनियां स्वामी । काळक्षेप आम्ही करूं कोठें ॥
न घडे यावरी न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनी जग ॥
तुका म्हणे तुम्ही दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥

काय करूं आतां धरुनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥
नव्हे जरी कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोनी नव्हे हित ॥
आलें तें उत्तर बोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥
तुका म्हणे सभा समर्थांसीं गांठी । घालावी हे मांडी थापटूनी ४१२

[illegible] ॥४१४॥

चालें दंडवत घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥
बैसविला पदीं पुत्र राज्य करीं । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥
तुका म्हणे आहे ठायींचाचि मान । आतां अनुमान कायसा तो॥४१५॥

माउलीसी सांगे कोण । प्रेम वाढवी तान्हें ॥
अंतरीचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥
मायबापाची उपमा । तुज देऊं घनश्यामा ॥
तेही साजेना पाहातां । जीवलगा पंढरिनाथा ॥
माय पाळी संसारीं । परलोकीं राहे दुरी ॥
तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥
तुका म्हणे नारायणा । तुम्हां बहुत करुणा ॥ ४१६ ॥

धर्म रक्षावया अवतार घेसी । आपुल्या पाळिसी भक्तजना ॥
अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळिले किती एक ॥
धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करी ॥
तुका म्हणे तुज वर्णिता पुराणें । होय नारायण कृपासिंधु ॥४१७॥

बहु वाणी परि दुर्लभ अनुभव । चालीचाचि नाहीं बहुतेक ॥
आम्ही ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ चिंतितसे ॥
वाढवितां पोट दंभाचे पसारे । येतील माघारे सुपला लोटे ॥
तुका म्हणे बरें जागविलें मना । तुमच्या नारायणा अभयें करें॥४१८॥

दुःख वाटे ऐसी ऐकों नये गोष्टी । जेणें पडे तुटी तुझ्या पायीं ॥
येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥
काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनि पुढती वाटे लावूं ॥
तुका म्हणे मज वाटू नको ऐसे । कळीपुढें पिसे पांडुरंगा ॥४१९॥

काय आतां आम्हीं पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हणू ॥
ऐसा तरी एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥
काय कवित्वाची घालूनियां रुढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥
तुका म्हणे काय गुंफोनि दुकाना । राहों नारायणा करुनी घात ॥
जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो दृष्टांत न कळे आम्हां ॥
जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥
पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणाकारणें कवणें केलीं ॥
आम्हां मरण नाश तूं तव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥
तुका म्हणे तूंचि निवडीं हा गुढार । दाखवीं साचार तेंचि मज ॥
कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥
अवघें आलें आंत पोटा पाडिलें थीतें । सारूनि निश्चित जालों देवा ॥
व्याजयासी आतां नाहीं तोळा मासा । अधीक मवेशा तुज ठावी ॥
तुझ्या रिणें गेले बहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥
तुका म्हणे तुझे खतीं जें गुंतलें । करूनी आपुलें घेईं देवा ॥४२२॥
न पुसेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी मी बोलावें ॥
कोंविण काय शब्द वाच्यामाप । अनादरें कोप येत असे ॥
आपुलिया रडें आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसे ॥
तुका म्हणे तुम्ही असा जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥४२३॥
घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । खावें तरी देवा उदंडचि ॥
ऐसीं कैचीं आम्ही पुरलीं भांडवलें । आलया करीं बोलें समाधान ॥
व्हावें तरी व्हावें बहुतचि दुरी । आलिया अंतरीं वसवावें ॥
तुका म्हणे तुझें सख्यत्व आपणीं । असतील धणी आवडीचा ॥४२४
उद्वेगासी बहु फांकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥
आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥
मज तों अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीविताचा ॥
तुका म्हणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥४२५॥

तुका म्हणे शूर [illegible]

ऐकें पांडुरंगा वचन माझें एक । जालों मी सेवक दास तुझा ॥
कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥
दंभ मान माझा करूं पाहे घात । जालियाही थीत कारणाचा ॥
हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥
तुका म्हणे मज विघडतां क्षण । न लगे जतन करीं देवा ॥४२७॥

अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचा ॥
त्यांचे पाय माझे लागोत कपाळीं । भोग उष्टावळी धन्य काळ ॥
षड ऊर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥
तुका म्हणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ४२८

आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥
मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥
जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥
तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ४२९ ॥

मोहरोनि चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ॥
तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥
संसारा भेणें । कांहीं उसंती तों पेणें ॥
एकादिया भावें । तुका म्हणे जवळी यावें ॥ ४३० ॥

तुझें रूप पाहतां देवा । सुख झालें माझ्या जीवा ॥
हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥
जन्मोजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥
जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥
तुका म्हणे भक्त । गोड गाऊं हरिचें गीत ॥ ४३१ ॥

असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा निवडोंना ॥
अनुसरलों एका चित्तें । हातोंहातें गिवसीत ॥
गुणदोष कशासाठीं । तुमचे पोटीं वागवूं ॥
तुका म्हणे तुजें आतां । कोठें चित्ता आतळों ॥ ४१२ ॥
नवजातां घरा । आम्ही कोणाच्या दातारा ॥
कां हे छळूं येती लोक । दाद बळेंचि कटक ॥
नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचें लागत ॥
कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ॥ ४१३ ॥
होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥
तूंचि चालविसी माझें । भार सकळही ओझें ॥
देवा तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥
कायावाचामनें । तुका म्हणे तुजें नेणें ॥ ४१४ ॥
भला म्हणे जन । परि नाहीं समाधान ॥
माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥
कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला भार ॥
तुका म्हणे कृपें । अंतराय कोण्या पापें ॥ ४१५ ॥
शिकविले बोल । बोलें तैसा नाहीं ओल ॥
आतां देवा संदेह नाहीं । वांयां गेलों यासी कांहीं ॥
एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥
बुद्धि नाहीं स्थिर । तुका म्हणे शब्दा धीर ॥ ४१६ ॥
विश्वव्यापी माया । तिणें झाकोळिलें छाया ॥
सत्य गेलें भोळ्यावारी । अविद्येची चाली थोरी ॥
आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ॥
तुका म्हणे देवा । तुम्ही कोडीं हीं उगवा ॥ ४१७ ॥
नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥

येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरि ॥
तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४३८ ॥
जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥
आतां तूंचि साक्षात्कारी । अवघ्यापरी जालासी ॥
नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥
तुका म्हणे सर्व सांगे । पांडुरंगे दयाळे ॥ ४३९ ॥
माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥
हें कां नेणा नारायणा । मज चाळवितां दीना ॥
नागवा धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥
राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥
तुझ्या केल्याविण । नव्हे स्थिर वश मन ॥
तुका म्हणे हरी । सूत्र तुम्हां हातीं दोरी ॥ ४४० ॥
ठाव तुम्हांपाशीं । जाला आतां हृषीकेशी ॥
तलगे जाणावें सतत । येथें स्वभावें हें भीत ॥
चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥
तुका ह्मणे मनें । आम्हां जालें समाधान ॥ ४४१ ॥
भागल्यांचा तूं विसांवा । करीं नांवा सिवतोण ॥
परमानंदा पुरुषोत्तमा । हरीं या श्रमापासूनि ॥
अनाथांचा अंगीकार । करितां भार न मानिसी ॥
तुका ह्मणे इच्छा पुरे । ऐसे पुरे गे विठ्ठले ॥ ४४२ ॥
भीतरिच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेचि भाव निष्ठुरता ॥
जीणें तरि एका जीवें उभयतां । पुत्राचिया पिता सुखें दुःखें ॥
काय जाणे तुझें मायेचें लिगाड । विषम तें आड वरी नेणें ॥
तुका ह्मणे मज करुणा उत्तरें । करितां विश्वंभरें पाविजेल ॥ ४४३ ॥
नव्हों सभा धीट । समोर बोलाया ॥
धीट पचळी एकट । तुझें नाहीं देखिलें ॥

आतां अवघें तुम्ही जाणां । तुमचें माझें नारायणा ॥
येईल करुणा । तेंचि पहा तुम्हांसी ॥
ताळ नाहीं माझे बुद्धी । धरली न धरवे शुद्धी ॥
आतां बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ॥
आतां शेवटींचें । उत्तर तें हेंचि साचें ॥
शरण आलें त्याचें । तुका म्हणे सांभाळा ॥ ४४४ ॥

---

## देवापाशीं प्रेमाचें भांडण.

(तुकाराम.)

विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसीं दातारा पांडुरंगा ॥
तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥
माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥
लोभ मोह माया आम्हां बांधवितां । तरि ह्या अनंता बोल कोणा ॥
तुका म्हणे मी तों पतिताचि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥
आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥
ह्या गे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥
आम्ही तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥
तुका म्हणे मज धरियेलें बळें । पंचभूतीं खळें करूनियां ॥४४५॥
कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटी जालों देवा ॥
आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥
तुझिया विनोदें आम्हां प्राणसाटी । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥
तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥
सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥
समाधियें सुखी रहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥
भेटीचे तांतडी करितसें लाहो । ओंवाळावा देहो ऐसें वाटे ॥

तुका म्हणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥ ४४८ ॥
तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥
तुज ठावें होतें पातकी मी खरा । आधींच कां थारा दिला पायीं ॥
अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥
तुका म्हणे आम्ही जिंतिलें तें खरें । आतां उणें पुरें तुम्हां अंगीं ॥
सेवकें करावें सांगितलें काम । सिक्याचा तो धर्म स्वामी राखे ॥
काय देवा नेणों आलें गाढेपण । तुम्ही शक्तिहीन जालें दिसां ॥
विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥
तुका ह्मणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ४५०
आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥
आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥
आह्मी तों आपुलें केलेसें जतन । घडो तुह्माकडून घडेल तें ॥
तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥
कासया वांचूनि जालों भूमी भार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥
आतां भलें काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥
काय सुख पेंव श्वापदांचें धांव । नित्य तुझें नांव उच्चारितां ॥
तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ४५२
मज ऐसें कोण उद्धरिल सांगा । जीवें पांडुरंगा बोलतसां ॥
हातींच्या कांकणा कासया आरसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥
धन्वंतरी हरी रोग्याचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥
तुका म्हणे नाहीं अनुभव अंगीं । वचन वाउगें कोण मानी ४५३
आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहें राशी पातकांची ॥
पतितपावनासवें समागम । आपुलाला धर्म चालवीजे ॥
वसवायें भेटी लोखंड परिसा । तरी असारिसा न पालटे ॥
तुका ह्मणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ४५४
आह्मांसिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥

समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥
चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाच्या मुळें सांभाळावें ॥
तुका ह्मणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनि हरी बुझवावें ४५५
उचित तें काय जाणावें दुबळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥
देतों हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥
आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ॥
तुका म्हणे तुह्मा साजे हें श्रीहरी । आह्मी निलाजिरीं नव्हों ऐसीं४५६
पाळिलों पोसिलों जन्म जन्मांतरीं । वागविलों करीं धरोनियां ॥
आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥
नेदी वारा अंगीं लागों अघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥
तुका ह्मणे बोल करितों आवडी । अविट तेंचि गोडी अंतरींची४५७

कांहो वाढविता देवा । मज धरीं समजावा ॥
केवढा हो गोवा । फार केले थोड्याचें ॥
ठेविन पायांवरी डोई । थासी तुमचें वेंचे काई ॥
जालों उतराई । जाणा एकएकांचे ॥
निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेसी ॥
होती गांठी तैसी । सोडूनियां ठेविली ॥
तुका ह्मणे गोड । होतें जालिया निवाड ॥
वर्मेसही चाड । आमचीच वाढले ॥ ४५८ ॥

अनुभव तो नाहीं आमुचिया वर्मे । अइकिलें कानें वदे वाणी ॥
जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडे पुरी काय होतें ॥
नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥
पत्रीं कुशळता भेटी अनादर । काय तें उत्तर येइल मानूं ॥
अंतरीं सबाह्मीं कां नाहीं सारिखें । धरूनि पारिखें वर्ततसां ॥
आलों आलों ऐसी दाऊनियां आस । वाहों बुडतयास काय थावें॥
तुका ह्मणे अहो चतुरा शिरोमणि । किती माझी वाणी तुम्ही कोठें४५९

जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥
माझी लागों दिलें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥
करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥
हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साठीं ॥
बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥
तुका म्हणे खरा । आतां घेईन मुशारा ॥ ४६० ॥
भक्तिॠण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझे ॥
प्रेमव्याज देई हरी । माझा हिशेब चुकती करी ॥
माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ॥
तुझे नामीं आहे खत । सुखें करीं पंचाईत ॥
तुका म्हणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ४६१ ॥
चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥
परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥
आम्ही सर्वस्वें उदार । तुज देऊनियां धीर ॥
इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥
न पडे विसर । तुझा आम्हां निरंतर ॥
प्रेम एकासाठीं । तुका म्हणे न वेंचे गांठीं ॥ ४६२ ॥
तुझा भरंवसा आम्हां । फार होता पुरुषोत्तमा ॥
भवसागर संकटीं । तारिशील जगजेठी ॥
नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजेड ॥
सिलंगणीचें सोनें । त्यासी गाहाण ठेवी कोण ॥
तुका म्हणे देवा । भेद सोडुनियां ठेवा ॥ ४६३ ॥
मज संतांचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥
पाहा विचारूनि देवा । नको आम्हांसवें दावा ॥
तुज बोल न बोलवे । आम्हां भांडायाची सवे ॥
तुका म्हणे तरी । ऐक्यभाव एरें वरी ॥ ४६४ ॥

भोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें धासेजेसा ॥
इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥
तुका ह्मणे आह्मांसवें जी रुसला । तयाचा अबोला आकाशासीं ॥

भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥
हे तों चाळवाचाळवी । केलें आपणचि जेवी ॥
नैवेद्याचा आळ । वेच ठाकणीं सकळ ॥
तुका ह्मणे जड । मज न राखावें दगड ॥ ४६६ ॥

लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे ऊणें ॥
आह्मी नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥
बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥
तुका ह्मणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ४६७ ॥

समर्थाचें बाळ किविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥
अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा संभाळ लागे त्याचा ॥
तुका म्हणे तैसा मी एक पतित । परी मुद्रांकित जालों तुझा४६८

आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥
तुझें नाम दिनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥
कोण लेखी माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥
वांयां जातां मज । तुका म्हणे तुम्हां लाज ॥ ४६९ ॥

कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥
ऐसें आम्हां मांडियेलें । विठो त्वां सांडियेलें ॥
बैसुनि कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळीं ॥
तुका म्हणे नारायणा । बरें लोकीं हें दिसेना ॥ ४७० ॥

नवा नवसांची । जालों तुम्हांसी वाणीची ॥
कोण तुझें नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥
कोण होतें मागें पुढें । तुज बोलाया रोकडें ॥
तुका म्हणे पांडुरंगा । कोणा घेतासि वोसंगा ॥ ४७१ ॥

तुझें नामीं दिनानाथा । आम्हीं उघडा घातला माथा ॥
आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥
पतित होतों ऐसा ठावा । आधीं का न विचारावा ॥
तुका म्हणे तुझे पायीं । आम्हीं मिरास केली पाहीं ॥ ४७२ ॥
नामासारिखी करणी । हे तों न दिसे त्रिभुवनीं ॥
सिलंगणीचें सोनें । ठेवूं नये तें गहाण ॥
आदित्याचीं झाडें । काय त्यांचा उजेड पडे ॥
तुका म्हणे देवा । ब्रिदें सोडोनियां ठेवा ॥ ४७३ ॥
विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥
कई कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥
जाल्या येरझारा । जन्मा बहुतांचा फेरा ॥
तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ४७४ ॥
आम्हीं घ्यावें तुझें नाम । तुम्हीं आम्हां द्यावें प्रेम ॥
ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥
माझी डोई पायांवरी । तुम्हीं न धरावी दुरी ॥
तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४७५ ॥
वेडें वाकडें गाईन । परि मी तुझाचि म्हणवीन ॥
मज तारीं दिनानाथा । ब्रीदें साच करीं आतां ॥
केल्या अपराधांच्या राशी । म्हणऊनि आलों तुजपाशीं ॥
तुका म्हणे मज तारीं । सांडीं ब्रिद नाहीं तरी ॥ ४७६ ॥
जरि मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा तेथ ॥
म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥
लोहो महिमा न परिसा । नाहीं तरी दगड तैसा ॥
तुका म्हणे याचकभावें । कल्पतरु मान पावे ॥ ४७७ ॥
नव्हे भिडा हें कारण । जाणे करूं ऐसें जन ॥
जो जो धरावा लौकिक । वळवितोसी आपीक ॥

चाल जाऊं संतांपुढे । ते हे निवडिती रोकडे ॥
तुका ह्मणे तूं निर्लज्ज । आह्मां रोकडी गरज ॥ ४७८ ॥

---

## देवापाशीं मागणें.

( तुकाराम ).

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजीं ॥
तुका ह्मणे कांहीं न मागें आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ४७९

पावलें पावलें तुझें आह्मां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥
जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥
भेदाभेद मतें भ्रमाचे संवाद । आह्मां नको वाद त्यांशीं देऊं ॥
तुका ह्मणे अणु तुजवीण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥४८०॥

बाळमिषें जन सांडी मज दुरी । करिसील हरी ऐसें कधीं ॥
आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥
नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥
तुका ह्मणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ॥४८१॥

न ह्मणे कवणा सिद्ध साधक गव्हार । अवघा विश्वंभर वांचूनिया ॥
ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥
गातां प्रेमसुख शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥
देईं चरणसेवा भूतांचें भजन । वर्णा अभिमान सांडवूनि ॥
आशापाश माझी तोडी माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥
तुका ह्मणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥४८२॥

सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझें ॥
आणीक कांहीं इच्छा आह्मां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगें ॥

जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आह्मासी सहज द्यावें आतां ॥
तुका ह्मणे तुज ऐसें दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आह्मां ॥४८३॥
पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥
प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥
तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर जाले तरी ॥
जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देई प्रेमसुख ॥
देहभाव राख दीन करूनियां । जनाचारीं वांयां जाय तैसा ॥
द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥
तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥
तुका म्हणे तुझे जडोनियां पायीं । जालों उतराई पांडुरंगा॥४८५॥
पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥
काम क्रोध वैरी घालोनी बाहेरी । तूं राहे अंतरीं पांडुरंगा ॥
करिशील तरी नव्हे कांई एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥
समर्थासी काय आह्मीं शिकवावें । तुका ह्मणे यावें पांडुरंगा ४८६
पक्षीयांचे घरीं नाहीं सामुग्री । त्यांची चिंता करी नारायण ॥
अजगर जनावर वारुळांत राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥
चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे ॥
तुका ह्मणे आह्मी पिपलिकांची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ४८७
समर्थ या नांवें दिनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ॥
मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥
दयासिंधु तुह्मां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपापीयूषें ॥
तुका ह्मणे अहो पंढरीनिवासे । बहु जीव आसे लागलासे॥४८८॥
नर नारी झाले अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥
न ये काम क्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ॥

असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥
करोनियां साह्य पुरवीं मनोरथ । व्हावें कृपावंत तुका ह्मणे ४८९

आतां काढाकाढी करीं गा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥
जाणतां बैसलों दगडाचे नावें । तिचा धर्म ठावे प्राण हानि ॥
मनाचा स्वभाव इंद्रियांची ओढी । पतनाची जोडी वरी होय ॥
तुका ह्मणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ४९०

मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥
ऐसें परस्परें आहेचि विचारा । भोपळ्याचा तारा दगडासी ॥
भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परि संग नव्हे तैसा ॥
तुका ह्मणे करा परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥४९१॥

किती तुजपाशीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥
आतां माझें हातीं देईं माझें हित । करीं माझें चित्त समाधान ॥
राग आला तरी कापूं नये नाक । बाळा मायेविण कोण दुजें ॥
तुका ह्मणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥४९२॥

नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाडवसी ॥
नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेग होय जीवा ॥
तुका म्हणे करीं फकिराचे परी । रात्रंदिवस हरि येईल वाचे ॥
नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥
कुबेर हे माया न होय सुखा । वैकुंठनायका जोडवी मज ॥
तुका म्हणे तुझें झालिया दर्शन । मग निवारण होईल सर्व ४९४

हेंचि सुख पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥
जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥
दुजा भाव आड येऊं नेदी चिंता । करावा अनंता नाश त्याचा ॥
अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥
तुका म्हणे आम्ही जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरविसी ४९५

अभयदान मज देईं गा उदारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं नेणें दुजें ॥
सेवा भक्ति भाव नेणें मी पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥
अवघा निरोपिला तुज देहभाव । आतां मज पाव पांडुरंगा ॥
तुका म्हणे तुझें नाम दीनानाथ । तें मज उचित करीं आतां ४९६.

पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनि अंधळा बराच मी ॥
निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनी ठेवीं देवा ॥
अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहूनि मुका बराच मी ॥
नको मज कधीं परस्त्रीसंगति । जनांतुन माती उठतां भली ॥
तुका म्हणे मज अवघ्याचा कंटाळा । तूं एक गोपाळ आवडसी ॥४९७.

विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठवूनियां चित्त तुझे पायीं ॥
तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥
न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेइन देवा ॥
स्मरणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥
करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका म्हणे बोलें पांडुरंगा ४९८.

कृपाळु ह्मणोनि बोलतीं पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥
आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥
नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥
कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥
तुका ह्मणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ४९९.

मागणें तें एक तुज । देईं विचारोनि मज ॥
नको दुर्जनाचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥
जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥
रंक होईन दीनांचा । घाये देहपात साचा ॥
तुका ह्मणे हेंचि आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥ ५०० ॥

विधवेसी एक सुत । अहर्निशी तेथें चित्त ॥
तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥
सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथेंचि संकल्प ॥
तुका ह्मणे चित्तीं । पतिव्रते जैसा पति ॥ ५०१ ॥
हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥
शांति दया अंतःकरणीं । रंगो नामनामीं वाणी ॥
मूळ द्वंद्वाचें विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥
तुका ह्मणे हरी । आतां आपुलेंसे करी ॥ ५०२ ॥
दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥
आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥
उपजला भावो । तुमचे कृपें सिद्धी जावो ॥
तुका ह्मणे आतां । लाभ नाहीं या परता ॥ ५०३ ॥
धर्माची तूं मूर्ति । पापपुण्य तुझे हातीं ॥
मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥
करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥
जिवींच्या जीवना । तुका ह्मणे नारायणा ॥ ५०४ ॥
ठाकलोंसें द्वारीं । उभें याचक भीकारी ॥
मज भीक कांहीं देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥
याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥
तुका ह्मणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ५०५ ॥
काय नव्हे करितां तुज । आतां राखें माझी लाज ॥
मी तों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ठ तों पाशीं ॥
त्राहें त्राहें त्राहें । मज कृपादृष्टी पाहें ॥
तुका ह्मणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ५०६ ॥
ताम्बोल्याची धणी । फिटे रांगा नव्हे उणी ॥
माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥

तूं तों उदाराचा राणा । माझी अल्पचि वासना ॥
कृपादृष्टी पाहें । तुका ह्मणे हेंहि साहे ॥ ५०७ ॥

पाहतोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥
वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडुनि हस्तक ॥
बरवें करीं सम । नको भंगो देऊं प्रेम ॥
तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ५०८ ॥

लहाणपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥
ऐरावत रत्न थोर । तया अंकुशाचा मार ॥
ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥
तुका ह्मणे बरवे जाण । व्हावें लहानाहुनि लहान ॥ ५०९ ॥

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥
न लगे मुक्ति धन संपदा । संत संग देई सदा ॥
तुका ह्मणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हांसी ॥ ५१० ॥

(निळोबा.)

अगाध महिमा तुमचा देवा । काय म्यां वानावा मूढमती ॥
जगाचि ह्मणवीं तुमचा दास । करूनियां आस पायांची ॥
शब्द चातुर्य कांहींचि नेणें । बोबडें बोलणें ज्या कानीं ॥
निळा म्हणे आपुला म्हणावा । भलतैसा ठेवा भलतेथें ॥ ५११ ॥

अवलोकुनी माझिया भावा । करावा देवा अंगिकार ॥
जेणें तुमची घडेल सेवा । होईन देवा पात्रभूत ॥
धरिल्या जन्माचें सार्थक । घडेल लोक मानावती ॥
निळा ह्मणे ऐसें करा । अहो दातारा पंढरीच्या ॥ ५१२ ॥

आतां माझा अंगिकार । करा थार पायापें ॥
वाखाणियां आपुल्या गुणीं । माझी वाणी रंजवा ॥

आळीमोळी करीन सेवा । तुमची देवा ते घ्यावी ॥
निळा ह्मणे विनवूं मेणें । तरी पोसणें मी तुमचें ॥ ५१३ ॥
तुमचे चरणीं राहो मन । करा हें दान कृपेचें ॥
नामीं तुमचे रंगो वाचा । अंगीं प्रेमाचा आविर्भाव ॥
ह्रदयीं तुमची राहो मूर्ती । वाचे कीर्ती पवाडे ॥
निळा म्हणे ठेवा ठायीं । जीवभाव पायीं आपुलीये ॥ ५१४ ॥
दंभ मान नका । देऊं वैकुंठनायका ॥
तुमचीं गाऊं द्या निश्चल । गुण नामें सर्वकाळ ॥
शांती क्षमा दया । त्याहि नका पंढरिराया ॥
निळा म्हणे निरुपाधी । ठेवा माझी चरणीं बुद्धि ॥ ५१५ ॥
विश्वास अंतरींचा जाणोनी । नाम ठेवा माझ्या वदनीं ॥
रूप मनाचे आसनीं । कृपा करुनी बैसवा ॥
करीन तैसी घ्यावी सेवा । विश्वास पालटों न द्यावा ॥
आईका विनविलें तें देवा । अहो पंढरीनिवासा ॥
माझिये बुद्धीसी धैर्य द्यावें । सेवेसी इंद्रियां राबवावें ॥
आपुलीये कीर्तनीं राखावें । प्रेम माझें सर्वदा ॥
गर्व अभिमान दवडावा । आळस निद्रा परती ठेवा ॥
विसर तुमचा न पडे देवा । देई सेवा हें दान ॥
निळा ह्मणे कृपासिंधू । तुह्मी साचार दीनबंधू ॥
अहा ह्मणोनी घेतला छंदू । येवढें आर्त पुरवावें ॥ ५१६ ॥

## करुणा.

(एकनाथ.)

धांव रे धांव आतां दीनवत्सला रामा ।
संसार संग गोष्टी मी गुंतलों कामा ॥
तारुण्य अभिमानें अंगीं भरला ताठा ।
विषय संपत्तीचा मज फुटला फांटा ॥

विषय भोगितांना देह पोसिलें साचें ।
स्वहित आठवेना ध्यान चुकलों मी तुझें ॥
विषयां मोकलिलों तुज शरण मी आलों ।
एकाजनार्दनीं पायीं लीन मी झालों ॥ ५१७ ॥

भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा । अभिमान नित्य नवा तयामाजीं ॥
प्रेमसुख देई प्रेमसुख देई । प्रेमेविण नाहीं समाधान ॥
रांडवेनें जेविं शृंगार केला । प्रेमेविण झाला ज्ञानी तैसा ॥
एका जनार्दनीं प्रेम अति गोड । अनुभवीं सुरवाड जाणसील ५१८

अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । म्हणवोनी सांभाळ करीं माझा ॥
तुज ऐसा देव नाहीं त्रिभूवनीं । म्हणवोनी चरणीं विनटलों ॥
बापा जनार्दना कृपा करीं दान । सांभाळीं वचन आपुलें तें ॥
एका जनार्दनीं भेटी देईं देवा । संतापायीं भावा मिठी पडो ५१९

तुजविण आम्हां कोण आहे देवा । धांव यादवराया मायबापा ॥
पडिलोंसे डोहीं प्रपंच आवर्ती । कोण करी शांति तुजविण ॥
जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवीं दातारा मायबापा ॥
एका जनार्दनीं धांवे लवलाही । येवोनिया हृदयीं ठाव देईं ॥ ५२० ॥

कैचें आम्हां यातीकुळ । कैचें आम्ही धर्मशीळ ॥
तुझें नामीं अनुसरलों । तीहीं लोकीं सरते झालों ॥
कैची क्रिया कैचें कर्म । कैचा वर्णाश्रमधर्म ॥
एका जनार्दनीं याती कुळ ॥ अवघा व्यापक विठ्ठल ॥ ५२१ ॥

धांव नारायणा । माझ्या दुःखाच्या निरसना ॥
संसारें कष्टलों । तुजलागीं शरण आलों ॥
कोण सोडवील आतां । तुजविण जी अनंता ॥
तूंचि मायबाप । निवारीशी सर्व ताप ॥
एका जनार्दन पायीं । मिळालिया निसी राहे ॥ ५२२ ॥

226710

आम्ही दीन तूं दीननाथ ॥ तीहीं लोकीं तुझी मात ॥
आम्हीं पतित तूं पावन । ऐसें साजे नामाभिधान ॥
आम्ही अनाथ तूं कैवारी । ऐसी तुझी आहे थोरी ॥
आम्ही दीन तूं वत्सला । ऐकिला तो ऐसा बोला ॥
नको धरूं दुजें आतां ॥ कृपाळू तूं दीनानाथा ॥
एका शरण जनार्दनीं । ऐसें चालत आलें दुरुनी ॥ ५२३ ॥
आम्हीं मागतों फुकाचें । तुम्हां देतां काय वेचे ॥
संत संग देई देवा । तुज नको कांहीं गोवा ॥
पंढरीसीं ठाव द्यावा । हेंचि मागतसे देवा ॥
एकाजनार्दनीं मागत । एवढा पुरवा मनींचा हेत॥५२४॥
मागणें हेंचि माझें देवा । दुजेंपण दुरी ठेवा ॥
मी तूं ऐसी नको उरी । जनार्दना कृपा करीं ॥
रंक मी एक दीन । माझें करावें स्मरण ॥
नीच सेवा मज द्यावी । एकाजनार्दनीं आस पुरवावी५२५॥
पायीं जडलें माझें मन । चित्तीं झालें समाधान ॥
तुमच्या नामाचा महिमा । आजी पावन केलें आम्हां ॥
करुणा केली तुम्हीं । लावियेलें आपुले नामीं ॥
एकाजनार्दनीं पूर्ण कृपा । तेणें मार्ग झाला सोपा ॥ ५२६ ॥
गुंतलों प्रपंचीं सोडवींगा देवा । देईं तुझी सेवा जीवेंभावें ॥
नको धन मान पुत्र दारा वित्त । सदा पायीं चित्त जडोनी राहो ॥
वैष्णवांचा दास कामादि निःशेष । हेंचि पुरवी आस दुजें नको ॥
एकाजनार्दनीं करीत विनंती । मागणें श्रीपति हेंचि द्यावें ॥५२७॥

(तुकाराम.)

संसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥
म्हणोनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥
बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥
वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यकारीं । कणव न करी कोणी माझी ॥५२८॥

अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥
बोलिलें वचन न पडोचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची ॥
मज याचकाची पुरवावी आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥५१९॥
मुखें बोलावें तें जीवींचें जाणसी । विदित पायापाशीं सर्व आहे ॥
आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणा तुम्ही त्याचा ॥
आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वाही पडों नये ॥
तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥५२०॥
हातीं धरिलियाची लाज । देवा असोंदे गा तुज ॥
आहें अमंगळ दुर्बळ । होईं दीन तूं दयाळ ॥
बाळ शेंबडें मातेसी । काय नावडे तियेसी ॥
तुका ह्मणे जाणें । करिन देहाचें सांडणें ॥ ५२१ ॥
देह तंव आहे प्रारब्धा आधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥
सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥
लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥
तुका म्हणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा५२२
कोण तो उपाव करूं भेटावया । जाळावी हे काया ऐसें वाटे ॥
सोडोनियां गांव जाऊं वनांतरा । रुक्मादेवीवरा पाहावया ॥
करूं उपवास शोधूं हें शरीर । न धरवे धीर नारायणा ॥
जाती आयुष्याचे दिवस हे चारी । मग केव्हां हरी भेटशील ॥
तुका ह्मणे कांहीं सांगा विचारोनि । विठो तुझे मनीं असेल तें ५२३
नाहीं आलें भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञानदेवा काय करूं ॥
नसावें जी तुम्ही कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥
एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥
तुका ह्मणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली सौम्य मज५२४
न कळतां काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥
येऊनियां वास करिसी ह्मदयीं । ऐसें घडे कईं कासयानें ॥

निजलिया ठायीं पोकारिला धांवा । साकडें तें देवा निवारावें ॥
नाहीं आणुनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥
तुका म्हणे आम्हीं वेंचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साच भावें ५३६

ऐसें भाग्य कई लाहातां होईन । अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥
मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥
शान्ति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिकां ॥
विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगितो ज्वाळ अग्नि जैसा ॥
भक्ति नवविधा भाव शुद्ध वरी । आलंकारावरी मुकुटमणी ॥
तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥५३७॥

स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥
आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥
येऊनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥
तुका ह्मणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें५३८

आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उमजलें ॥
तुका शरणागत व्हावें नारायणा । अंगीकारा दीना आपुलिया ॥
विसरलों काम याजसाठीं धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥
तुका ह्मणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं जाली तैसी५३९

अवघ्या पातकांची मी एक रासी । अवघा तूं होसी सर्वोत्तम ॥
जैसा तैसा लागे करणें अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥
अवघेची मज गिळियेलें काळें । अवघीच बळें तुझे अंगीं ॥
तुका ह्मणे आतां खुंटला उपाय । अवघेचि पाय तुझे मज ॥५४०॥



कांहीं चळ तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ॥
आणविल्यासाठीं कैसें पडे रुजु । धणी नाहीं उजू सन्मुख तो ॥
केल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखा आह्मीं ॥
नाहीं मनोगत तोंवरि हे देवा । तुका ह्मणे सेवा सेधा जे तों ५४१
नाहीं गुणदोष लिंपों देत अंगीं । झाडितां प्रसंगीं वरीवरी ॥
निकटवासिया आळविलों धांवा । तेथूनिया देवा सोडवूनी ॥
घमटे अंतरीं तें करूं प्रगट । कळोनी बोभाट धांव घाली ॥
तुका ह्मणे तरि वांचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी असों ५४२
असो वेचलों इंद्रियांचे ओढी । जालें तें तें घडी निरोपिलें ॥
असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥
कायावाचामनें तोचि निजध्यास । येथें जालों ओस भक्तिभावें ॥
तुका ह्मणे करूं येईल धांवणें । तरि नारायणें सांभाळावें ॥५४३॥
मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥
आतां तूं उदास नहों नारायणा । धांवे मज दीना गांजियेलें ॥
धांव घाली पुढें इंद्रियांचे ओढी । केलें तडातोडी चित्त माझें ॥
तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥
निग्रह या मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥
आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥
सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥
तुका ह्मणे मी तो अज्ञानचि आहें । परि तुझी पाहें आस देवा ५४५
माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥
आतां आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥
वाचा वदे परि करणें कठीण । इंद्रियां आधीन जालों देवा ॥
तुका ह्मणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ५४६
तुज करितां होतें आलाचें तें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥
कां नये कैवार करूं अंगीकार । माझा बहु भार जड जाला ॥

तुजलागीं ह्मणों तरी जीवांचाही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ॥
तुका ह्मणे ऐसें काय सत्ताबळ । माझे परी कृपाळ आह्मां तुह्मी ॥
मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वचे तें ॥
हांसोनियां पळे सांडुनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥
मांडवल आह्मां आळी करावी हे । आपणची माये धांवसील ॥
तुका ह्मणे आळी करूनियां निकी । देसील भातुकीं कुरवाळूनि ५४९
क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥
येईं वो येईं वो येईं लवलाहीं । आलिंगूनि बाहीं क्षेम देईं ॥
सताविळ मन पंथ अवलोकी । आठवा ते चुकी काय जाली ॥
तुका ह्मणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥
येईं गे विठ्ठले विश्वजीवनकळे । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥
येईं गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥
न लगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥
तुका ह्मणे धांव घालीं कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देईं मज ५५०
करोनि स्नानविधि आणि देवधर्म । क्रिया नित्य नेम तुजसाठीं ॥
तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळही व्रतें तुजलागीं ॥
सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडसी प्रीति नारायणा ॥
तुका ह्मणे याही पवित्राच्या राशी । प्राणविसाविया पांडुरंगा ५५१
भुकेलिया बाळा अत्यंत जाळधर । तेणेंच प्रकार न्याय असे ॥
न चलें पाउलीं सांडीं गरुडासन । मनाचें हीं मन त्वरेलागीं ॥
तुका ह्मणे भूक न साहवे बाळा । जीवनांची कळा ओढलीसे ५५२
उपजोनी मरों किती वेळोवेळां । कोणा कळवळा येत माझा ॥
ह्मणऊनि धांवा करीं काकुलती । यावें बा श्रीपती सोडवाया ॥
बहुत या काळें केलीं भयाभीत । येतो गिवसीत पाठीलागीं ॥
तुका ह्मणे तुह्मी दावितां स्वरूप । माझें कांहीं पाप निरसतें ५५३

मायबापापुढें लेंकराची आळी । आणिक हे पाळी कोण ळळे ॥
सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळी असतां अव्हेर कां ॥
आणिकांची चाले सत्ता आह्मांवरी । तुमची ते थोरी काय मग ॥
तुका ह्मणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ५४
कां जी आह्मां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥
पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥
कां जी आह्मांवरि आणिकांची सत्ता । तुह्मांसी असतां जवळिकें ॥
तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥५५५॥
निश्चितीनें होतों करुनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥
अनंत उठती चित्ताचे तरंग । करीतां हा त्याग वाटतसे ॥
कोण तुह्मांविण मनाचा चाळक । दुजे सांगा एक नारायणा ॥
तुका ह्मणे माझा मांडिला विनोद । करवूं तेणें छंद कराल काइ ॥
जीव जायवरी सांडी करी माता । हें तों आश्चर्यता बाळकाची ॥
दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जालें ॥
क्षणक्षणा माझा न घ्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला
तुका ह्मणे नाहीं वचनासी रुचि । फळकट वोंचि तें तें होय ५५७
तरी आह्मीं तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांया गेला ॥
अगा पंढरीशा उभा विटेवरी । येईं लवकरी धांवे नेटें ॥
पाववितों तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥
तुका ह्मणे तुज बहु कान डोळे । कां हे माझे वेळे ऐसी परी ॥
क्षुधार्थीसी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥
तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥
मांजरें देखिला लोणियांचा गोळा । लावूनियां डोळा बैसलेंसे ॥
तुका ह्मणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ५५९
आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती । रखुमाईचा पति पावेचि ना
काय सिपायानें घातलीसे रेखा । सुटका या दुःखा न होयचि ॥

तुका ह्मणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥
पावलों हा देह काकतालिन्यायें । न घडे उपायें घडों आलें ॥
आतां माझीं खंडों देहदेहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥
अंधळ्याचे पाठीं धनाची चरवी । अघटित तैंवी घडों आलें ॥
तुका ह्मणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥
कांगा कोणी न म्हणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं जाल तेव्हां ॥
तेव्हां माझ्या मना होईल समाधान । जाइल सर्व शीण जन्मांतरिचा ॥
तुका ह्मणे माझी होशील माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥
हेंचि वेळां देवा नका मागें घेऊं । तुम्हांविण जाऊं शरण कोणा ॥
नारायणा ये रे पाहें विचारून । तुजविण कोण आहे मज ॥
रात्र दिवस तुज आठवूनि आहें । पाहातोसी काय सत्व माझें ॥
तुका म्हणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ५६३
कुरंगी पाडस चुकलेंसें वनीं । फुटे तुटे करोनि हृदय त्याचें ॥
तैसा परदेशी झालों तुजविण । नको हो निर्वाण पाहूं माझें ॥
अपराधाच्या कोटी घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥
तुका म्हणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पांडुरंगा ५६४
सन्मुखचि तुह्मीं सांगावी जी सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥
नेघों आम्ही कांहीं चित्तवित्त घरें । आपल्या उदारें जीवावरी ॥
लोक परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥
तुका म्हणे सत्य बोलतों वचन । करूनी चरण साक्ष तुझे ॥५६५॥
कोणाचें चिंतन करूं ऐसा काळें । पायांचिया बळें कंठीतसें ॥
पाहातसें वाट येई गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥
बहुतांचे सत्ते जालों कासावीस । जाय रात्र दिस वैरियांचा ॥
तुका ह्मणे ऐसें मानाचिये मुळीं । तरीच हीं जाळीं उगवतीं ५६६
आतां पाहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥
करीं अंगीकार राखें पायांपाशीं । ह्मणी दिसों देसी कींविलवाणें ॥

नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥
तुका म्हणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥५६७
लेंकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥
आम्हां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिती ॥
वचनाचा घेइन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरविलें ॥
तुका म्हणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ५६८
पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥
तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां वाढविला ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि जाली परी मज देवा ५६९॥
कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसां ॥
कंठीं प्राण पाहें वचनाची आस । तों दिसे उदास धरिलें ऐसें ॥
येणें काळें तुंथी घेतलीसे खोल । कां नये विटाळ होऊं माझा ॥
लाज वाटे मज म्हणवितां देवाचा । न पुसती फुकाचा तुका म्हणे॥
मातीचिया मोला नाहीं पेसपाड । भलतसें गोड करुनि घेई ॥
तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गायें नाम तुझें ॥
वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥
तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवींचिया सखया जिवलगा ॥
गंगा गेली सिंधुपाशीं । जरि तो ठाव नेदी तिशीं ॥
तिणें जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥
जळ क्षोभलें जळचरा । माता बाळा नेदी थारा ॥
तुका म्हणे आलों शरण । देवा त्वां कां धरिलें मौन ॥ ५७२ ॥
तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥
धरणें घेतलें दारांत । नको धरून उठवूं हात ॥
घेतली सुरकुंडी । थोर झालों मी लंडी ॥
तुका म्हणे जगजीवना । मीतें पाहें नारायणा ॥ ५७३ ॥

सांडियेली काया । वरी ओंवाळूनी पायां ॥
शरण शरण नारायणा । मज अंगिकारा दीना ॥
भावें आलों लोटांगणीं । रुळें तुमचे चरणीं ॥
तुका ह्मणे कांहीं । डोई ठेवीन हे पायीं ॥ ५७४ ॥
उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥
मज दिलें कोणा हातीं । काय मानिली निश्चिती ॥
कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥
तुका ह्मणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥ ५७५ ॥
आतां दुसरें नाहीं वनीं । निरंजनीं पडिलों ॥
तुमचीच पाहें वास । अवघी आस निरसली ॥
मागिलांचा मोडला माग । घडला त्याग अरुची ॥
तुका ह्मणे करुणाकरा । तूं सोयरा जीवींचा ॥ ५७६ ॥
माझें जड भारी । आतां अवघें तुम्हांवरी ॥
जालों अंकित अंकिला । तुमच्या मुकलों मागिला ॥
करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥
तुका पायां लागे । कांहीं नेदी ना न मागें ॥ ५७७ ॥
जालों तव साचें । दास राहवणें काचें ॥
हें कां मिळतें उचित । तुह्मी ह्मणा कृपावंत ॥
सिंहाचीं तीं पिलें । जाय घेऊनियां कोल्हें ॥
तुका ह्मणे लाज । आह्मां ह्मणविलियां दास ॥ ५७८ ॥
बुद्धिहीनां जडजीवां । नको देवा उपेक्षूं ॥
परिसावी विज्ञापना । आह्मां दीनां दासांची ॥
चिंतूनियां आले पाय । त्यांसी काय वंचन ॥
तुका ह्मणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥ ५७९ ॥
बहु वाटे भये । माझे उडी घाला दये ॥
फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडीं ॥

कुंठिताचि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ॥
तुका म्हणे देवा । काममोर्हे केला गोवा ॥ ५८० ॥
क्षेम देया लाहो । स्फुरताती दंड बाहो ॥
आतां झडझडां चालें । देई उचलूनि पाउलें ॥
सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥
तुका ह्मणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥ ५८१ ॥
अल्प माझी मती । म्हणोनि येतो काकुलती ॥
आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥
धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥
तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ५८२ ॥
धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥
वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥
उशीर तो आतां । न करावा हेच चिंता ॥
तुका ह्मणे त्वरें । वेग करीं विश्वंभरें ॥ ५८३ ॥
घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या दया ॥
तैसें कां हें नये करूं । पांडुरंगा आह्मां तारूं ॥
रोगियासी काढा । वैद्य वारिताती पीडा ॥
बुडत्यासाठीं उडी । घालिताती काय जोडी ॥
झाडित ती कांटे । पुढें मागिलांचे वाटें ॥
तुका ह्मणे भार । घेती भागल्यांचा फार ॥ ५८४ ॥
बाहवलों पुरीं । आतां उचित तें करीं ॥
माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा ॥
आह्मां ओढी काळ । तुझें क्षीण जालें बळ ॥
तुका ह्मणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ५८५ ॥
तूं श्रीयेचा पति । माझी बहु हीन याती ॥
दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥

माझ्या दीनपणा पार । नाहीं बहु तूं उदार ॥
तुका ह्मणे पांडुरंगा । मी ओहळ तूं गंगा ॥ ५८६ ॥
जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥
ठाव द्यावा पायांपाशीं । मी तों पातकांची राशी ॥
सकळही गोवा । माझा उगवूनि देवा ॥
तुका ह्मणे भय । करा जवळी तें नये ॥ ५८७ ॥
विठ्ठल माझी माय । आह्मां सुखा उणें काय ॥
घेतों अमृताची धनी । प्रेम वोसंडलें स्वनीं ॥
क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥
तुका ह्मणे कृपावंत । ठेवीं आह्मांपाशीं चित्त ॥ ५८८ ॥
प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥
बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे ॥
वरी वरी तोंडापुरतें । मोहोरी तें कळतसे ॥
जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारीखा ॥ ५८९ ॥
गातों नाचतों आनंदें । टाळघागरियाच्या छंदें ॥
तुझी तुज पुढें देवा । नेणों भाव कैसी सेवा ॥
नेणों ताळ घात मात । भलते सेवां पाय हात ॥
लाज नाहीं शंका । प्रेम घाला ह्मणे तुका ॥ ५९० ॥
चित्त गुंतलें प्रपंचें । जालें वेडें ममतेचें ॥
आतां सोडवीं पांडुरंगा । आलें निवारीं तें अंगा ॥
गुंतली चावटी । नामीं रूपीं जाली तुटी ॥
तुका ह्मणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥ ५९१ ॥

(निळोबा.)

दीनबंधू आत्मयारामा । सुखविश्रामा विश्वजनका ॥
परात्परा पुरुषोत्तमा । आगमानिगमा जगवंद्या ॥
निर्विकल्पा निरंजना । सुखनिधाना गुणमूर्ती ॥
आणा ये निळयाच्या दातारा । रुक्मिणीवरा श्रीविठ्ठला ॥ ५९२ ॥

केसी वानूं त्याची थोरी । ज्याची चराचरीं जीवनकळा ॥
आदिकरूनि ब्रह्मादिक । शेवटील कीटक धरूनियां ॥
चंद्र सूर्य तारांगणा । दीप्ति हुताशना ज्याचेनी ॥
निळा म्हणे महिमा ज्याचा । वर्णितां वाचा वेद मुके ॥ ५९३ ॥
मी तों दीन नेणें रंक । परि तुम्ही चालक ब्रह्मांडा ॥
केले अपराध क्षमा करा । काय त्यां दातारा विनवावें ॥
येवढेंचि आहे माझे हातीं । यावें काकुळती तुम्हांसी तें ॥
निळा म्हणे उचित जाणा । आपुल्या हो श्रीरंगा पंढरीच्या ५९४
सांगावें उगवुनी न कळे तयासी । तुम्ही तो मानसीं साक्ष माझे ॥
विश्वाचे व्यापक चालक चित्ताचे । साक्षी अंतरीचें जेथें तेथें ॥
ब्रह्मादिक देव तेहि आज्ञाधार । तुमचे किंकर काळ काम ॥
निळा म्हणे माझा करा अंगीकार । हेंचि निरंतर विनवितसें ५९५
किती तरी चिंता करूं । धीर धरूं कोठवरी ॥
आला दिवस वुडोनी जातो । अतिशयाचि रहातो केला तो ॥
निश्चयें माझा अव्हेर केला । पांडुरंगा विठ्ठला कळों आलें ॥
निळा म्हणे आधार नेदा । कांहींच गोविंदा चित्तासी ॥ ५९६ ॥
जाणे पाळूं लळा । माता स्नेहातुर ॥
ऐसे जाणतसां सकळ । तरि कां लावियला वेळ ॥
उपेक्षिलें ये परदेशीं । एकलेंचि मज उपवासी ॥
निळा म्हणे यावरी करा । समाधान हृदयीं धरा ॥ ५९७ ॥
जरी अवगुणी अन्यायी । बाळा उपेक्षी कीं आई ॥
झाल्या अपराधाच्या कोटी । घालूनियां साहे पोटीं ॥
कुरवाळुनी मोहें । तया पाजी प्रेमपेहें ॥
निळा म्हणे अंकीं । घेऊनी पहुडे पर्यंकीं ॥ ५९८ ॥
मोकलितां धाय । नाईकसी कैसी माय ॥
सांडियलें दूरदेशीं । नये करुणा कांहीं ऐसी ॥

वेष्टिलें श्वापदीं । अहंकार मोहमदीं ॥
निळा म्हणे यावरी आई । धांव घाली वो विठाई ॥ ५९९ ॥
राग आला तरी । माय बाळातें नाव्हेरी ॥
राखे त्याची भूक तान । न मारी कापूनियां मान ॥
शांतवुनी स्तनीं । लावी तया न्याहाळुनी ॥
निळा म्हणे घरीं । अंकीं तया माया करी ॥ ६०० ॥
भक्तप्रिये येवो आई । विठाबाई कृपाळे ॥
न साहे वियोग प्राण फुटे । उदास वाटे तुजविण ॥
कोणा जीवन भोजन मागों । कोणा सांगों जडभारी ॥
निळा म्हणे धांवोनि यावें । मज हें द्यावें जीवदान ॥ ६०१ ॥
धावोनियां येसी । प्रेम पान्हा तूं पाजिसी ॥
तरीच वांचतील प्राण । नाहीं तरी आलें मरण ॥
मायेविण बाळा । वरी कोणाचा कळवळा ॥
निळा म्हणे निज निगुती । पाळण पोषण तुझ्या हातीं ॥ ६०२ ॥
तुम्ही जाणा अंतरीचें । लटिकें साचें श्रीहरी ॥
आतां माझी कांहीं नका । मनीं शंका वागवूं ॥
नाहीं पवरा घालित पिळा । याजी गोपाळा म्हणउनी ॥
निळा म्हणे वदनीं राहो । नाम अहो विठ्ठला ॥ ६०३ ॥
बहुत पातक सांभाळिले । जे जे झाले शरणागत ॥
नानावर्ण नाना याती । धरिले हातीं नुपेक्षुनी ॥
केले वरिष्ठ सकळां लागीं । मिरविले निजांगीं आपुलिये ॥
निळा म्हणे उबग नेणें । करितां देणें कृपेचें ॥ ६०४ ॥
नाहीं घडली कमाई तैसी । मागें जैसी संतांची ॥
म्हणोनियां उपेक्षिलें । ऐसिये लोटिलें भवार्णवीं ॥
जे काम क्रोधा ऐसे । कवळती भासे जळचर ॥
निळा म्हणे काढील कोण । येथें धांवोन मज आतां ॥ ६०५ ॥

दीन मी अनाथ तुमचें रंक । मागतों भीक मज द्यावी ॥
नेऊन घाला पायांवरी । निरवा श्रीहरी कृपाघना ॥
उपेक्षावें शरणागता । जरी मी नेणता दास तुमचा ॥
निळा ह्मणे अवघे संत । मिळोनि स्वहित करा माझें ॥ ६०६ ॥
अहो देवा कृपावंता । करा मज अनाथा सनाथ ॥
निरवूनियां संतजनां । करा मना बोध माझ्या ॥
आरुषवाणी बोबडीं वचनें । केलीं स्तवनें परिसावीं ॥
निळा म्हणे आवडी जाणा । करी विज्ञापना म्हणवुनी ॥ ६०७ ॥
बोलिलों तें तुम्हां वर्णे । कीजे क्षमा नारायणें ॥
आपुलिये मी तळमळें । दुःखें चाळवलों तें कळे ॥
समर्थांची गति मति । कोण जाणे कैसी रीति ॥
निळा म्हणे उचित करा । जैसें आपुलें तें दातारा ॥ ६०८ ॥
ऐशी विठाई माउली । अनाथां कृपेची साउली ॥
उभी असे निरंतर । ठेवुनियां कटीं कर ॥
देखनी प्रेमाचें भातुकें । वासा अवलोकी कौतुकें ॥
निळा म्हणे महिमा ईचा । वर्णितां कुंठित वेदवाचा ॥ ६०९ ॥

( जनाबाई )

येगे माझे विठाबाई । कृपादृष्टीनें तूं पाहीं ॥
तुजविण न सुचे कांहीं । आतां मी वो करूं कांहीं ॥
माझा भाव तुजवरी । आतां रक्षीं नानापरी ॥
येई सखये धांउनी । म्हणे नामयाची जनी ॥ ६१० ॥

( निवृत्ति. )

नाहीं जातिकूळ तुझें म्यां पुशिलें । परी मन मावळलें देखोनियां ॥
तुझेंचि कुवाडें सांगत तुजपुढें । तेणें मुक्तीचीं कवाडें उघडलीं ॥
तुजपाशीं सांगतां वाटे लाजिरवाणें । हांसतील पिसुणें प्रपंचाचीं ॥
कासें आथिलांचि भलें लपवितां सांपडलें । ज्ञानदेव बोले निवृत्तीशीं ॥

अवघा सुखरूप अवघाचि रूपीं । अवघाचि आपीं धरुनी ठेला ॥
नाम तें अवघें उच्चारिसी वेगें । येर तें वाउगें कर्महीन ॥
निवृत्ति गुरुप्रसादें नामीं निमग्न । नाम ह्मणवां यज्ञ कोटी र्‍या ६१२

## गुरु.

(ज्ञानदेव.)

उपजोनी नरदेहीं । जयाशी हरिभक्ति नाहीं ॥
तोचि भूमिभार पाही । व्यर्थ जन्म त्याचा गेला ॥
पशुप्राणी तया जोडी । नेघेचि हरिनाम कावडी ।
तो कैसेनि परथडी । नामेंवीण पावेल ॥
जिव्हा बेडुकी चावट । विसरली हरिनाम पाठ ॥
ते चुकले चुकले वाट । वैकुंठाची जाण र्‍या ॥
बाप रखुमादेवि निर्धार । नामें तरले चराचर ॥
जो रामकृष्णीं निरंतर । जिवें जप करील र्‍यां ॥ ६१३ ॥
धर्म वसे जेथें । सर्व कार्य होय तेथें ॥
पित्या सहित मनोरथें । सिद्धि पावेल सर्वथा ॥
धन्य धन्य पितृव्रत । धन्य धन्य धर्म कृतार्थ ॥
धन्य धन्य वेदाचा सथितार्थ । रामकृष्ण मुखीं नाम ॥
जंववरी आयुष्य आहे । तंववरी हरीची सोये ॥
हरी हरी मुखीं राहे । तो सुखी होय अंतीं देखा ॥
ज्ञान ध्यानें निवे संध्या । ज्ञान विज्ञान हाचि धंदा ॥
रामकृष्ण हरी मुकुंदा । परमानंदा जगद्गुरू ॥
ज्ञानदेवें सुकाळ केला । हरी हृदयीं सांठविला ॥
हरिपाठ हाचि साधिला । अनंत अनंत परवडी ॥ ६१४ ॥

[illegible]
विविधा मति भक्ति जे करिती । ते अंतीं नव्हती संसार बापा ॥
कापुराचे जरी लिहिजे लिखित । तरि छाये पडे हात प्रकृतीचे ॥
पवना पाठीं पांगुळें लागती । तैं जन्मा येति हरिचे दास ॥
संत वैष्णव हरिदासा जे नर निंदिती । ते वरपडे होती प्रेम किंकर ॥
निवृत्ति दास ह्मणे विठ्ठलीं जे भजती । ते जन्मा नयेती भाक माझी ॥

---

## आत्मस्थिति.

( नामदेव ).

सांडोनि संसार झालों मी अंकित । पेशियाचा अंत पाहूं नको ॥
पातकी मी सत्य पातकी मी सत्य । पातकी मी सत्य पांडुरंगा ॥
माझे गुणदोष न धरिसी चित्तीं । थोरपण ख्याति दावी आम्हां ॥
ऐसा अपराध आणूं नको मना । पंढरीचा राणा ह्मणोनियां ॥ ६१६ ॥
वीतभर पोट लागलेंसे पाठीं । साधुसंगें गोष्टी सांगूं न देई ॥
पोट माझी माता पोट माझा पिता । पोटानें ही चिंता लाविलीसे ॥
पोट माझा बंधु पोट माझी बहीण । पोटानें हें दैन्य मांडिलेंसे ॥
विष्णुदास नामा पोटाकडे पाहे । अझून किती ठाये हिंडविसी ॥ ६१७ ॥
मज गांजिल्याचा धांवा । सावधान परिसावा ॥
विठो सुजाणाच्या राया । धांव माझ्या करुणालया ॥
मोहोपाशीं मज बांधिलें । थोर वैर त्वां साधिलें ।
माझें मन हें पामर । भ्रांत हिंडे दारोदार ॥
नामा ह्मणे काय करूं । तुजविण भूमिभारू ॥ ६१८ ॥

आपुले रूपीं मज लपवीं निरंतर । सबाह्यभीतर आड राखीं ॥
परि तुज मज असावा संवादु । भ्रांति माया बाधु काय करी ॥
काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । हे वैरी अपार भारी माझे ॥
नामा ह्मणे आह्मी जन्मजन्मांतरींचे । पोसणे घरींचे दास तुझे ६१९

अनाथासी साह्य होसी नारायणा । करुणावचना बोलविसी ॥
पांडुरंगा कृपा करा मजवरी । पामरा उद्धरीं पाहतांची ॥
गणिके सत्वर मोक्षपद देसी । उपमन्यु बाळासी क्षीरसिंधु ॥
नामा ह्मणे काय याति न विचारी । विदुराचे घरीं खासी कण्या ॥

पतित पावना धांवसि निर्वाणीं । ब्रीद चक्रपाणी सत्य केलें ॥
काय अपराध कोणाचे पाहिले । नाहीं तूं त्यागिलें नष्ट खळा ॥
अजामेळासाठीं अहार वर्जिले । बीज तें भर्जिलें भवमूळ ॥
नामा ह्मणे देवा नागवण बारे । आता उणें पुरें पाहूं नको॥ ६२१॥

जगज्जीवना अगा नारायणा । कां नये करुणा दासाची हे ॥
अच्युता केशवा येगा दीनानाथा । सर्वज्ञा समर्था कृपामूर्ती ॥
चिद्धना चिद्रूपा विरंचीच्या बापा । करावी जी कृपा सर्वांभूतीं ॥
तुझें ह्मणविलें उपेक्षिसी जरी । नामा ह्मणे हरी ब्रीद काय॥ ६२२॥

( जनाबाई ).

चरण विठोबाचे देखिले । साही रिपु हारपले ॥
नाहीं नाहीं ह्मणती आह्मी । सांगसी त्या लागूं कामीं ॥
नाहीं तरी जाऊं देशीं । जनी नामयाची दासी ॥ ६२३ ॥

श्रीमूर्ति असे बिंबली । तरी हे देहस्थिति पालटली ॥
धन्य माझा इह जन्म । हृदयीं विठोबाचें नाम ॥
तृष्णा आणि आशा । पळोन गेल्या दाही दिशा ॥
नामा ह्मणे जनी पाहें । द्वारीं विठ्ठल उभा आहे ॥ ६२४ ॥

माझें मनीं जें जें होतें । तें तें दिधलें अनंतें ॥
देह नेउनी विदेही केलें । शांति देउनी मीपण नेलें ॥
मूळ नेलें हें क्रोधाचें । ठाणें केलें विवेकाचें ॥
निज पदीं दिधला ठाव । जनी ह्मणे दाता देव ॥ ६२५ ॥

## आत्मप्राप्ति.

(एकनाथ).

सर्वभूतीं भगवद्भाव । तंव तो भावचि झाला देव ॥
आह्मा ग्रासूं आला काळ । तंव तो काळच झाला कृपाळ ॥
एका जनार्दनीं शरण । आह्मा कैचें जन्ममरण ॥ ६२६ ॥
गुरुवचन जतना राखों । अपना आनंद सोही चाखों ॥ गुरु० ॥
वेद शास्त्र पढे अभिमान उठे । गुरुकृपा अभिमान तुटे ॥ गुरु० ॥
कर्म क्रिया करवीत दुःखी । गुरुकृपासोही सुखी ॥ गुरु० ॥
एका जनार्दनीं गुरुका नाम । और साधन कछु नहीं काम ॥ ६२७ ॥
कृपा करोनि सांगा गोठी । तत्काळ सोडे प्रपंच दिठी ॥
तयाची आह्मी धरिली कास । झालों दास जीवेंभावें ॥
माझें मरण मज दाविलें । जीव घेऊनिया जिणें पाल्हाविलें ॥
जें बोले वचनीं तें दावी नयनीं । एका जनार्दनीं बोध ऐसा ॥ ६२८ ॥
कळीकाळें आह्मासी दिधली पाठी । आलों जगजेठी रंगासी ॥
हरीचे दास झालों । रंगा आलों नाचावया ॥ ध्रु० ॥
मसवूत आह्मी तारिले पाहीं । आलों या ठायीं हरिरंगा ॥
मुखरी झाला जनार्दनीं एका । तेणें आह्मा देखा चाळविलें ॥ ६२९ ॥
साधनाचीं मापें घेऊनिया हातीं । पारखिची पाति कवण जाणे ॥
घळघळीत राम आपुलेनि मापें । खोटेनि संकल्पें घेववेना बा ॥ ध्रु० ॥
सद्गुरुवेंति कसें खरें होय नाणें । न मावितांचि कैसें अनुभवी येणें ॥
एका जनार्दनीं खरेंनि साठी । घळघळीत रामाचें वैसलें पाठी ॥ ६३० ॥

पायींचा महिमा पायींचे जाणें । पायां लागोनि ब्राह्मण पायीं होणें ॥
फिटले फिरले तुटला हा वादू । यालागीं साधुनी दृढ करी साधू ॥ धृ०
मन फाडुनीयां केला वामवळू । पदोपदीं सुखवाडु संतचरणीं ॥
एका जनार्दन बाणला पायीं । सकळा जन्मा झाली येणें उतराई ६३१
अंतरीं मईल बाहेरी चोखाळ । कैसा तो निर्मळ होय बापा ॥
अंतरीं विभेद बाहेरी अभेद । कैसा त्या निजबोध होय बापा ॥
अंतरीं कापट्य बाहेरी निष्कापट्य । कैसें त्या निजपद होय बापा ॥
अंतरीं अनेक बाहेर दावी एक । जनार्दनीं एक एका कैसा ॥ ६३२ ॥

बंदे हुशार होई रे दीलमें समज रहो ।
कळवात बाजी मतकर यारो सुनता बाहीं देती ॥
अपना दाम खरचकर यारो हातमें चवरी आती ।
चाहडी चुलगी मतकर यारो सुनो हमारा माना ॥
राजाजीको झुठकी तो खुसासा दे परलेना ।
जुवबाजी मतखेल यारो सुनो हमारी बाता ॥
लसे कपडे सबही धीनकर सीरपर मारे जुत्या ।
एका जनार्दनका बंदा अकल सीकावे कीता ॥
सीकना होय तो सीकले भाई नहीं तो ज्या गू खाता ॥ ६३३ ॥

भेष घेउनी नुसता कां । करोनि जगावरी रुसता कां ॥
भोग देखोनी घुसता कां । आह्मी भले ह्मणोनी पुसता कां ॥
चिंता बाईल कां सांडिली । आशा परवधू कां धुंडिली ॥ धृ० ॥
शुभ्र सांडोनी भगवीं कां गुंडिली । ऐसी भंडी कांहो मांडिली ॥
तुह्मा प्रपंचावर एके घाई रुसवेना । अहं ज्ञातेपण कोण्हा पुसवेना ॥
एका जनार्दनीं मन जिंकवेना । मेल्या कुतऱ्यासारखें कां बसवेना ६३४
इहलोकीं भय तो परलोकीं बंध । त्यासी भेदत्व मिथ्या घडलें नाहीं ॥
परस्त्री देखतां नपुंसक यारो । परधन पाहतां अंधापरी मिथ ॥

वाद विवादा नोहे त्याची मती । हृदयीं भगवद्भक्ति सदा वाहे ॥
एका जनार्दनीं ऐसे विरळे प्राणी । कोटीमाजीं जनीं एक देखों ॥ ६३५ ॥
आठवा आठवा वेळोवेळ आठवा । श्रीकृष्ण आठवा वेळोवेळां ॥
कलीमाजीं सोपें आठवा आठवण । पावन तो जन्म आठव्यानें ॥
आठवा नामें तारी पांडवा साहाकारी । दुराचारियां मारी आठवा तो
एका जनार्दनीं आठव्याची आठवण । हृदयीं सांठवण करा वेगीं ६३६
काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । षड्वैरि तत्पर हेंचि तेथें ॥ ध्रु० ॥
क्षुधा तृषा मोहो शोक जरा मरण । षडूर्मी ते पूर्ण देहीं हेचि ॥
आशामनीषाकल्पनाइच्छातृष्णावासना । हे अठरा गुण जाणा देहामाजीं
एका जनार्दनीं त्यजुनी अठरा । तोचि संसारामाजीं शुद्ध ॥ ६३७ ॥
ध्यान धरितां ध्येय होईजे पैं आंगें । जळीं लवण विरे जेवीं सर्वांगें ध्रु०
कीटक भिंगुरटीं झाली ते कैसी । देहीच पालटु पाहे भ्रमें आकाशीं ॥
चंदनसन्निध चंदन पैं झालीं झाडें । संतसंगती स्वयें साधुत्व जोडे ॥
एका जनार्दनीं एकपणें पाहतां । सरसीसाठीं कै ध्येय ध्यान ध्याता ॥

---

## मनाचा संकल्प.

(एकनाथ)

कोणासवें आमुचें काय काज । सर्व पंढरीराज कैवारी ॥
उभा राहे मागें पुढें । निवारी सांकडें भक्काचें ॥
आघात घात निवारी । पीतांबरी करी छाया ॥
ऐसा अनुभव मज यावा । धांवे रावा पंढरीच्या ॥
एका जनार्दनीं भाव । धरलिया धांवे देव ॥ ६३९ ॥
विठ्ठल म्हणतां विठ्ठलची होसी । संदेह येविषयीं धरूं नको ॥
सागरीं उठती नाना पैं तरंग । सिंधु तो अभंग विठ्ठल एक ॥
तैसें मन करीं द्वैत न धरीं । सर्व चराचरीं विठ्ठल एक ॥
एकाजनार्दनीं विठ्ठलावांचुनी । दुजा तेणें कोणी स्वप्नीं नाहीं ६४०

अंगी जया पूर्ण शांती । वाचा रामनाम वदती ॥
अनुसरले चित्तवृत्ती । संतचरणीं सर्वदा ॥
घडो तयांचा मजसंग । जन्ममरणाचा फिटतसे पांग ॥
आधिव्याधि निरसे सांग ॥ घडतां संग वैष्णवांचा ॥
जें दुर्लभ तिहीं लोकां । आह्मां सांपडलें फुका ॥
एकाजनार्दनीं घोका । नाम त्याचें आवडीं ॥ ६४१ ॥

असत्याचा शब्द नको वाचे माझे । आणिक होका ओझें भलतैसें ॥
परी संतरज वंदीन मी माथा । असत्य सर्वथा नोहे वाणी ॥
अणुमात्र रज डोळा न साहे । कैसा खुपताहे जन दृष्टि ॥
एकाजनार्दनीं असत्याची वाणी । तोचि पापखाणी दुष्टबुद्धि ॥ ६४२ ॥

गाढव संगतीं सुकाळ लाथांचा । श्रम जाणिवेचा वायां जाय ॥
आह्मांसी तों एक प्रेमाचें कारण । नामाचें चिंतन विठोबाच्या ॥
एकाजनार्दनीं आवडी हे माझी । संत चरण पूजी सर्वकाळ ॥ ६४३ ॥

जन का निंदीना निंदीना । तसेंच निंदूं द्यांना ॥ ध्रु० ॥
निंदक करिती निंदा । निंदीती हरळी शिंपी कुंदा ॥
काय चाड जनासी । रतलों सद्गुरूच्या चरणांशी ॥
संत समागमें झालों धीट । गुरुपद जिंकिलें वैकुंठ ॥
एकाजनार्दनीं भावें । आह्मी कोणासी भांडावें ॥ ६४४ ॥

नाम संकीर्तन । हेंचि माझें संध्यास्नान ॥
तुमचें पायाचा आक्षेप । हाचि माझा काळक्षेप ॥
तुमचें पायाचें वंदन । हेंचि माझें अनुष्ठान ॥
तुमचें पायापाशीं निद्रा । हेंचि माझी प्रेममुद्रा ॥
एका जनार्दनीं सार । ब्रह्मरूप पहा संसार ॥ ६४५ ॥

## देवाशीं उद्गार.

( तुकाराम ).

असा जी सांवळें । आह्मां तैसेचि निराळें ॥
आम्हीं न यों तुमच्या वादा । काय लटिकाचि साठा ॥
चिंतनचि पुरे । काय सलगी सर्वे धुरे ॥
तुका म्हणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ६४६ ॥

अपराधी म्हणोनि येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥
येइ तारूं तरी ताराजी हो देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो भार ॥
कासया मी आतां वेंचूं हें शरीर । आहे बारगीर जाईं जनें ॥
तुका म्हणे मन करूनि मोकळें । आहे साळेंढाळें उदार मी ॥ ६४७ ॥

अनुभवें कळों येतें पांडुरंगा । रुसावें तें कां गा तुम्हांवरी ॥
आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥
अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । म्हणोनि अंतर तुझ्या पायीं ॥
तुका म्हणे काय करूं तेणें वर्म । आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥ ४४८ ॥

आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलिया ॥
भाग गेला शीण गेला । अवघा जाला आनंदु ॥
प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥
तुका म्हणे आम्हांजोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ६४९ ॥

आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलिया सेवा समर्थाची ॥
आतां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥
येथें नाहीं जाली कोणाची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥
तुका म्हणे येथें नाहीं दुजी परी । राया रंका सरी वेवा पायीं ॥ ६५० ॥

आतां गाऊं तुज ओंविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा ॥
होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥
कोडिलें ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होऊनि राहों ॥
तुका म्हणे आम्ही लाडिकीं लेंकुरें । न राहों अंतरें पायांविण ॥ ६५१ ॥

आम्हां सर्वभावें हेंचि काम । न विसंभावें तुझें नाम ॥
नलगे कशाची हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥
आसनीं भोजनीं शयनीं । तुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥
तुका म्हणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥ ६५२ ॥

आम्ही रामाचे राऊत । वीर जुंझार बहुत ॥
मनपवनतुरंग । हातीं नामाची फिरंग ॥
वारू चालवूं चहूंखुरीं । घाला घालूं यमपुरी ॥
तुका म्हणे पेणें । आम्हां वैकुंठासी जाणें ॥ ६५३ ॥

उपास सेवटीं अभ्यासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥
पुरवीं वासना साच सर्वजाणा । आम्हां नारायणा अंकिताची ॥
बहुदिसां पुत्रा मातेसवें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीति उभड ॥
तुका म्हणे धन कृपणा सोइरें । यापरि दुसरें नहो आतां ॥ ६५४ ॥

कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगितसे ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥
मातें त्या बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥
तुका म्हणे मुक्ताफळ शिंपी पोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ६५५

काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥
उलंघवे मज न सोपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥
आतां कैंचा मज सखा नारायण । गेला अंतरोन पांडुरंग ॥
तुका म्हणे व्यर्थ मोलाचें शरीर । गेलें हा विचार कळों आला ॥ ६५६ ॥

कायें करूनि करीं धंदा । चित्त गोविंदा तुझे पायीं ॥
ऐसा संकल्पाची संधि । माझे बुद्धि धीर देवा ॥
कुटुंबाचा तुम्हां भार । मज व्यवहार निमित्त ॥
तुका म्हणे करितां काम । हृदयीं नाम धरीन ॥ ६५७ ॥

गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरोनि म्हणें हरी ॥
माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥

मज हंसतील लोक । परि मी गाईन निःशंक ॥
तुझें नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥
तुका म्हणे माझी विनंती । तुम्ही परिसा कमळापती ॥ ६५८ ॥
जन्मोजन्मींचें संचित । भेटी जाली अकस्मात ॥
आतां सोडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥
माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥
तुका म्हणे अंतीं । तुझी माझी एक गति ॥ ६५९ ॥
तुजविण कोणा । शरण जाऊं नारायणा ॥
ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥
पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥
तुका म्हणे ठायीं । जडुन ठेलों तुझ्या पायीं ॥ ६६० ॥
कैसे नव्हों आम्ही विठोबाचे दास । यावें आणिकांस काकुलती ॥
स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥
अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ६६१ ॥
दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥
आतां तुम्ही सर्वजाण पांडुरंगा । पाहिजे प्रसंगा ऐसें केलें ॥
व्याघ्राजावयांचे पंगति दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥
तुका म्हणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुम्हां हातीं ६६२
निरोधिती परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥
वाहावेति तुम्ही भरोनि अंतरीं । होतों तदाकारी निर्विषयत्वीं ॥
कृपेचिया साक्षी असतां जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥
तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं । विनंती पायांपाशीं हेचि करीं ६६३
परि आतां माझी परिसावी विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥
नुपेक्षिल्या बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥
तुका म्हणे तुम्हा म्हणतसों मज । आतां आहे लाज हेचि तुम्हां ६६४

माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पति ॥
जाणे तान्हेल्याची तान । पीता गंगा नव्हे न्यून ॥
कल्पतरु जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥
तुका म्हणे संतत ध्यातां । परब्रह्मचि आलें हाता ॥ ६६५ ॥

वाचेच्या चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हातां आलें ॥
म्हणोनि पंढरिराया दुःखी होतें मन । अंतरींचें कोण जाणे माझें ॥
पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥
तुका म्हणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ६६६

शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥
अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरीनाथ ॥
घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥
सर्व भावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥ ६६७ ॥

हीन माझी याती । वरि स्तुती केली संतीं ॥
अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥
राख राख गेलों वांयां । तुका म्हणे पंढरीराया ॥ ६६८ ॥

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगें ॥
विटंबो शरीर होत का विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥
तुका म्हणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥ ६६९ ॥

असो खळ ऐसे फार । आम्हां तयांचे उपकार ॥
करिती पातकांची धुणी । मोल न घेतां साबणीं ॥
फुकाचे मजूर । ओझें वागविती भार ॥
पार उतरून म्हणे तुका । आम्हां आपण जाती नरका ॥ ६७० ॥

अवचिताचि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥
भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥

दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥
तुका म्हणे वांटा जाला । बोलों बोली देवासीं ॥ ६७१ ॥

आनंदाचा कंद गाइयेला गीतीं । पाहियेला चित्तीं देवराव ॥
देवराव तोही आहे निश्चयेसीं । अखंड नामासी बोलवितो ॥
बोलवितो मज कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं धरा भाव ॥ ६७२ ॥

आमुची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें ॥
लागेल तरी कोणी घ्यावें धणीवरी । असुपचि परि आवडीच्या ॥
उभारिला कर प्रसिद्ध या जगा । करू केला त्याग मागें पुढें ॥
तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान एकवेळ ॥ ६७३ ॥

आवडी भोजन प्रकार परवडी । भिन्न भिन्न गोडी एका रसा ॥
भोगित्या पंगती लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥
पाकसिद्धी स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥
तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ६७४

आम्हां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥
देव उभा मागें पुढें । उरावी कोठें संकट ॥
जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनि ॥
तुका म्हणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ६७५ ॥

करूं याची कथा नामाचा गजर । आम्हां संवसार काय करी ॥
म्हणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तया भेणें कळिकाळ ॥
आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥
तुका म्हणे करूं ऐसियांचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ६७६ ॥

कोणी निंदा कोणी वंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥
काय तुम्हांसी गरज । आम्ही भजूं पंढरिराज ॥
तुम्हांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥
तुका म्हणे हो कां कांहीं । गळा बांधला विठ्ठलपायीं ॥ ६७७ ॥

गादवाचें कोडें । आम्ही करूं दृष्टीपुढें ॥
वचळी वाहणा । माघारिया बांडा सुना ॥
सोंगसंपादणी । तरि करूं शुद्ध वाणी ॥
तुका म्हणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ४७८ ॥
ज्यानें आड यावें कांहीं । त्याचें नाहीं बळ आतां ॥
मन येथें साह्य जालें । हरिकथा घालें गुणवादीं ॥
चुकुर तो गेला काळ । जालें बळ संगाचें ॥
तुका म्हणे धरूं सत्ता । होईल आतां करूं तें ॥ ४७९ ॥
देव तिळीं आला । गोडें गोड जीव धाला ॥
साधला हा पर्वकाळ । गेला अंतरींचा मळ ॥
पापपुण्य गेलें । एका स्नानेंचि खंडिलें ॥
तुका म्हणे वाणी । शुद्ध जनार्दनीं जनीं ॥ ४८० ॥
धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ॥
वाचा बोलों वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥
न बाणतां स्थिति अंगीं कर्मत्यागी लंड तो ॥
तुका ह्मणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४८१ ॥
धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ॥
हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥
तीक्षण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरें ॥
नाहीं भीड भार । तुका ह्मणे साना थोर ॥ ४८२ ॥
नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । म्हणऊनि मन स्थिरावलें ॥
धरियेलीं जीवीं पाउलें कोमळीं । कंठीं एकावळी नाममाळा ॥
शीतळ होऊनियां पावलों विश्रांती । न साहे पुढतीं घालीं चित्ता ॥
तुका ह्मणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ४८३ ॥
निरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥
म्हणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥

देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥
तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे ६८४

पडिलों भोवणीं । होतों बहु चिंतवणी ॥
होतों चुकलों मारग । लाहो केला लाग वेग ॥
इंद्रियांचे संदी । होतों सांपडलों बंदीं ॥
तुका ह्मणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ६८५ ॥

पढीयंतें मागा पांडुरंगापाशीं । मज दुर्बळासी काय पीडा ॥
याचसाठीं दुरावला संवसार । वाढे हे अपार माया तृष्णा ॥
कांहीं करितां कोठें नव्हे समाधान । विचारितां पुण्य तेंचि पाप ॥
तुका ह्मणे आतां निश्चळचि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥६८६॥

प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातों हरी ॥
मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥
सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥
तुका ह्मणे ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे इच्छे ॥ ६८७ ॥

बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी ॥
तेथें मानसाचा कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥
संसाराचें बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षड्वर्गी ॥
तुका ह्मणे एक उरला धरितां ठाव । येर केलें वाव तृणवत ॥६८८॥

बोलणें तें आम्ही बोलों उपयोगी । पडिलें प्रसंगीं काळाऐसें ॥
ज्यामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेची ॥
करणें तें आम्ही करूं एका वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥
तुका ह्मणे असों आम्हीं धारकें । म्हणउनि एकें घायें सारूं ॥६८९॥

बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥
अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥
त्याचा होईल किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥
तुका म्हणे चिसी देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ६९० ॥

भूतीं देव म्हणोनि भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥
जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥
वर्मेसाठीं केला उपाधि पसारा । जड जीवा तारा नाव कथा ॥
तुका ह्मणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनियां ॥ ६९१ ॥
मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा एक ठाव नाहीं आतां ॥
ऐसें रवाही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥
पुढिलांचे मना आणी गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥
तुका ह्मणे जाली कोंबड्याची परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ६९२
सुखा मुखावाटा नयो हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणा ॥
फुकाचा विभाग पतन दुःखासी । दोहींमुळें त्यासी तेंचि साध्य ॥
नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होउनियां ॥
तुका म्हणे देव असाध्य यामुळें । आशा मोहजाळें गुंतलीया ६९३
म्हणउनी खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जियेली ॥
माझिया गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥
करूनि ओळखी दिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥
तुका म्हणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति मति देवा वांचूनियां ॥
मृत्युलोकीं आम्हां आवडती परि । नाहीं एका हरिनामेंविण ॥
विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन हें मनीं बैसलेंसे ॥
सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान । माणिकें पाषाण खडे तैसे ॥
तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचिया परी आम्हांपुढें ६९५॥
वेद अनंत बोलिला । अर्थ इतकाचि साधिला ॥
विठोबासी शरण जावें । निजनिष्ठें नाम गावें ॥
सकळ शास्त्रांचा विचार । अंतीं इतकाचि निर्धार ॥
अठरापुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत ॥ ६९६ ॥
वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥
खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥

उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥
तुका म्हणे आलें आपणाचि फळ । हातोहातीं मूळ सांपडलें ६९७॥
शास्त्राचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥
ह्मणउनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व जालें सांग नामें एका ॥
सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥
तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ६९८
सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक । देउनियां हस्तक उठविलें ॥
उठविलें मज देउनियां प्रेम । भावार्थे सप्रेम नमस्कारीं ॥
नमस्कारीं त्याला सद्गुरुरायाला । तुका ह्मणे बोला नाम वाचे ॥

सांगो जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥
त्याचा आम्हांशी कांटाळा । पाहों नावडती डोळां ॥
रिद्धिसिद्धींचे साधक । वाचा सिद्ध होती एक ॥
तुका ह्मणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ७०० ॥

हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरी ॥
तें मज विठोबासमान । नमूं आवडी ते जन ॥
त्याचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥
तुका ह्मणे भावें । जिव्हे प्रेमें वोसंडावें ॥ ७०१ ॥

उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ॥
बोलविलें बोल बोलें । धनी विठ्ठला सन्निध ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥
तुका ह्मणे नये आह्मां । पुढें कामा गबाळ ॥ ५०२ ॥

---

## स्वस्थिति.

(निळोबा)

निराश्रित वाटे मनीं । पडिलों जनीं एकला ॥
कृपेविण तुमच्या देवा । हळहळ जीवा बहु वाटे ॥

लोकनिंदा वाटे बरी । आह्मां भूषण ते श्रीहरी ॥
निळा ह्मणे वहाती करा । वाट पुढें जगदोद्धारा ॥ ७०४ ॥
हा तो तुमचा सहज गुण । करावें पाळण दासाचें ॥
नेणपणें म्यां विनविलें । पाहिजे क्षमा केलें तें ॥
धीर नाहीं माझें मनीं । केली ह्मणून विज्ञान ॥
निळा ह्मणे रमावरा । क्षमा करी अपराध ॥ ७०५ ॥
तुझीये संगतीं । आम्हीं लागलों नेणतीं ॥
परि तूं कृपावंत हरि । सांभाळिसी सर्वा परि ॥
शहाणे तूंतें चोजविती । वदासी तूं तयांप्रती ॥
निळा ह्मणे भाविकाला । म्हणवी अंकीत मी त्याला ॥ ७०६ ॥
ठेवमी चित्त पायांवरी । करीन चाकरी मनोभावें ॥
भोगवाल ते भोगीन भोग । न वंचीं अंग तिळतुल्य ॥
आज्ञा तुमची वंदीन शिरीं । धरीन अंतरीं सांगितलें ॥
निळा ह्मणे अखंड निरत । राहेन सतत सेवेचिये ॥ ७०७ ॥
तुमच्याची चरणांचा महिमा । नेणा तुह्मी पुरुषोत्तमा ॥
आह्मां दासांचें जीवन । घडे अमृताचेंचि पान ॥
वृक्ष नेणती फळाची गोडी । भोक्ताचि जाणती ते आवडी ॥
निळा ह्मणे जाणती संत । भक्त तुमचे ते भाग्यवंत ॥ ७०८ ॥
नका पाहूं माझे क्रिया आचरित । भक्त भागवंत नव्हे ज्ञानी ॥
आठवितों नाम नेणें दुजी परी । मी माझें श्रीहरी नाहीं गेलें ॥
गुंतलेंसें पाशीं मोह ममता आशा । अहो जगदाधीशा पांडुरंगा ॥
निळा ह्मणे करा यावरी कैवार । अहा करुणाकर ह्मणोनियां ७०९





मूढमती परि मी वाचें । नाम तुमचें उच्चारीं ॥
नेणें कांहीं न कळे हित । परि मी भक्त ह्मणवीतों ॥
अज्ञानचि परि मी दास । धरिली कास न सोडीं ॥
निळा ह्मणे भलत्या परि । अंगिकारीं विठोबा ॥ ७१० ॥

पावो माझी हेचि सेवा । करितों नित्यानित्य देवा ॥
तुजचि आवडीच्या सुखें । गातों वाणितों ते मुखें ॥
पढतों ज्या ज्या नामावळी । वाजवूनियां हातें टाळी ॥
निळा म्हणे ध्यानीं मनीं । जें कां चिंतितों चिंतनीं ॥७११॥

तप साधन हेंचि माझें । गाईन तुझें नाम हरी ॥
आणिकां साधनीं उबग आला । विश्वास उपजला येचिविशीं ॥
कळा कुसरी न येती मना । वांचूनि चिंतना तुमचिया ॥
निळा म्हणे वाचे बोली । पडिली चाली याची परी ॥ ७१२॥

आतां माझिया भक्तिभावा । पालटा देवा नेदावा ॥
मग मी नाचेन कीर्तनमेळीं । नामावळी आळवित ॥
ओवाळूनि सांडीन काया । वरूनि पायां जीव प्राण ॥
निळा म्हणे वाढता प्रेमा । पुरुषोत्तमा करावा ॥ ७१३ ॥

कोटी जन्म घेईन देवा । करीन सेवा तुमचीच ॥
भुक्ति मुक्ति नका आड । घालूं सांकड मज वाटे ॥
काय करूं ते आत्मस्थिति । खंडन करिती भजनाचें ॥
निळा म्हणे राहो ठायीं । विश्वास पायीं तुमचिये ॥७१४॥

नाहीं लौकिकासी काम । गाईन नाम सर्वदा ॥
हेंचि माझें भांडवल । विठ्ठल विठ्ठल खरें नाणें ॥
नेघों भुक्ति नेघों मुक्ति । प्रेम विरक्ति हरिदासीं ॥
निळा म्हणे साधन सार । तुमच्या उच्चार नामाचा ॥७१५॥

जीवाचा ही जीव तूंचि प्राणांचा प्राण ।
नयनांचेंहि नयन तूंचि घ्राणाचें घ्राण ॥

सर्वही इंद्रियभाव तूंचि माझे श्रीहरी ।
तुजविण न दिसे पाहतां मज मी माझारीं ॥
चित्ताचेंहि चित्त तूंचि मनाचें मन ।
श्रवणाचेंहि श्रवण तूंचि रसनेची रसना ॥
निळा म्हणे तूंचि माझा सर्वहि व्यापक ।
देहादेहीं शोधूनि पाहतां न दिसे आणिक ॥७१६॥
कोटी दिवाळ्या दसरे सण । घडले श्रीचरण देखिले ॥
सकळही पर्वें व्रतें जोडलीं । तुमचीं वंदिलीं पदांबुजें ॥
आलिंगनें सीतळ काया । निवाल्या बाह्या जीव प्राण ॥
निळा म्हणे अवघाचि अंगें । तुमच्या संगें सुस्नात ॥ ७१७ ॥
वोवाळूनियां सांडीन काया । वरुनी पायां तुमचीया ॥
जीवभाव ठेवुनी वरी । राहेन द्वारीं तिष्ठत ॥
जोडूनियां कृतांजुळी । नामावळी आठवीन ॥
निळा म्हणे करीन सेवा । अहोरात्रीं देवा चरणांची ७१८॥
अनुसरलों जिवें भावें । नेणों आपुलें परावें ॥
तुम्हांविण पंढरीनाथा । नाठवे कांहींच सर्वथा ॥
चित्तें मनें काया वाचा । जिहीं संकल्प हा तुमचा ॥
निळा म्हणे दिवसरातीं । नाहीं विसराची भ्रांती ॥७१९॥
बरवा ओढवला हा संग । भक्ति प्रसंग तुमचा ॥
लेणें सुखें मातली वाचा । नित्य कीर्तनाचा तट ताप ॥
गाऊं वानूं आपुल्या छंदें । तुमचीं पदें आवडी ॥
निळा ह्मणे गळती नयन । प्रेमें स्फुंदन सद्गद ॥ ७२० ॥
पायीं लीन होता निळा । दिधली कळा प्रेमाची ॥
सिववूनियां केला सुखी । ठेउनी मुखीं निज नाम ॥
साउलीची ऐशी जाती । बालका प्रीति समजावी ॥
निळा ह्मणे कृपावंत । साक्षभूत अंतरींची ॥ ७२१ ॥

कृपाघनें वृष्टी केली । माझी विनविली निजांगें ॥
ह्मणो वारंवार । त्याचे उपकार आठवितो ॥
न घेऊनी कांहीं सेवा । धांविले कुणवा आपुलिया ॥
निळा ह्मणे सुखी केलें । हातीं धरिलें वरदानें ॥ ७२२ ॥
कृपादीप प्रकाशिला । विलया नेला अंधकार ॥
जेणें उद्दंड सभाग्य केलें । निजवास भूमंडळी ॥
निळा ह्मणे उपेक्षूं नेणे । आपुलिया स्मरणें नामाच्या ७२३
विसारें गोविला । अवघा आखुनी ठेविला ॥
देउनिया अहंभावो । भक्ति सांठविला देवो ॥
नामाचें चिंतन । करुनि केला हा स्वाधीन ॥
निळा ह्मणे जिवेंसाठीं । करूनीया सामाविला पोटीं॥७२४॥

## जनांस उपदेश.

(निवृत्ति).

पितृ मातृ निंदिता द्वैत होचि खोटें । अर्चन गोमटें एको विष्णु ॥
निंदिता पितरांसि नपवे हृषीकेशी । योनीचे माळेसि गुंफसील ॥
चित्तसाठ्य करी प्रपंचाचरण । पितृ जनार्दन न पावसी ॥
निवृत्ति ह्मणे नरु द्वैताचा पामरु । अद्वैतीं सुरवाड नाहीं त्या ७२५
निःसंदेह हरि भावयुक्त करी । भजन निर्धारी सत्वशीळ ॥
रज तमं खंडी वासना हे मुंडी । चित्त हें अखंडी हरिपंथीं ॥
साधन हरिपंथु हाचि निज हेतु । गुरुमुखें मातु ऐशी असे ॥
निवृत्तीचें धन हरि आत्मा जाणे । हरि हाचि पूर्ण जनकु त्या ॥
क्षमाचा विस्तार क्षेत्रज्ञ हे श्रुति । अवघी हे क्षिती एकरूपें ॥
शांति दया पैसे क्षमा जया रूपें । अवघेंचि स्वरूप आत्मारामें ॥
निद्रा द्वेष चेष्टा या अभिमान भाजा । सांडुनियां भजा केशवासी॥
निवृत्ति निश्चळु एकरूप चित्त । अवघीच समस्त गिळियेलीं ७२७

(मुक्ताबाई).

विश्रांति मनाची निजशांति साची । मग त्या यमाची भेटी नाहीं ॥
अधिकारी मन मग सारी स्नान । रोकडेंचि साधन आलें हातां ॥
साधिलें साधन नित्य अनुष्ठान । चित्तीं नारायण मंत्र जपे ॥
मुक्ताई प्रवीण नारायण धन । नित्य मंत्रें स्नान करी वेगीं॥७२९॥

नामबळें देहीं असोनियां मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनें ॥
दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥
माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नामपाठें ॥
मुक्ताईचें धन हरिनामें उच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ७३०

करणें जंव कांहीं करूं जाये शेवट । तंव पडे आडवाट द्वैतभावें ॥
राहिलें करणें सचले पैं कर्म । हरिवीण देहधर्म चुकताहे ॥
मोक्षालागीं उपाय करितोसि नाना । तंव साधनीं परतां पडो पाहे ॥
मुक्ताई करि हरिश्रवण पाठ । तेणें मोक्षमार्ग नीट सकळ साधे ७३१

मुक्तपणें शीव बांधोनियां द्विज । नेणती ते बीज केशव हरी ॥
म्हणोनि मुक्ता सर्वही पैं मुक्त । करूनियां रत स सेविती ॥
वेदीं बोलियेलें ब्रह्मार्पणभावें । सदा मुक्त व्हावें अरे जना ॥
मुक्ताई मुक्त हरिनाम सेवित । अवघेचि मुक्त सेवितां हरी ॥७३२॥

(सोपानदेव)

शरीर निर्मळ वासना टवाळ । कां रे तूं बरळ भक्तिवीण ॥
सर्व ब्रह्म निर्मळ नेणसि सोंवळें । एकाचि गोपाळें जन वन ॥
आप पृथ्वी तेज वायो व्योम । पंचभूतीं सम वर्ततसे ॥
सोपान म्हणे गुरूचा उपदेश शुद्ध । तुरीच वासना प्रबुद्ध तया नरा॥





मन आधीं मुंडीं वासनेतें खंडीं। विठ्ठल ब्रह्मांडीं एक आत्मा ॥
मन हें सोंवळें सदा शौच करी। तुज निरंतरीं हरि पावे ॥
विवेक वैराग्य ज्ञानाचें सौभाग्य। सोंवळा आरोग्य हरि देखा ॥
सोपान नेणें सलगीचा सोंवळा। नित्य वेळोवेळां स्मरे हरी ७२४
हरि असे देहीं हाचि भावो खरा। वायां तूं सैरा धांवूं नको ॥
धांवतां अवचटें पडशील व्यसनीं। संसारघसणीं योनिमाळे ॥
हरिचेनि ध्यानें निरंतर करीं। बाह्य अभ्यंतरीं एकु रामु ॥
सोपान म्हणे राम नांदे सर्व घटीं। विश्वीं जगजेठी भरलासे ७२५
(नामदेव)
बाळपणीं हिचीं वर्षें गेलीं बारा। खेळतां दे पीरा नानामतें ॥
विटु दांडु चेंडु लगोऱ्या वाघोडे। चपे पेढखडे एकीबेकी ॥
सेलदोरे खेळी आणि सलवडी। उचलिती धोंडी अंगबळें ॥
कोंबडाकोंबडी आणि पाणबुडी। आणिक सेलडी लिंबुटिंबु ॥
नामा म्हणे ऐसें गेलें बाळपण। मग आलें जाण तारुण्य तें॥७२६॥
तुझाचि अहंकार तुजचि नाडील। मागुता मांडील संसारू हा ॥
सांडी सांडीं मोहो विषय टवाळ। वाचेसी गोपाळ उच्चारीं रे ॥
सर्व हें भूल मायेचें घरकुलें। अहंकारें नाथिलें नानापरी ॥
नामा म्हणे भजन हरीचें करीन। नित्य तें सेवीन चरणरज॥७२७॥
देवाचे हे आत्मे ते हे जाणावे संत। त्यांचे पदीं व्हावें रत सदा दृढ॥
श्रीहरीची भेटी सहजचि होय। श्रम लया जाय झाला आधीं ॥
पापाचे पर्वत भस्म नामाग्नीनें। अभक्तांसी हाण नामाविण ॥
नामदेव म्हणे नामाग्नीच्या पोटीं। नाना पाप कोटी दग्ध होती ॥
सर्वाभूतीं भज नमन करी संता। नित्य त्या अच्युता स्मरण करीं॥
ऐसें भजनीं चित्त लागलें ज्याचें। रामकृष्ण नीट वैकुंठींची ॥
न लगतीं साधनें वांयांचि श्रमसें। एका नामें होणें चतुर्भुज ॥
नामा म्हणे थोर नामेंचि सधर। वैकुंठीं बिढार तया भक्ता॥७२९॥

स्वयें घरदार प्रपंच मांडिला । जोडुनियां दिला बाळाहातीं ॥
तैसें सर्वांभूतीं असावें संसारीं । प्राचीनाची दोरी साक्ष आहे ॥
वाटसरू वस्ती येऊनि राहिला । प्रातःकाळीं गेला उठोनियां ॥
नामा ह्मणे आह्मां नाहीं प्रापंचिक । पंढरिनायक साह्य झाला७४०
औट हात घर जायाचें कोपट । दोन दिवस फुकट भोगा कांरे ॥
कवणाचें घर कवणाचें दार । भावें नरहरि ओळंगारे ॥
आडें मोडलें घर झांझर झालें । वारा आला तेणें मोडोनि गेलें ॥
खचला पाया पडली भिंती । नामा ह्मणे घर नलगे चित्तीं॥७४१॥
पापाचें संचित देहासी दंडण । तुज नारायणा बोल नाहीं ॥
सुख अथवा दुःख भोगणें देहासी । सोस वासनेसी वाउगाची ॥
पेरि कडु जीरें इच्छी अमृतफळ । अर्कवृक्षा केळीं केविं येती ॥
मुसळाचें धनु न होय सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥
नामदेव ह्मणे देवा कां रुसावें । मनाला पुसावें आपुलीया॥७४२॥

## दुर्जनांस उपदेश.

(नामदेव)

समर्थासी करीं क्रोध हे अहंता । अखंड ममता मानी सदा ॥
आपुली आपण व्यर्थ सांगे स्तुति । वडिलांची कीर्ति भोग सांगे ॥
वमन झालीया सेवितसे अन्न । काय तो दुर्जन भाग्यहीन ॥
नामा ह्मणे जाण असतां शरीरीं । जातो यमपुरीं भोगावया ७४३

मुखीं नाहीं नाम । काय जपतो श्रीराम ॥
काय आसन घालून । मुखीं नाहीं नारायण ॥
टिळे टोपी माळा दावी । भोळ्या भाविकांसी गोवी ॥
नामा ह्मणे त्याचा संग । नको चित्ता होय भंग ॥ ७४४ ॥

गोमुखीं गोवूनि काय जपतोसी । जपतप त्यासी विघ्न करी ॥
नामसंकीर्तनें जळतील पापें । चुकतील खेपा चौऱ्यांशीच्या ॥

उपवास करी उग्र अनुष्ठानीं । तया चक्रपाणी अंतरतो ॥
नामा ह्मणे ऐसे बहुतेक प्राणी । पचतील खाणी भ्रष्टलोक ॥ ७४५ ॥

( जनाबाई )

नाद पडे कानीं । मृग पैज घाली प्राणी ॥
आवडी अंतरीं । गज मेला पडे गारी ॥
चोख पाहे अंग । दिपें नाडला पतंग ॥
गोडी रसगळा । मच्छ अडकला गळा ॥
गंधें अलि नेला । ह्मणे जनी तोचि मेला ॥ ७४६ ॥

हेंचि देवाचें भजन । सदा राहे समाधान ॥
येर अवघे संसारिक । इंद्र देव ब्रह्मादिक ॥
वरकडाचा पाड किती । जनी देवास बोलती ॥ ७४७ ॥

चोरा संगतीनें गेला । वाटे जातां नागवला ॥
तैसी सांडोनियां भक्ती । धरी विषयाची संगती ॥
अग्निसवें खेळे । न जळे तो परी पोळे ॥
विश्वासला चोरा । जनी ह्मणे घाला बरा ॥ ७४८ ॥

सुखें संसार करावा । माजीं विठ्ठल आठवावा ॥
असोनियां देहीं । छाया पुरुष जैसा पाहीं ॥
जैसा सूर्य घटाकाशीं । तैसी देहीं जनी दासी ॥ ७४९ ॥

अंगीं हो पैं शांती । दया क्षमा सर्वांभूतीं ॥
जेथें जाऊन पाहे देवा । ब्रह्मादिक करिती सेवा ॥
आवडी असे पैं कीर्तनीं । लवे संताचे चरणीं ॥
जैसी दया पुत्रावरी । तैसी पाहे चराचरीं ॥
बहु अपराध केला । ह्मणे जनी तो रक्षिला ॥ ७५० ॥

## सज्जनांस उपदेश.

( तुकाराम )

आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥
देह हें देवाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥
देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥
निमित्याचा धनी केला असे प्राणी । माझें माझें ह्मणोनी व्यर्थ गेला ॥
तुका ह्मणे कां रे नाशवंतासाठीं । देवासवें आटी पाडितोसी ॥ ७५१ ॥

आतां उघडी डोळे । जरी अद्यापि न कळे ।
तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासी ॥
मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध ।
करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥
नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलिकाचे द्वारीं ।
कट धरूनियां करीं । उभाउभी पालवी ॥
तुका ह्मणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ।
होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥ ७५२ ॥

कां रे तुह्मी निर्मळ हरिगुण गाना ।
नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥
काय गणिकेच्या याती अधिकार मोठा ।
दोषी अजामेळ ऐसी नेली वैकुंठा ॥
ऐसे नेणों मागें किती अनंत अपार ।
पंच महादोषी पातका नाहीं पार ॥
पुत्राचिया लोभें नष्ट ह्मणे नारायण ।
कोण कर्तव्य तुका ह्मणे त्याचें पुण्य ॥ ७५३ ॥

कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सर्वे दोन्ही ॥

तुका ह्मणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुबेळाचें ।७६१।
आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥
तुका ह्मणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ७६२
कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥
विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥
तुका ह्मणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥७६३॥

थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥
घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥
चित्त ठेवीं ग्वाही । आणिकांशीं चाड नाहीं ॥
आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ७६४ ॥

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥
हेंचि शूरत्वाचें अंग । हरी आणिला श्रीरंग ॥
अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥
तुका ह्मणे पाणी । पाताळ तें परी खणी ॥ ७६५ ॥

चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ॥
तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥
निपेक्षिलें धन । तेथें गुंतलेंसें मन ॥
नाशिवंतासाठीं । तुका ह्मणे करिसी आटी ॥ ७६६ ॥

निवडावें खडे । तरी दळण वोजें घडे ॥
नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥





निवडावें तण । सेतीं करावें राखण ॥
तुका ह्मणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥ ७६७ ॥

जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥
येर प्रिया पुत्र धना कोणा लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥
तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ॥७६८॥

आली सिंहस्थपर्वणी । न्हाव्या भटा आली धणी ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी डोई दाढी ॥
बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥
पाप गेल्याची काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥
भक्तिभावेंविण । तुका ह्मणे अवघा सीण ॥ ७६९ ॥

नाहीं पाक होत उफराटे चाली । बोलिली ते केली व्हावी नीत ॥
नाहीं मानूं येत वांजटाचे बोल । कोरडेच फोल चवी नाहीं ॥
तरुवरा आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ ह्मणा त्यासी ॥
तुका ह्मणे किती ठकलीं बापुडीं । राव्हा आहे गोडी मांडे पुऱ्या ७७०

खरें बोलें तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥
ऐसे फुकाचे उपाय । सांडुनियां वायां जाय ॥
परउपकार । एका वचनाचा फार ॥
तुका ह्मणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ७७१ ॥

आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥
होणार तें सुखें घडो । लाभ जोडो सद्‌बुद्धि ॥
सत्य संकल्पाच साटीं । उजळा पोटीं रविबिंब ॥
तुका ह्मणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥ ७७२ ॥

भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥
धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां ह्मती ॥

हिरा हिरकणी । काढी आंतुनि अहिरणी ॥
तुका ह्मणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ७७३ ॥

केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥
देवचि हा जाणे अंतरीचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥
त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥
तुका ह्मणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ७७४

मायबापें सर्पीण जरी बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥
तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा॥७७५

सत्या माप वाढे । गबाळाची चाली खोडे ॥
उतरे जें कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ॥
घरामध्यें राजा । तऱ्हे हो वा वाटपूजा ॥
तुका ह्मणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ७७६ ॥

मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणें तें ॥
हें भरा सातें आलें । भलें भलें ह्मणवावें ।
जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥
तुका ह्मणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ७७७ ॥

पाठेळ करितां न साहावे वारा । साहिलिया ढोरा गोणी चाले ॥
आपणां आपण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥
नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥
तुका ह्मणे जरी जग टाकी घाया । त्याच्या पडे पायां जन मग ७७८

एका बीजा केला नास । मग भोगलें कणीस ॥
कळे सकळां हा भाव । लहानथोरांवरी जीव ॥
लाभ फुकासाठीं । केल्याविण जीवासाठीं ॥
तुका ह्मणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ ७७९ ॥

विषयांचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥
न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळबीज व्हावें ॥
शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥
तुका ह्मणे अभिमाना । नारायणा न सोसे ॥ ७८० ॥

नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥
काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचें ॥
कांपवूनि हिरी शूरत्वाची मात । केलें घाताघात उचित काळें ॥
तुका ह्मणे करी जिव्हेसी विटाळ । लटिकयाची मळ स्तुति होतां ७८१
आह्मां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥
कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥
अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे ह्मण ॥
तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ७८२
सेवितों रस तो वांटितों आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥
विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥
मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥
तुका ह्मणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ७८३ ॥

परद्रव्य परनारी । अभिलाषूनि नाक धरी ॥
जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥
सोवळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥
तुका ह्मणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ७८४ ॥

टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें पोटासाठीं ॥
तुळशी खोवी कातीं दर्भ खोंवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची
कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे गळताती ॥
तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ७८५

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥
ऐसियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥

पोटासाठीं संत । जाले कलींत बहुत ॥
विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ७८६ ॥
ऐसे कैसे जाले भोंदू । कर्म करोनि ह्मणती साधू ॥
अंगा लावूनियां राख । डोळे झाकुनी करिती पाप ॥
दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥
तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥ ७८७ ॥
अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥
नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाषांडिया ॥
जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसी ॥
तुका ह्मणे अंतीं भाव केला वळी । न कळतां खळीं दूषिला देव ७८८
जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण तेचि मुक्ति पाषांड्याची ॥
पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केलें वेद ॥
मना आला तैसा करिती विचार । ह्मणती संसार नाहीं पुन्हा ॥
तुका ह्मणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ७८९
कोढियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥
त्यासी अंतरीं रिझे कोण । जवळी जातां चिळसवाण ॥
प्रेत देहा गौरविलें । तैसें विटंबवाणें जालें ॥
तुका ह्मणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धि चेष्टा ॥ ७९० ॥
तातडीची धांव अंगा आणि भाव । खोळंबा तो वाव निश्चयाचा ॥
ह्मणवूनि बरी विचाराची चाली । उगीचि ते बोली कामा येते ॥
कोरडें वैराग्य माजिला बडिवार । उतरे तो शूर अंगीचें तें ॥
तुका ह्मणे बरी झऱ्याची ते चाली । सांचवण्या खोली कैसी यांची ७९१
लटिक्याचें आंवतणें जेविलिया साच । काय त्या विश्वास तोचि खरा ॥
कोल्हांटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥
जळमंडपाचे घोडे राउत नाचती । ते काय लगती युद्धालागीं ॥
तुका म्हणे तैसें मतवादीयांचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांचि ॥

भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥
वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेषा सहज स्थिती ॥
कोरोनियां भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥
तुका ह्मणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगें चि ॥ ७९३ ॥
जपाचें निमित्त झोंपेचा पसरु । देहाचा विसरू पाडूनियां ॥
ऐसें तें भजन अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याची ॥
सेवेसी विकिले लोभाचीया आसे । तया कोठें असे दरला देव ॥
तुका ह्मणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आह्मी ॥ ७९४ ॥
भोळें वातडें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥
तैसा भक्तिवाद काय । रणबेगडीचा न्याय ॥
वेठी धरिल्या दावी भाव । मार्गें पळायाचा पाव ॥
काजव्याच्या ज्योती । तुका ह्मणे नलगे वाती ॥ ७९५ ॥
काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥
अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥
काय उंदीर नाहीं धांवीं । राख लावी गाढव ॥
तुका ह्मणे सुसर जळीं । कावळी कां न न्हाती ॥ ७९६ ॥
भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥
ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ॥
समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥
जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें ॥
हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ॥
तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ७९७ ॥
आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥
करी इंद्रियांची सेवा । पाहे भावकीचा हेवा ॥

देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥
तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघवें हे चार शिंदळीचे ॥ ७९९ ॥
झालासी पंडित पुराण सांगसी । परी तूं नेणसी मी हें कोण ॥
गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणे नेणशी बापा ॥
तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरिनाथ विसंबेना ॥८००॥

वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥
राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥
आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनि ॥
पोटा एकासाठीं । तुका ह्मणे जाले कष्टी ॥ ८०१ ॥

देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥
दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील साटा आपुलाला ॥
दाखविले परी नाहीं वाजिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥
तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळ बीजमात्र ॥ ८०२ ॥

जाऊनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥
अंतरींचे शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां केलें आपणया ॥
वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥
तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुह्मी ॥८०३॥

सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥
सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥
शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥
तुका ह्मणे कळे । परि होताती आंधळे ॥ ८०४ ॥





असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी ॥
अंतरींचा रंग उमटे बाहेरी । बोलखियापरी आपेंआप ॥
संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥
तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित आचरावें ॥८०५॥
मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें तें येऊं लागलें अनुभवा ॥
आचारभ्रष्ट होती लोक कळी । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥
वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥
वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥
तुका म्हणे किती करावे फजित । तोचि छंद नित्य बहु होती ॥८०६॥
अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळाचें ॥
अंत्यजा खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ॥
उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कूळ उभयतां ॥
तुका म्हणे ऐसी कलयुगाची चाली । स्वार्थे बुडविलीं आचरणें ॥८०७॥
कलयुगामाजी थोर जालें बंड । नष्ट लोक लंड जाले फार ॥
न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चाले ॥
सज्जनाचा वारा टेकों नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥
विश्वास तयाचा बैसेना कोठेंही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥
तुका म्हणे कैसें केलें नारायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥८०८॥

उपदेश तो भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥
तये जाऊं पात्रावरी । कवडी सारी नारळें ॥
स्त्रीपुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ॥
तुका म्हणे रत्नसार । परि आधार चिंधीचा ॥ ८०९ ॥

उपकारासाठीं बोलों हे उपाय । येणेंविण काय चाड आम्हां ॥
बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणउनि ॥
तुका म्हणे माझे देखतील डोळे । भोग देते वेळे येईल कळों ८१०

धर्मकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥
श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥
देतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक॥८११
पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं आवडे गाणें त्याला
ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटीतसे ॥
वीतभरि लंगोटी नेदी अतीताला।खिरम्या देतो शाला भोरप्यासी॥
तुका म्हणे त्याच्या थुका तोंडावरि । जातो यमपुरीं भोगावया ॥

वाईल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥
थोर येच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥
विषयांचे चरवणी । केली आयुष्याची गाळणी ॥
तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ८१२ ॥

कन्या गो करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥
गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशी कारण नाहीं देवा ॥
जे जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केले कर्मी ॥
आशाबद्ध करूं नये तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥ ८१४ ॥

दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥
तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता । मग पंढरिनाथा भजसी केव्हां
तुका म्हणे ऐसे अहित उदंड । तया केशवा प्रचंड केवीं भेटे ॥ ८१५ ॥

जन्मा येऊनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥
कां रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फजितखोरा ॥
केली गांठोळीची नासी । पुढें भीकची मागसी ॥
तुका ह्मणे ठाया । जाईं आपल्या आलिया ॥ ८१६ ॥

धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥
जीव भ्रमले ये कामें । कैसीं कळों येती वर्मे ॥
विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥
तुका ह्मणे लांसी । माया नाचविते कैसी ॥ ८१७ ॥

वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ॥
जळो याची विटंबना । भूक जना नाचवी ॥
अभिमाना सिरीं भार । झाले खर तृष्णेचे ॥
तुका ह्मणे नरका जावें । ह्याचिं जीवें व्यापार ॥ ८१८ ॥
ज्यासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं ॥
अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं वृथा ॥
मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं बिघडी जीवप्राणा ॥
तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । त्यासी गोविंद अंतरला ॥ ८१९ ॥
आपुल्या पोटासाठीं । करी लोकांचिया गोष्टी ॥
जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि हरी ॥
पोटा घाली अन्न । न ह्मणे पतितपावन ॥
मी कोठील आणि कोण । हें न कळे त्या लागून ॥
तुका ह्मणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ८२० ॥
लोहो परीसासी रुसलें । सोनेंपणासी मुकलें ॥
येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥
गंगा आली आळशावरी । आळसी देखोनि पळे दुरी ॥
गांवा खालील ओहळ । रागें गंगेसी न मिळे ॥
तुका केशवाचा दास । गुरुसी न भजे शिष्य ॥ ८२१ ॥
भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥
काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥
तुका म्हणे वज्र भेदे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ८२२ ॥
शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥
तैसी अभक्तांसी आवडे पाखांड । न लगे त्यां गोड परमार्थ ॥
श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरी ॥
तुका म्हणे सर्पा पाजिलीया क्षीर । वमितां विखार विष जालें ८२३

अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥
एकाचिये तोंडीं पडियेली माती । अवघे ते खाती पोटभरी ॥
चारितां तें बळें येत असे दांतीं । मारोनियां घेती भाग्यवंत ॥
तुका म्हणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥८२४॥
आंधळ्यासि जन अवघेचि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥
रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ८२५
नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चिंती हाचि धंदा ॥
देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ जागतसे ॥
रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥
तुका म्हणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ८२६
साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासी सेवटीं कडबारे ॥
माळाचे पैं पेटे वाहातातीं उंटें । तयालागीं कांटे भक्षावया ॥
वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमाहातीं ॥
ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वांयां
तुका म्हणे शाहणा होईं रे गव्हारा । चौऱ्यांसीचा फेरा फिरों नको
जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ॥
संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनाचे ओढी वरी हांव ॥
बांधलें गांठीं तें लागलें भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥
तुका म्हणे जया गांवां जाणें जया । पुसोनियां तया वाट चाले ८२८
विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥
अंगीं भरला ताठा कोणाचें मानीना । साधूची छळणा स्वयें करी ॥
साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥
संतांची जो निंदा करितो या मुखें । खतेला सकळ पापें तोचि एक॥
तुका म्हणे ऐसे मात्रेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ८२९

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालगीं ॥
मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥
वेदपरायण बधिरा सांगें ज्ञान । तयाची ते खूण काय जाणें ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणें । भक्तिचें महिमान साधु जाणें ॥
पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंतावरी बोल ॥
भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥
नाठवी तो खळ आपुली करणी । देवाशी निंदोनि बोलतसे ॥
तुका म्हणे त्याच्या तोंडा लागो कांटी । नाही जगजेठी जया चित्तीं ॥
अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय । व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥
कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण । अस्वणाची आण तया काई ॥
केळी आणि बोरी वसती शेजारी । संवाद कोणे परी घडे तेथें ॥
तुका म्हणे खीर केली काऱ्हेळ्याची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ८१२
साकडा दिसती कंवटी नारळा । भोक्ता तो निराळा वरील सारी ॥
एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥
सुनियांसी क्षीर चारिल्या ओकवी । भोक्ता तो सेवी धणीवरी ॥
तुका म्हणे भार वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥८१३॥
लिंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपुलीं तीं फळें न संडीच ॥
तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करूनि सांडी ॥
परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥
तुका म्हणे वेळू चंदनासंगतीं । काय ते नसती जवळिकें ॥८१४॥
काय धुंवावला सोडियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥
तैसी अधमाची जातीच अधम । उपदेश श्रम करावा तो ॥
न कळे विंचासी कुरवाळिलें अंग । आपुले ते रंग दावीतसे ॥
तुका म्हणे नये पाकासी वराड । शूकरासी गोड जैसी विष्ठा ॥८१५॥
कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥
गाढवाचे अंगीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥

बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥
तुका म्हणे तैसे अभाविक जन । त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ८३६ ॥

दर्पणासी नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥
ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥
अंधळ्यासी काय हिरा । गारांचि तो सारीखा ॥
तुका ह्मणे मुंके सुणें । ठाया नेणें ठाव तो ॥ ८३७ ॥

काळाच्या उत्तरीं वाढविती कळ्हे । हा तो अमंगळ जातिगुण ॥
चमाचे शरीरीं विटाळाचि वसे । विचाराचा नसे लेश तोही ॥
कवतुकें घ्यावें लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥
तुका ह्मणे काय उपदेश खळा । न्हाउनि कावळा क्षतें धुंडी ॥ ८३८ ॥

दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥
लात हाणोनियां वारी । गुंडा वाट शुद्ध करी ॥
बाहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥
तुका ह्मणे नखें । काढूनि टाकिजेती सुखें ॥ ८३९ ॥

धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥
कठिण हृदय तया चांडाळाचें । जो नेणें पराचें दुःख कांहीं ॥
आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । नकरी विवेक पशु जैसा ॥
तुका ह्मणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसें ॥ ८४० ॥

रासभ धुतला महातीर्थामाजीं । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥
तैसा खळा काय केला उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥
सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥
तुका ह्मणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवेंचि वमन जेवी तया ॥ ८४१ ॥

गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी केली तेणें ॥
सहज गुण जयाचिये देहीं । पालट ते कांहीं नव्हे तया ॥
माकडाचे गळां मोलाचा तो मणि । घातला चावुनि टाकी थुंकोनी ॥
तुका ह्मणे खळा नावडे हित । अविद्या वाढवी आपुलें मतें ॥ ८४२ ॥

भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण त्यांचे नये शिकों ॥
भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥
होइल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥
तुका ह्मणे त्यांचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ८४३ ॥

अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥
वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळयाती ॥
ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नोहे माझी वाणी पदरींची ॥
तुका म्हणे अंगीं लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ८४४ ॥

धुंवावला केलें साकरेचें आळें । न संडे वेगळें कडुपण ॥
कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्टेविण ॥
क्षेम देतां अंगा गांधेलाची पोळी । करवी नादाळी महाशब्द ॥
तुका म्हणे ऐसे न होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ॥ ८४५ ॥

घरीं रांडा पोरें मरती उपवासी । सांगे लोकांपासी थोरपण ॥
नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय तुकाघूनि ॥
तुका म्हणे आम्ही आणों त्या प्रमाण । ठकावें हें जन तैसें नव्हों ॥ ८४६ ॥

कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥
नवल हे लीळा करि त्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥
लोभालोभ एका धनाचिया ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥
तुका म्हणे मूक न विचारी प्रकार । योजे तें तें सार यथाकाळीं ॥

सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ॥
त्याचें वर्तन न व्हावें । शव असतां तो जिवे ॥
कुशळाची वाणी । असंपाळाविली वाणी ॥
नेणे शब्द पर । तुका ह्मणे परउपकार ॥ ८४८ ॥

काय केलें जळचरीं । किस त्यांच्या घातावरी ॥
हा तों ठायींचा विचार । आहे यातिसेवाकार ॥

श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥
तुका ह्मणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ८४९ ॥
गोमटया बीजाचीं फळेंही गोमटीं । वाहे तेचि पोटीं समतुक ॥
जातीक्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥
खऱ्याचे पारखी येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा टाळे दुरी ॥
तुका म्हणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ८५०
नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥
मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न सहावे भार जाय जीवें ॥
तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणीं तीर मोकलावा ॥ ८५१ ॥
मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥
तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥
मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥
तुका म्हणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ८५२ ॥
सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥
येथें अलंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥
अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळ घडी आल्याविण ८५३
जाणे अंतरींचा भाव । तोचि करितो उपाव ॥
नलगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें ॥
अविनाश ध्यावें । फळ धीर धरोनि ॥
बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥
तुका म्हणे तरी । एकीं लंघिले गिरी ॥ ८५४ ॥
देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें बारासार करीतसे ॥
भाग्य द्यावें तरी अंगें भरे ताठा । म्हणोनि करंटा करोनि ठेवी ॥
स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी
तुका म्हणे मज प्रचित आली देखा । आणीक या लोकां काय सांगों

वर्तावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥
विश्वासिया घडे लाभ । देइल तरी पद्मनाभ ॥
भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥
तुका म्हणे भोळा देव । परी हा नागवी संदेह ॥ ८५६ ॥
मधुरां उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भाव असो ॥
प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥
जननिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥
तुका म्हणे चित्तीं भाव निष्ठावंत । दया क्षमा शांत सर्वांभूतीं ८५७
चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥
असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां करी ॥
अनाथाचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥
तुका म्हणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ८५८ ॥
भाविकां हें वर्म सांपडलें । सेविती कवतुकें धणीवरि ॥
इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं पदें सकुमारें ॥
विसरले मुक्ती भक्ति अभिलाषें । ओढत सरिसें सुख आलें ॥
तुका म्हणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ८५९ ॥
एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥
होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥
एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥
आला नांवारूपा । तुका म्हणे जाला सोपा ॥ ८६० ॥
कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥
त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥
भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥
तुका म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ८६१ ॥
भक्त देवाघरींचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥
येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥

देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥
तुका म्हणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ८६२ ॥
सांठविला हरी । जीहीं हृदयमंदिरीं ॥
त्यांची सरली येरझार । झाला सफळ व्यापार ॥
हरी आला हातां । मग कैंची भयचिंता ॥
तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ८६३ ॥
ऐका महिमा आवडीचीं । बोरें खाय भिलटीचीं ॥
थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥
अष्टमा सिद्धीला । न मनी क्षीरसागराला ॥
पोहे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेचे ॥
न म्हणे उच्छिष्ट थोडें । तुका म्हणे भक्तीपुढें ॥ ८६४ ॥
विश्वाचा जनिता । म्हणे यशोदेसि माता ॥
ऐसा भक्तांचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥
निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥
तुका म्हणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥ ८६५ ॥
आपुलियां बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥
साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलाविलें ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । चालवी पांगुळा पायांविणें ८६६
देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढें दोरें एका एक ॥
आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावले ॥
आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥
तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जातीं । शोभाचि पुढती विशेषता॥८६७॥
त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥

पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥
तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षिना दयासिंधु माझा॥८६८॥

राजा करी तैसे दाम । तेही चाम चालवी ॥
कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥
वाइलें तें सुने खांदीं । चाले पदीं बैसविलें ॥
तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥ ८६९ ॥

संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाये विठोबाचे ॥
येणें होय सर्व संसार सुखाचा । नलगे दुःखाचा लेश कांहीं ॥
येतील तयांसी सोपें आहे सुख । बोलियलें मुखें नारायण ॥
सांगितली सोय करुणासागरें । तुह्मां कां हो बरें न वाटे तें ॥
तुका ह्मणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकांला तारावया ८७०

सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥
धरीं धरीं आठवण । मानीं संतांचें वचन ॥
नेलें रात्रीनें तें अर्धें । बाळपण जराव्याधें ॥
तुका ह्मणे पुढा । घाणा जुंतीजसी मूढा ॥ ८७१ ॥

वैभव तें राज्य संपत्ती टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥
आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥
वर्ण कुळ जाति याचा अभिमान । त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥
तुका ह्मणे राहे एकाकी निःशंक । देउनियां हांक कंठीं काळ ८७२

उपजला प्राणी न राहे संसारीं । बैसला सेजारीं काळ उशां ॥
पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका । तैसा काळ लोकां नेत असे ॥
खाटिकाचे घरीं आजापुत्र पाहे । कसायाची पाय वाटे कैसी ॥
तुका ह्मणे कांहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हा नये ८७३

पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥
कारण तें हेंचि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥

प्रारब्धीं ह्वा । जोडी देवाची सेवा ॥
तुका ह्मणे बळ । बुद्धी वेचूनि सकळ ॥ ८७४ ॥
नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥
नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥
देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेंशी प्रीति भावबळें ॥
तुका म्हणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ८७५
विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनि जो दुरी सोंवळा तो ॥
गद्य पद्य कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीनाचि बुद्धि करूनी ठेवा ॥
विचारावें कांहीं करावें स्वहित । पापपुण्यातील भांडवल ॥
तुका म्हणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखेंचि ८७६
शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ॥
ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥
खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥
तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपेआप ॥ ८७७ ॥
आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूं नये ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥
भयाचिये पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भलें ॥
तुका ह्मणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ८७८
सरिता जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥
नाहिं तरी काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं ॥
झाल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥
तुका ह्मणे भले । ज्याच्या नांवें मानावलें ॥ ८७९ ॥
निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥
तरीच अंगीकार करील नारायण । बडबडतो सीण येणेंविण ॥
सोइरें पिशुन समानाचि घडे । चित्त पर ओढे उपकारी ॥
तुका ह्मणे चित्त जालिया निर्मळ । तरीच सकळ केलें होय ॥ ८८० ॥

थोर ती गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥
व्यर्थ भराभर केलें पाठांतर । जोंवरि अंतर शुद्ध नाहीं ॥
थोडें काय थोडें वागवितीं ओझें । भावेंविण वांझें पाठांतर ॥
तुका ह्मणे धरा निष्ठावंत भाव । जरी पंढरीराव पाहिजे तो ॥८८१॥
होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥
हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई ही धरावी विठोबाची ॥
आपुलें आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरि जीवा घातक हें ॥
तुका ह्मणे जाले जे मना आधीन । तयासी बंधन यम करी ॥८८२॥
देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सुखसीण क्षणभंगुर ॥
अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥
क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥
तुका ह्मणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥८८३॥
मार्गी चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥
सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥
पीतांबर छाया करी लोभावर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥
तुका ह्मणे हेंचि करावें जीवन । वारे नारायण तान भूक ॥८८४॥
भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥
ऐसी हे कृपाळू अनाथांची वेशी । सुखाचीच राशी पांडुरंग ॥
सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उतावीळा ॥
तुका म्हणे येथें आतां उरला कैंचा । अनंता जन्मींचा शीण भाग ॥८८५॥

मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥
पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥
शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥
तुका म्हणे विठोबासी । ठाव देई चरणांपासीं ॥ ८८६ ॥

पर उपकारें कायावाचामन । वेचे सुदर्शन रक्षी तया ॥
पाळणाशीं असे योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥

परपीडे ज्याची जिव्हा मुंडताळे । यमदूत डोळे करिती पूजा ॥
तुका ह्मणे अंबऋषी दुर्योधना । काय जालें सेणां दुर्वासया ॥८८७॥

भाग्यवंत ह्मणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥
तरले तरले हा भरंवसा । नामधारकांचा ठसा ॥
भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळेभाविका निर्मळ ॥
गाइलें पुराणीं । तुका ह्मणे देववाणी ॥ ८८८ ॥

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा॥
आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं टळो नये ॥
समय सांभाळूनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥
तुका ह्मणे तरी म्हणवावें सेवक । खादलें तें अन्न एक होय॥८८९॥

नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंती नारायण सर्व भोगीं ।
मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न सुखाचिया ॥
नको गुंतों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरें अंगीं देवाचीया॥
तुका ह्मणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ८९०

चिंतनासी नलगे वेळ । सर्व काळ करावें ॥
सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥
पढिये सर्वोत्तम भाव । येर वाव पसारा ॥
ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥ ८९१ ॥

परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥
काय बोलोनियां तोंडें । मनामाजीं कानकोंडें ॥
धर्मधारिष्ट गोष्टी सांगे । उष्टया हातें नुडवी कागे ॥
जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥
बोले तैसा चाले । तुका म्हणे तो अमोले ॥ ८९२ ॥

असत्य वचन होतां सर्व जोडी । जरी लक्षघडी परउपकार ॥
जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों ते ॥

वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥
तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरींचें कुडें देईल दुःख ८९३
ब्रह्मचारी धर्म घोकावें अक्षर । आश्रमीं विचार षट्कर्म ॥
वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥
परमहंस तरी जाणें सहज वर्म । तेथें याती धर्म कुळ नाहीं ॥
बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥
तुका म्हणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सीण दुःख पावे ८९४

देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥
ऐसा असोनि अनुभव । कासावीस होती जीव ॥
देवाची जतन । त्यासी बाधूं न शके अग्न ॥
तुका म्हणे हरी । प्रल्हादासि यत्न करी ॥ ८९५ ॥

परिमळ म्हूण चोळूं नये फूल । खाऊं नये मूळ आवडतें ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥
कर्मफळ म्हणुनी इच्छूं नये काम । तुका म्हणे वर्म दावूं लोकां ८९६

भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥
करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥
बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥
तुका म्हणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ८९७ ॥

दुधांचिया अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्हीं मागों नये ॥
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहींशीं समान पाहों नये ॥
पृथ्वीच्या पोटीं हिरा गारगोटी । दोहींसी संगती करूं नये ॥
तुका म्हणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥८९८॥

जीव जीती जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥
जया चित्तीं जैसा भाव । तया जवळि तैसा देव ॥
सकळां पडिये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥
तुका म्हणे माता । वाहे बाळकाची चिंता ॥ ८९९ ॥

ब्राह्मण तों याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसी ॥
रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥
शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥
तुका ह्मणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडूनियां मग ब्रह्मचि तो ॥९००॥

आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥
हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबाघरीं पाणी ॥
पांडवांचा साहकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥
तुका ह्मणे उगेचि रहा । होईल तें सहज पाहा ॥ ९०१ ॥

एकएका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥
कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेवितां ॥
अवघे धन्य होऊं आतां । स्मरवितां स्मरण ॥
तुका ह्मणे अवघी जोडी । ते आवडी चरणांची ॥ ९०२ ॥

अधिकार तैसा दावियेला मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥
आळू नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥
तुका ह्मणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार॥९०३॥

अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥
ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ।
कंस कांवा एक आळां । स्वाद पाहतां निराळा ।
तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ९०४ ॥

दिली चाले याचा । क्षय मागिल्या तपाचा ॥
रिद्धि सिद्धि येती घरा । त्यांचा करिती पसारा ॥
मान दंभांसाठीं । पडे देवासवें तुटी ॥
तुका म्हणे मेवा । कैचा वेठीच्या निर्दैवा ॥ ९०५ ॥

बाकुट्याचे सुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शाहाणियां ॥
ऐसे जाणा णों पडिलें अंतर । वाढे तों तों थोर अंतराय ॥

दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥
तुका म्हणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बाळें रडतें स्तनीं १०६
साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकांतें डोळां न पाहवे ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे १०७

हित जाणें चित्त । कळों येतसे उचित ॥
परिहार ते संपादनी । सत्य कारण कारणीं ॥
वरदळ तें तुतरे कसीं । आगीमध्यें तें रसीं ॥
तुका म्हणे करुनी खरें । ठेवितां तें पुढें बरें ॥ १०८ ॥

मारूं नये सर्प संतांचिया दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥
एक सूत्र जीवाशिवीं अशक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥
नाहीं साहों येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य जालें ॥
तुका ह्मणे दिला नीतीचा संकेत । पूजा नांवें चित्त सुखी तेणें ॥१०९॥

क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ॥
धर्म आहे वर्मी अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥
द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म सोधण्या ॥
तुका ह्मणे पुण्य गांठीं । तरिच उचितासी भेटी ॥ ११० ॥

जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी ॥
कृपणाचीं मजुरें नेणती विसावा । वाढे हांव हावा कामकासी ॥
वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जालीं ॥
तुका म्हणे आहे मरणाचें भय । रक्षण उपाय करूनि असे ॥१११॥

मागें पडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥
ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥
देव अंतरे तें पाप । खोटे उगाचा संकल्प ॥
तुका म्हणे बीज खोटीं । लाभ विचाराचा पोटीं ॥ ११२ ॥

न पालटे जाती जीवाचिये साटीं । बाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥
अंतरीं सबाह्यीं सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥
घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडू नेणे धीरा आपुलिया ॥
तुका म्हणे कढें करावी शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥९१३॥

कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥
शूर भिरवे रणांगणीं । मरणींच संतोष ॥
पाहिजे तों कळवळा । मग बळा काय उणें ॥
तुका म्हणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥ ९१४ ॥

जें जें व्हावें संकल्पें । तेंचि पुण्य होय पापें ॥
कारण तें मनापासीं । मेळविल्या मिळे रसीं ॥
सांडी मांडी हाली चाली । राहे तरि भली बोली ॥
तुका म्हणे सार । नांव जीवनाचें सागर ॥ ९१५ ॥

आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदुःख दोष अंगीं लागे ॥
ऐसें मनीं वाहूं न येती संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥
किल्मिषाची चित्तीं राहतां कांचणी । अमृत टाकोनी ठाव जाळी ॥
तुका म्हणे कोपें घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धीचें ॥९१६॥

नये इच्छूं सेवा स्वइच्छा जनाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥
देहाचा निग्रही त्याचें तो सांभाळी । मग नये कळि अंगावरी ॥
आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी पेणें क्षोभें ॥
तुका म्हणे सोडा देखीचे विभाग । मोडसीचे दुःख गोड फार्डी९१७

जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥
वर्ते तैसें वर्ते जन । बहुतां गुण एकाचा ॥
आपणीयां पाक करीं । तो इतरीं सेविजे ॥
तुका म्हणे शूर राखे । गांड्या वाखे सांगातें ॥ ९१८ ॥

राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥
कोणी कोणा येथें न मनीं जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥

भूंगारिलें नाहीं तगों येत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें ॥
तुका म्हणे घरीं वसे नारायण । कृपेचि ते खूण साम्या येते॥९१९॥
दधिमाजीं लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणें मथन ॥
अग्नि काष्ठामाजीं ऐसें जाणें जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥
तुका म्हणे मुख मळीण दर्पणीं । उजळिल्यावांचूनि कैसें भासे ९२०

ओले मातीचा भरवसा । कां रे धरिशी मानसा ॥
डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरक्या झाले ॥
नाक सरळ चांगलें । येउन हनवटी लागलें ॥
तुका म्हणे आलें नाहीं । तंव हरिला भज रे कांहीं ॥९२१॥

बरे जालीयाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं ॥
नोहे मातापिता नोहे कांतासुत । इतरांची मात काय सांगों ॥
तुका म्हणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥९२२॥
यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आम्हां दिनानाथें रक्षियेलें ॥
यम नेतां तुम्हां रक्षील हें कोण । तुम्हां धन्यधन्य कोण ह्मणती ॥
संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥
दोषि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासी पांपरी हाणे आतां९२३

भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥
उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ॥
येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥
तुका ह्मणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ९२४ ॥

धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥
लावीन निशाण जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥
नामाचिया नौका करीन सहस्रवरि । तारावा श्रीहरि पांडुरंग ॥
भाविक हो येथें धरा रे आवांका । ह्मणे दास तुका शुद्ध याति९२५
[illegible] हा पान्हा कोणासी सापेक्ष । हिंवे तीचि तापे जाऊनियां ॥
[illegible] काय या ही मज प्यावें । तृषित ती धांवे सेवावया ॥

निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळाली ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरा गाबाळाचें नाहीं काम ९२७
आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ । त्याचें यातिकुळ काय कीजे ॥
उकरड्यावरी वाढली तुळशी । टाकावी ते कैसी ठायागुणें ॥
गाईचा तो भक्ष अमंगळ खाय । तिचें दूध काय सेवूं नये ॥
तुका म्हणे काय सलपटासी काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें॥

शिजल्यावरी जाळ । वांयां जायाचें तें मूळ ॥
ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं नाहीं काम ॥
सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥
तुका म्हणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥ ९२९ ॥

उभा पैलथडी । तेणें घालूं नये उडी ॥
पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥
दिसतें आहारीं । नये आऊं ऐशावरी ॥
आळसाची धाडी । तुका म्हणे बहु नाडी ॥ ९३० ॥

काय करूं सांगतांही न कळे वर्म । उपस्थित श्रम उपजविती ॥
मन आधीं ज्याचें आलें होईल हातां । तयावरी सत्ता केली चाळे॥
अमुकेचे अंगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥
तुका म्हणे आप राखावें आपणा । संकोचोंचि कोणा नये आतां ९३१
मायबाप सर्वे नये धनवित्त । करावें संचित भोगावें तें ॥
म्हणऊनि लाभ काय तो विचारीं । नको चाळीवरी चित्त ठेवूं ॥
आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥
तुका म्हणे काळें लावियेलें माप । जमा धरी पापपुण्याची हे ९३२

हित नाहीं ठावें जननीजनकां । दाविला लौकिकाचार तिहीं ॥
अंधळ्याचे काठी लागले अंधळें । घात एका वेळे पुढेंमागें ॥
न धरावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥
तुका म्हणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ९२३
खरे आम्हांपाशीं एक शुद्धभाव । नाहीं तरी वाव उपचार ॥
कोण मानी वरी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तो ॥
तुका म्हणे आम्हां जाणिवेचें दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें९२४
देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा । लाजे तक्का थारा देऊं कोणी ॥
मोडिलें या रांडे सुपंथ मारग । चालविले जग यमपंथें ॥
परिचारीं केली आपुलीच रूढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥
तुका म्हणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥९२५॥
कोरडिया ऐशा सारुनिया गोष्टी । करा उठा उठीं हित आधीं ॥
मोकळा राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥
लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥
तुका म्हणे डांख लागे अळंकारें । मग नव्हे खरें पुटाविण ॥९२६॥
उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आइकिली ॥
आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें आपणासियां ॥
माझ्या दोषासाठीं होईल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥
तुका म्हणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज॥९२७॥

कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥
कोणी व्हावे अधिकारी । त्यासी हरि देईल ॥
वैराग्याचें बळ । साही खळ जिणावे ॥
उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ९२८ ॥
ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥
बरीच जोडिलें ते भोगी । कांहीं आपण नलगे ॥

उगीचि फुगवूं नका गाल । पूर्ण सांठवावा माल ॥
सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम विकरा ॥
तुका जाला वाणी । चुकवुनि चौऱ्यासीच्या खाणी ॥१४०॥

आम्हांपाशीं सरें एक शुद्ध भाव । चतुराई जाणीव नलगे कळा ॥
सर्वजाण माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळांसी ॥
तुका म्हणे कर्म धर्म नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥१४१॥

अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥
मुंगीवरी भार गजाचें पालाण । घालितां तें कोण कार्यसिद्धि ॥
तुका म्हणे फांसे वागुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं तो काढी पारधी तो ॥१४२॥

पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥
पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥
जप तप अनुष्ठान । पोटासाठीं झाले दीन ॥
पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥
पोट कासियानें भरे । तुका म्हणे झुरझुरूं मरे ॥ १४३ ॥

केलें पाप जेणें दिलें अनुमोदन । दोघांसी पतन सारिखेंचि ॥
विष नवनीता विष करी संगें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥
देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावें लिमिरया थेंक म्हूण ॥
तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मनितां ॥१४४॥

आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥
आहे तें अधीन आपुलें हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥
जाणतिया पाठीं लागला उपाध । नेणता तो सावध भोजनासी ॥
तुका म्हणे भय बांधलेंसे गांठीं । चोर लागे पाठी दुम तया ॥१४५॥

वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥
एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥
विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥
काळिमेनें ज्योती । दिवस कळों आला रातीं ॥
उंच निच गारा । हिरा परिस मोहरा ॥
तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ९४६ ॥
जग अमंगळ । लागे देखता विटाळ ॥
धर्म भूतांची ते दया । संत कारण ऐसीया ॥
नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥
तुका म्हणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥ ९४७ ॥
ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढा नारायण स्मरवितो ॥
भवव्याधि येणें तुटेल रोकडा । करूनियां झाडा निश्चयेंसी ॥
आणिकां उपायां अनुपान कठिण । भाग्यें वरें सीण शीघ्रवत् ॥
तुका म्हणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ९४८
अतित्याई देतां जीव । नये कींव देवासी ॥
थोड्यासाठीं राग आला । जीव दिला रागील ॥
त्यासि परलोकीं नाहीं मुक्ति । अधोगति चुकेना ॥
तुका म्हणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारसी ॥ ९४९ ॥
पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥
ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥
तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥
तुका म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ९५० ॥
मुरळामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥
आणिकांची कां लाज नाहीं । आळस जिहीं जिवीं ॥
एके पांते सारिखीं पिसें । हानि हित वेगळासी ॥
तुका म्हणे हित घया । नव्हे पुया गांवढाळ ॥ ९५१ ॥

देखण्याच्या तीन जाती । वेठी वाती अत्यंती ॥
जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥
पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदांवर तेवी ॥
तुका म्हणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ९५२ ॥
नारायण ऐसा । सेवूं सेणतील रसा ॥
जेणें भवव्याध तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥
नलगे कांहीं आटी । बाधा राहों न सके पोटीं ॥
कैवल्य तें जोडे । पालट लवकरी घडे ॥
जन्ममरण दुःख अटे । जाळें अवघेंचि तुटे ॥
तुका म्हणे जाला । याचा गुण बहुतांला ॥ ९५३ ॥
वाखर घेऊनि आलें । त्यासी तरवारेनें हाळें ॥
नव्हे आपुलें उचित । करूनि ठाकावें फाजित ॥
अंगुळिया मोडी । त्यासी काय खिळें घोडीं ॥
नपुंसकासाठीं । तुका म्हणे नलगे जेठी ॥ ९५४ ॥
लोह कफ गारा सिद्ध हे सामुग्री । अग्नि ढणत्कारी दिसों येतो ॥
सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥
असें सांगों येतो रसीचा अनुभव । करूनि उपाव घेऊं द्दावा ॥
तुका म्हणे मिळे जीवसीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ९५५
[illegible]जातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥
होणार तें घडो होणाराच्या गुणें । होईल नारायणें निर्मिलें तें ॥
व्याघ्राचिये मुखें वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥
तुका म्हणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ९५६
भोग द्यावे देवा । त्याग भोगीच बरवा ॥
आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥
योजे यथाकाळें । उत्तम पाला कंद मुळें ॥
वंचक त्यासी दोष । तुका म्हणे मिथ्या सोस ॥ ९५७ ॥

परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥
थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं वाढविला ॥
पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देव वसे ॥
तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजीं असे सार नवनीत ॥ ९५८ ॥

वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं आविर्भाव ॥
शिकविलें काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकांच्या ॥
सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । ह्मणऊनि लाता मागें सारी ॥
तुका ह्मणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ९५९ ॥

भोग तो न घडे संचितावांचूनि । करावें तें मनीं समाधान ॥
ह्मणऊनि । मनीं मानूं नये खेद । ह्मणावा गोविंद वेळोवेळां ॥
आणिकां रुसावें नलगे बहुतां । आपुल्या संचितावांचूनियां ॥
तुका ह्मणे भार घातलियावरी । होईल कैवारी नारायण ॥ ९६० ॥

मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥
परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥
उपदेशावरी मन नाहीं ह्मातीं । तो आह्मां पुढती पाहूं नये ॥
तुका ह्मणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ९६१ ॥

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥
पाप त्याचें नांव न विचारी नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥
धर्म नीतीचा हा ऐकूनि वेव्हार । निवडीलें सार असार तें ॥
तुका ह्मणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ९६२ ॥

शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥
येथें केलें नव्हे काई । लंडीपणा खोटें भाई ॥
कारिती होया होय । परी तव्हे कोणी साह्य ॥
तुका म्हणे वरी । साधिलिया एक थोडी ॥ ९६३ ॥

आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया पूज्य होइजेतें ॥
अधीरासी नाहीं चाली जातां मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥
तुका म्हणे नाहीं आणिकांसी बोल । वांयां जाय मोल मुद्धीपाशीं ९६४
समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ॥
मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागे ॥
दृष्ट हें जाणावें आपुलें स्वहित । तुका म्हणे मात ऐसी आहे ९६५

तुका म्हणे भलें । आपिकां सहज निंदिलें ॥
कांहीं न करितां आयास । सहज घडले ते दोष ॥
बरें वाईटाचें । नाहीं कांहीं मज साचें ॥
तुका म्हणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥ ९६६ ॥

चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥
बहु खोटा अतिशय । जाणां भले सांगों काय ॥
मनाचे तळमळे । चंदनेंही अंग पोळे ॥
तुका म्हणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ९६७ ॥

भक्ति तों कठिण शुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥
जेथें पाहे तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंत तांतडीची ॥
कामाविलें तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥
तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ९६८॥

चित्ता मिळे त्याचा संग सुखकर । क्षोभवितां दूर तोचि भलें ॥
ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची नीत त्यागावरी ॥
हो का पिता पुत्र बंधु कोणी तरी । विजाती संगहीं धरूं नये ॥
तुका म्हणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥९६९॥

रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥
देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥
लावितां लावणी । विके भीके केव्हां दानी ॥
तुका म्हणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ९७० ॥

नेणें फुंकों कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥
तुह्मी आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥
नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥
चिंतनाच्या सुखें । तुका म्हणे नेणें दुःखें ॥ ९७१ ॥
कस्तुरी भिनली जये मृत्तिके । तयेसी आणिके कैसी सरी ॥
लोखंडाचे अंगीं लागतां परिस । तया आणिकास कैसी सरी ॥
तुका म्हणे मी न वजें यातीवरी । पूज्यमान करी वैष्णवांसी ९७२
नये माझा तुम्हां होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुम्हां ब्राम्हणांसी ॥
म्हणोनियां तुम्हां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥
वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावें तें नीत विचारूनि ॥
तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥९७३॥
ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥
दोरें चिरा कापे पडिला कांचणीं । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥
तुका म्हणे कैचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ९७४
न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंतीं या चरणां विठोबाच्या ॥
येथें सुखाचिया अनुपचि रासी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥
सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोह दुःख पाहतां नाहीं ॥
तुका म्हणे येथें होईल विसांवा । तुटतील हांवा पुढिलिया ॥९७५॥
श्रीराम सखा ऐसा धरीं भाव । सीपणाचा ठाव पुसीं मना ॥
स्मरण निरंतर म्हण तूं गोविंदा । वाचे लावीं धंदा नारायण ॥
यापरि सोपान नाहीं रे साधन । वाहावसें आण तुसी मना ॥
नको कांहीं करूं आळस अंतरीं । जपें निरंतरीं रघुपती ॥
तुका म्हणे मोठा लाभ तरेवंही । देहींच विदेही होती नामें ॥९७६॥
महादास नव्हे लेंकरांच्या गोष्टी । तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥
मरणाहूनि जीव करावा कठिण । अंतरींचा शिण वेगळा जाय ॥

मेल्या मनुष्याची न धरीती आस । तैसा हो उदास संसारासी ॥
तुका म्हणे येथें करारार्चे काम । मग आहे राम जवळीच ॥९७७॥
नको येऊं लाजे होय तूं परती । भजों दे श्रीपती सखा माझा ॥
तुझे संगतीनें मोठा जाला घात । जालों मी अंकित दुर्जनाचा ॥
तुका म्हणे रांडे घेइन कांटीवरी । धनी सहकारी राम केला॥९७८॥
आतां येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवूं दे ॥
तुझे भिडे माझे बहु जाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥
माझें केलें मज पारिखें माहेर । नटोनी साचार चाळविलें ॥
सुखासाठीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥
केला चौघाचार नेलों पांचांमधीं । नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ॥
तुका म्हणे आतां घेईन कांठीवरी । धनी त्या कैवारी केला देव९७९

जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥
नको भोंवताले जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥
कुड्याची संगती । सदा भोजन पंगती ॥
तुका म्हणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ९८० ॥

फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥
पाथरी प्रतिमा एकचि पाषाण । परि तें महिमान वेगळालें ॥
तुका म्हणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया॥९८१॥

आतां माझ्या मना । हेची घडो उपासना ॥
ऐसें करीं पांडुरंगा । प्रेम वोसंडेसें अंगा ॥
सर्व काळ नये । वाचे वीट आड भये ॥
तुका वैष्णवांसंगती । हेंचि भजन पंगती ॥ ९८२ ॥

( निळोबा )

येथें येऊनि केलें कायी । विठ्ठल नाहीं आठविला ॥
आहारे मूढा भाग्यहीना । गेलासी पतना मोहभ्रमें ॥
नाहीं केली सुटिका कांहीं । येथेंचि प्रवाहीं पडिलासी ॥
निळा म्हणे लाहोनि हातीं । केली माती आयुष्या ॥ ९८३ ॥

येऊनियां नरदेहा । कांहीं स्वहित तें पहा ॥
नाहीं तरी व्यर्थ जन्म । चिंतितसे विषयकाम ॥
पशु विषय सेविती । तयापरी तुझी स्थिति ॥
निळा म्हणे व्यर्थ गेला । प्राणि भूमिभार झाला ॥ ९८४ ॥

भवाब्धीचें सखोल पाणी । बुडाले प्राणी बहुसाल ॥
येथें उतार न दिसे कोणा । थोरा लहाना नागवण ॥
सत्वकर्में स्वर्गा जाती । तमें पडती अधःपातीं ॥
निळा म्हणे रजतमात्मक । पावती लोक नरदेहा ॥ ९८५ ॥

गुंतली ते आशा । पडिला मोहाजाळ फांसा ॥
न देखोनियां श्रीहरी । कर्ता भोक्ता संसारीं ॥
अवघांचि त्याचि सत्ता । करवी करितो तत्त्वता ॥
निळा म्हणे ऐसी । नेणोनि होती कासाविसी ॥ ९८६ ॥

ऐशा सोसूनियां यातना । कां रे मना वीट न ये ॥
बुद्धिहीना मतिमंदा । किती आपदा वसतिसी ॥
कधीं पावेल परिपाक । बुद्धि विवेका स्पर्शील ॥
निळा म्हणे रिघा मापें । विषय संकल्पें सचितोसी ॥९८७॥

उत्तम अधम जया जे संगती । तैसी त्याचि मति फांकों लागे ॥
सज्जना संगतीं धर्म क्रिया वाढे । पापिया आवडे पापबुद्धि ॥
म्हणोनि जैसिया तैसा झाला हरी । भक्ता मित्र वैरि निवकाला ॥
निळा म्हणे जाणे अंतरींचा भाव । तया तैसा देव फळदाता ९८८

तत्वतां न कळे । आलें मना तें चावळे ॥
खरियासी मानी खोटें । खोटें खऱ्या ऐसें वाटे ॥
अंध न देखे निवाडू । तम तैसा हाचि उजिवडू ॥
निळा म्हणे बुद्धिमळीन । नेणें पाप कीं हें पुण्य ॥ ९८९ ॥

शिविकाच्या वाढि लिन्ही । नतैसी दृष्टी आपुलाल्या ॥
जैसी क्रिया तैसें फळ । हें तों सकळ जाणती ॥

म्हणती अंगें आम्ही केलें । सहजें जें जें घडोनि आलें ॥
निळा म्हणे मत्तें ऐसीं । गुंतलीं तें कालपाशीं ॥ ९९१ ॥

पापासवें जिणें ज्याचें । वृथाचि त्याचें झालेंपण ॥
भोगितां भोग रडे मग । म्हणे मी जगनिंद्य झालों ॥
सांगतां हित नाहीं ऐकिलें । वडिलीं दाविलें विहित तें ॥
निळा म्हणे आतां पडियेला खोळे । गिळियला काळें व्याधिसर्पें ९९२

पाप तया नांव परदारागम । पाप तें परधन अपहार ॥
पाप तेंचि निंदा परपीडा द्वेष । पाप तेंचि उपहास पुढिलांचें ॥
पाप तेंचि जीवीं विषयाची आसक्ति । पाप अभक्ति कुळाचारीं ॥
निळा म्हणे पाप मुख्य तेंचि साचें । नावडे देवाचें नाम मुखीं ९९३

ज्याचें देणें त्याचें नाम । गावें प्रेम धरूनियां ॥
नाहीं तरी घडती दोष । अंगीं निःशेष कृतघ्नता ॥
पिंड वाढे ज्याच्या अन्नें । त्याचेंचि नांवें वाढवावें ॥
निळा म्हणे साक्षी दाते । सरते पुरते संतजनीं ॥ ९९४ ॥

न लगे जाणें वनाप्रती । अथवा एकांतीं बैसणें ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणा कां वाचे । सकळार्थाचें कारण हें ॥
न लगे आसन मुद्रा माळा । सांडणें कळा योगस्थिति ॥
निळा म्हणे उधळण सार । न लगे निराहार व्रतचर्या ॥९९५॥

येणेंचि साधनें । तुटती संसारबंधनें ॥
म्हणोनियां करा लाहो । स्मरा रुक्मादेवी नाहो ॥
येईल धांवतां । धांवोनियां पाचारितां ॥
निळा म्हणे हरी । कृपावंत दीनावरी ॥ ९९६ ॥

१२





आतां अभक्त कातर । मळिन ज्याचें अंतर ॥
टाकूनियां बरडळ वेष । मना अंगीं आशापाश ॥
वाचें सात्त्विक बोलणें । विषयीं वासनेचें ठाणें ॥
निळा म्हणे घेउनी सोंगें । मिरवे चार करीत उगे ॥९९७॥
न राहेचि क्षणहि भरी । कदा निश्चळ अंतरीं ॥
वाऱ्याळ धांवे तैसें । कार्येविण निरुद्देशें ॥
करी बोलत प्रमाद । वाढवूनि वादावाद ॥
निळा म्हणे महामूर्ख । करी सकळांसवें दुःख ॥ ९९८ ॥
निर्भीड बोलणें । त्याचें अपस्वार्थी जिणें ॥
त्याचिये संगतीचें फळ । होय चित्तासी खळबळ ॥
परदुःख नेणतां । करी पराचें पुष्टता ॥
निळा म्हणे दावी सोंग । ऐसा त्यजावा मातंग ॥ ९९९ ॥
नेणोनियां आत्महित । करिती घात अभिमानी ॥
नसतीच वाढवूनियां उपाधी । पडती मधीं संदेहा ॥
नाठवूनियां विठ्ठल देवा । करितां सेवा भूतांची ॥
निळा म्हणे जन्मोनि गेला । वृथाचि पडिला निरयांत॥१०००॥
वदवी असत्याची वाणी । माजी निंदेची पुरवणी ॥
जळो जळो त्याचें तोंड । पचतें पापाचेंचि कुंड ॥
कुश्चळ सर्वदा अंतरीं । इतरांचिया घातावरी ॥
निळा म्हणे भोगील पीडा । नर्कवासी होउनी किडा ॥ १ ॥
वाचे शब्द असत्याचे । हेंचि दुर्जनांचें भांडवल ॥
पुढिलांतें उपहासिती । आणि मानिती संतोष ॥
निंदा द्वेष अहंकार । मद मत्सर वाढते ॥
निळा म्हणे नरका जाणें । आहे पुरश्चरणें त्याचीं हें ॥ २ ॥
विद्यामानें गर्वताठा । धरिती प्रतिष्ठा वाढविती ॥
नेणती जेणें देव हातीं । लागे ते युक्ति हारविली ॥

काम्यनिषिद्धीं आदर थोर। जप ते अघोर मंत्रांचे ॥
निळा ह्मणे यातना थोरी। नरकीं अघोरीं पडावयाी ॥ ३ ॥
सर्प मुखींच धरिकें विष। मानूनि पीयूष अत्यादरें ॥
आणिका डंखुनी वधवी प्राणा। तैसी त्यां दुर्जना वाहांडी गोष्ट ॥
नागवूनि भलियां संतोष मानी। कैसा तो पतनीं न पडेल सांगा ॥
निळा ह्मणे जें जोडिलें सायासें। तेचि तयाहि ऐसें भोगणें पुढें ॥ ४ ॥
शुद्ध सात्त्विकी ब्राह्मण। सत्त्वरजमिश्रित क्षत्रिय जाण ॥
रजतमें वैश्य निर्माण। शूद्रा तमो निर्मिता ॥
नाना याति नाना भेद। यांपासूनी शाखा विविध ॥
निळा ह्मणे निषिद्ध तमीं। अनामिकादि पापकर्मी ॥ ५ ॥
तोचि जाणें अंतरींचें। लटिकें साचें सर्व द्रष्टा ॥
कैसें चाले तयापुढें। निवडी कुडें बराबरी ॥
हें तों आहे सकळां ठावें। लटिक्या भावें नपवीजे ॥
निळा ह्मणे अभिमान होतां। ठकिला विधाता शेष वेदी ॥ ६ ॥
होईल अंगीं बळ। तरी फजित करावे ते खळ ॥
जे कां करूनियां पाखांड। लटिकेंचि वाढविती बंड ॥
भोंदिती भाविका। कथुनी परमार्थ तो लटिका ॥
निळा ह्मणे तोंडें सांगे। तैसें नाचरोनियां अंगें ॥ ७ ॥
न सांपडे ऐसी कधीं। वेळ लागली ते संधी ॥
हरिचे गुण वाचे यावे। श्रवणीं श्रवण ते करावे ॥
गेलीं आतील वर्षे काळ। आयुष्या वेंचूनियां निष्फळ ॥
निळा ह्मणे याळागीं करा। वेगें आतां चित्तीं धरा ॥ ८ ॥
ज्याचा विश्वास जडला पायीं। हरिविण कांहीं नेणवी ॥
त्याचा करी अंगिकार। निरसी अंधार ममतेचा ॥
सत्यासत्य दाखवी तया। लावी आपुलीया निज सोई ॥
निळा ह्मणे ऐसें वर्म। सांपडे सुगम एकनिष्ठा ॥ ९ ॥

गेला फिरोनियां दिवस । न घटिका लव निमिष ॥
आहे तोंचि भरा हातीं । महा लाभाची संपत्ती ॥
मागें नागवलीं फारें । गेलीं वांयां नारीनरें ॥
निळा म्हणे म्हणोनि जागा । सांडोनी वोरबार वाउगा ॥१०१०॥
आशाबद्धा नाहीं मान । बहुत सन्मान नैराश्या ॥
याचिलागीं विचार करा । हित तें धरा मानसीं ॥
भजतां देवा देवचि होती । विस्मरणें जाती अधःपाता ॥
निळा म्हणे ममता बाधी । नित्य समाधी निःसंगा ॥ ११ ॥
सुख वाटे परी हें दुःख । भोगविल नरक परिपाकीं ॥
म्हणोनियां सांडीं आशा । भजें सर्वेशा विठ्ठला ॥
जेणें कधींची नये तुटी । लाभे कोटी कल्प जिणें ॥
निळा म्हणे पावसी पदा । जेथें आनंदा निजवस्ती ॥ १२ ॥
याचि पायीं धरिला भाव । भेटेल देव निश्चय ॥
नव्हे अन्यथा भाषण । ठावी खूण संतांसी हे ॥
निज करें कुरवाळून । देईल आलिंगन अत्यादरें ॥
निळा म्हणे येईल दया । देव सांसोया भक्तांसी ॥ १३ ॥
सुखें करावें भोजन । गजावे गुण श्रीहरीचे ॥
ल्यावें लेणें अलंकार । असावें सादर हरिकथे ॥
यथाविधी भोगितां भोग । हृदयीं पांडुरंग आठवावा ॥
निळा म्हणे न लिंपे कर्मा । हरिनाम धर्मा अवलंबितां ॥ १४ ॥
भाविकाच्या मनोभाव । पाववी देव सिद्धी हा ॥
तैंचि सत्य बोलिलों बोलें । माझिया आलें स्वानुभवा ॥
जाणें अंतरींचें आर्त । साक्षभूत सकळांचा ॥
निळा म्हणे संदेह नाहीं । अनुमान कांहीं यदर्थी ॥ १५ ॥
लोहा लागतां सुवर्ण । करावें हा स्वभाव गुण ॥
जैसि संचेल परिसा । जगद्गुरु हा विठ्ठल तैसा ॥

दला अंगी रत्नकीळ । नव्हती भिन्न अग्निज्वाळ ॥
निळा म्हणे सांडूनि जळा । सागर न निवडे वेगळा ॥ १६ ॥

सांपडली संधी । त्यासी कर्मी दृढ बुद्धी ॥
वेदविहित कर्म । हेंचि परमार्थाचें वर्म ॥
कर्मालागीं जो तत्पर । तोचि पावे पैलपर ॥
निळा म्हणे परब्रह्म । प्राप्त होय विहित कर्म ॥ १७ ॥

भुंकोनियां उठी । श्वान लागे भलत्या पाठीं ॥
ऐसा देहस्वभावगुण । नेणे भला बुरा कोण ॥
तैसाचि तो अतिवादी । अविवेकी सदा कोणी ॥
निळा म्हणे ओळखी सांडी । आलें तैसें बरवें तोंडी ॥ १८ ॥

---

## सद्गुरुप्रसादानें प्राप्त झालेल्या स्थितीचें वर्णन.

(ज्ञानदेव).

चंदनाचें झाड परिमळें वाड । त्याहूनि कथा गोड विठ्ठलाची ॥
परिमळु सुमनीं जाई जुई मोगरे । त्याहूनि साजिरे हरि आह्मां ॥
आह्मां धर्म हरी आह्मां कर्म हरी । मुक्ति मार्ग चाऱ्ही हरी आह्मां ॥
कल्पतरु इच्छेसि सागरु । त्याहूनि आगरु हरी माझा ॥
निवृत्ति सुवासु ब्रह्माचा प्रकाशु । विठ्ठल रहिवासु आह्मां पुरे ॥ १९ ॥

आह्मी किरण तूं सूर्यो । आह्मी वस्तु तूं वदयो ॥
कैसा देहीं देवो दिवटा । परा पश्यंती चारी वाटा ॥
आह्मी कळा तूं चंद्रमा । तूं अमृत आह्मी गरिमा ॥
आम्ही निधि तूं निधान । आम्ही ध्येय तूं साधन ॥
निवृत्ति उपरती वाहे । हृदयीं कृष्णनाम ध्याये ॥ १०२० ॥

श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा । इतरांचा लेखा कोण करी ॥
राजयाची कांता काय भीक मागे । मनचिया जोगें सिद्धि पावे ॥

कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला । काय वाणी त्याला सांगिजोजी ॥
ज्ञानदेव ह्मणे तरलों तरलों । आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ २१ ॥
माता पिता नाहीं बंधु बोधु कांहीं । सर्व सम डोहीं वर्तताती ॥
सर्व आत्माराम भजन निष्काम । दिन काळ नेम भजनशीळ ॥
दया वसे देहीं क्षमा ते माधवी । कासवीं शांभवी जनीं इये ॥
निवृत्ति ह्मणे ऐसा गयेनि सद्गुरु । उपदेश पूर अमृताचा ॥ २२ ॥
कासवीचीं पिलीं करुणा जरी भाकी। परिसांपडली लिकीं चरणसोय॥
कामधेनु घरीं हरि माझा गोपाळ । भज काळवेळ नाठवे तैसी ॥
चातकाची चिंता जरी न पवे जीवन । तरीच शोकें प्राण तृषा हेतु ॥
निवृत्ति स्वानंदु कामधेनु गुरु । नामाचा उच्चारु तेणें छंदें ॥ २३ ॥
प्रकृतीचा पैठा कल्पना माजिठा । न पवे तो वैकुंठा कर्मजाळें ॥
अहिंसेचें स्वरूप हेंचि हरिरूप । न ह्मणे हरी आप सर्व आहे ॥
नाहीं त्यासी जय न धरे सर्वथा । हरिवीण व्यथा कोण वारी ॥
निवृत्ति ह्मणे धरी गुरुचरणसोये । तेणें मार्गें पाहे हरि सोपा ॥ २४ ॥
हरीविण न दिसे जनवन आम्हां । नित्य हे पौर्णिमा सोळा कळी ॥
चंद्रसूर्यरश्मी न देखों तारांगणें । अवघा हरी होणें हेंचि देवो ॥
न देखों हे पृथ्वी आकाश पोकळी । भरलासे गोपाळीं द्रुमद्रुमीं ॥
निवृत्ति निष्काम सर्व आत्माराम । गयनी हें धाम गुरुगम्य ॥ २५ ॥
मनाची वासना मनेचि नेमावी । सर्वत्र धरावी विठ्ठल सोय ॥
आपेंआप निवेल आपेंआप होईल । विठ्ठलची दिसेल सर्वरूपीं ॥
साधितां मार्ग गूढ वासना अवघड । गुरुमार्गीं सुघड उपरती ॥
निवृत्ति वासना उपरति नेयेतां । चराचर खुणा हरी नांदे ॥ २६ ॥
एक देव आहे हा भाव पैं सोपा । द्वैतरूपें पापा पडसी नरकीं ॥
द्वैत सांडी अद्वैत धरी । एकें परोपरीं हरी नांदे ॥
विनाश कोंदलें परिपूर्ण विश्वीं । तोचि अर्जुनासि दृष्ट जाला ॥
ध्यानि प्रसादें निवृत्ति बोधु । अवघाचि गोविंदु अवघा करी ॥ २७ ॥

म्हणविती नंदाचा बाळ यशोदेचा । आपण चौवाचातीत कृष्ण ॥
शब्दासि नातुडे बुद्धीसि सांकडें । तो सप्रेमें आतुडे स्मरतां नाम ॥
उपचाराच्या कोडी न पाहे परवडी । तो प्रेमळाची घोडी भुये भोगी ॥
निवृत्तीचें तप फळलें अमुप । गयनिराजें दीप उजळिला ॥ २८ ॥
बुद्धि बोध नाहीं क्षमारूप सर्व । तेथें देहभाव अर्पियेला ॥
नाहीं काळ वेळ नाहीं तो नियम । सर्व यम नेम बुडोनि ठेले ॥
हरिरूप सर्व गयनिप्रसादें । सर्व हा गोविंद आम्हां दिसे ॥
निवृत्ति सफळ गयनि बोलला । सर्वकाळ जाहला हरिरूप ॥ २९ ॥
मी साक्षी कल्पना पळाली वासना । जनीं जनार्दना सेवीतुसे ॥
तूं तंव संपन्न आम्हुचें हें धन । सांगितली खूण निवृत्तीदेवीं ॥
तुजमाजीं प्रेम गेलें सप्रेम । जप व्रत नेम हारपले ॥
सोपान सगळा न दिसे इहीं डोळां । तूंचि बा गोपाळा आत्माराम ॥

नामा स्वयंपाक करोनि बैसलों । केशव श्वानरूपें आलों ।
रोटी घेऊनि पळाला । सर्वां भूतीं केशव ॥
हातीं घेऊनि तुपाची वाटी । नामा लागला श्वानापाठीं ॥
तूप घे गा जगजेठी । कोरडी रोटी कां खाशी ॥
तंव श्वान हांसोनी बोलिले । नामयीं तुज कैसें कळलें ।
खेचर म्हणे खेचरें उपदेशिलें । सर्वां भूतीं विठ्ठल ॥ ३१ ॥

---

## गुरुस्तुति.

( नामदेव ).

सद्गुरुरायें पूर्ण कृपा केली । निजवस्तु दाविली माझी मज ॥
माझें सुख मज दावियेलें डोळां । दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥
तया उतराई व्हावें कवण्यागुणें । जन्म नाहीं येणें ऐसें केलें ॥
नामा म्हणे सिकी दावियेली सोय । न विसरावे पाय विठोबाचे ॥ ३२ ॥

नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥
सर्व सांडुनी माझाई । वाचे विठ्ठल रखुमाई ॥
परेहुन परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥
सर्वांचें जें अधिष्ठान । तेंचि माझें रूप पूर्ण ॥
अवघी सत्ता आली हाता । नामयाचा खेचरी दाता ॥ २३ ॥

भक्ति हेंचि भावें परब्रह्म पक्वान्न । गुरुमुखें जेवण जेवीयेलें ॥
अनुभव भात लयलक्ष कढी । जेवणार गोडी घेत असे ॥
सुख शांति शाखा भावार्थ हा डाव । जेवणार गाढा आत्माराम ॥
दया क्षीरधारीं शांति पूर्णपोळी । घृत हें कल्होळीं प्रेम माझें ॥
विषयाचा गुरळा थुंकोनि सांडिला । नामा आंचवला संसारासी २४

सद्गुरूसारिखा सोइरा जीवलग । तोडिला उद्वेग संसारींचा ॥
काय उतराई होऊं कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥
माझें सुख मज दाखविलें डोळां । दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥
डोळियाचा डोळा उघडिला जेणें । लेवविलें लेणें आनंदाचें ॥
नामा म्हणे निकी सांपडली सोय । न विसंबे पाय खेचराचे ॥ २५ ॥

(जनाबाई).

आंधळ्याची काठी । अडकली कवणे बेटीं ॥
माझिये हरणी । गुंतलीस कोणे रानीं ॥
भुकें मी पाडस । चुकलें भोवें पाहें वास ॥
तुजवीण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं ॥
आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे आये ॥
माझी मेढवा जनसी । संतां विनवी दासी जनी ॥ २६ ॥

वैष्णव तो कबीर चोखामेळा महार । तिजा तो चांभार रोहिदास ॥
सजण कसाई बापा तो कसाब । वैष्णव तो शुद्ध एकनिष्ठ ॥
कमाल कुंभार मुकुंद जोहारी । जिहीं वेव्हारीं वस्ति केली ॥

राजाई गोणाई आणि तो नामदेव । वैष्णवांचा राव म्हणवितसे ॥
त्या वैष्णवाचरणीं करी ओंवाळणी । तेथें दासी जनी शरीराची ३७

( एकनाथ ).

माझी दत्त ती माउली । प्रेम पान्हा पान्हावली ॥
कुर्वाळुनी लावी स्तनीं । नोहे निष्ठुर क्रोध नाहीं मनीं ॥
भक्तासी न विसंबे । सदा वाट पाहे बिंबे ॥
एका जनार्दनीं निश्चित । दत्त नामें पावन पतीत ॥ ३८ ॥

मोकळें तें मन ठेविलें बांधोनी । जनार्दनचरणीं सर्वभावें ॥
स्थिर मति जाली वार्ता तीही गेली । द्वैताची फिटली सर्व सत्ता ॥
मोह आशाबद्ध कर्मा निवारलों । पावन तो जालों संतचरणीं ॥
एका जनार्दनीं धन्य संतसेवा । उगविला गोवा गुंती सर्व ॥ ३९ ॥

अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां । चरणी जगन्नाथा चित्त ठेलें ॥
माय जगन्नाथ बाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जनार्दन ॥
एका जनार्दनीं एकपणें उभा । चैतन्याची शोभा शोभलीसे १०४०

दीनाचा दयाळ । जया दासाची कळवळ ॥
तो हा सद्गुरु दयाळ । पायीं ठेवियलें भाळ ॥
न विचारी कुळ याती । शुची चांडाळ निश्चिती ॥
एका जनार्दनीं भावें । एकवेळ त्यासी गावें ॥ ४१ ॥

न सोडीरे मना गुरु जनार्दना । संसारबंधना सोडविलें ॥
संसार अजगर झोंबला विखार । धन्वंतरी थोर जनार्दन ॥
जनार्दना ऐसी साउली परियेसी । बहु कष्टें सायासीं जोडियेली ॥
जनार्दनें रंक तारियेला एका । संसारीं हा सखा जनार्दन ॥ ४२ ॥

व्यापक हा जनार्दन । जगीं भरला संपूर्ण ॥
मागें पुढें आहे उभा । काय वाणूं त्याची शोभा ॥
भरुनी उरला । सर्वांठायीं तो संचला ॥
शरण एका जनार्दनीं । व्यापक तो जनीं वनीं ॥ ४३ ॥

शिष्यापासून सेवा घेणें । हें तो लक्षण अधमाचें ॥
ऐसे असती गुरु बहू । नव्हेची साहूं भार त्यांचा ॥
एकपणें समानता । गुरु शिष्य उरता उपदेश ॥
एका जनार्दनीं शरण । गुरु माझा जनार्दन ॥ ४४ ॥

देवाचे ते आप्त जाणावे ते संत । त्यांचे चरणीं रत व्हावें सदा ॥
श्रीहरीची भेटी सहजची होय । श्रम लया जाय क्षणमात्रें ॥
पापाचे पर्वत भस्म नामाग्नीत । अभक्ता न कळे हित नाम न घेती॥
एका जनार्दनीं संतांचिया कृपें । नाम होय सोपें कृपें त्यांच्या॥ ४५॥

धन्य आज दिन संतदरुशनाचा । अनंत जन्मांचा शिण गेला ॥
मज वाटे त्यासी आलिंगन द्यावें । कदा न सोडावे चरण त्यांचे ॥
त्रिविध तापांची जाहली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवाचे ॥
एका जनार्दनीं घडो त्याचा संग । न व्हावा वियोग माझ्या चित्ता॥

जेथें मुख्यत्वें करावी भक्ती । तेथें घडावी संताची संगती ॥
हेंचि मागणें तुजप्रती । द्यावे निश्चिती मज देवा ॥
पुरवा पुरवा माझा हेत । दुजें मागणें नाहीं निश्चित ॥ ध्रु० ॥
आयुष्य अंतवरी नामस्मरण । गीता भागवताचें श्रवण ॥
विष्णु शिवमूर्तीचें ध्यान । हेंचि देणें सर्वथा ॥
ऐकोनी ऐसें वचन । जनार्दन तुष्टला प्रेमें करून ॥
एका जनार्दनीं पाय धरून । सप्रेमें आलिंगिला ॥ ४७ ॥

धन्य धन्य सद्गुरुराणा । दाखविलें ब्रह्मभुवना ॥
उपकार केला जगीं । पावन जालों आम्ही वेगीं ॥
पंढरी पाहतां । समाधान झालें चित्ता ॥
विटेवरी समचरण । एका जनार्दनीं निज खूण ॥ ४८ ॥

हरिप्राप्तीसी उपाय । धरावे संतांचे पाय ॥
तेणें साधती साधनें । तुटती भवाचीं बंधनें ॥

संताविण प्राप्ति नाहीं । ऐसी वेद देती ग्वाही ॥
एका जनार्दनीं संत । पूर्ण करिती मनोरथ ॥ ४९ ॥
आजी उत्तम सुदिन । झालें दर्शन संतांचें ॥
पाप ताप दैन्य गेलें । संत पाउलें पाहातां ॥
अवघा यत्न फळा आला । अवघा झाला आनंद ॥
अवघें कर्म सुकर्म झालें । अवघे भेटले संतजन ॥
एका जनार्दनीं बरा । संतसमागम खरा ॥ १०५० ॥
अपार महिमा संतांचा । काय बोलूं मी वाचा ॥
मागें तरले पुढें तरती । जड जीवां उद्धरती ॥
नाममात्रा रसायन । देऊनी तारिती संतजन ॥
ऐशा संतां शरण जाऊं । एका जनार्दनीं ध्याऊं ॥ ५१ ॥
उघड बोलती संत । जैसा हेतु पुरविती ॥
मनीचें जाणती ते सदा । होऊं नेदी विषयबाधा ॥
अज्ञान सज्ञान । तारिती कृपें करून ॥
संतापायीं ज्याचा भाव । तेथें प्रगटेची देव ॥
एका जनार्दनीं बरा । द्यावा मज तेथें थारा ॥ ५२ ॥
संतनाम गाय संतनाम गाय । संतनाम गाय कामधेनु ॥
सदा सर्वकाळ दुभे भक्तालागीं । उणें पडतां अंगीं धांव घाली ॥
नाम सुख स्तना लागला पान्हावे । अभक्ता न साहे धांवे पाठी ॥
जनीं जनार्दन दुहिला आवडी । उभारिली गुढी एकनाथें ॥ ५३ ॥
जयाचें चित्त संताच्या चरणा । तेणें नारायणा जिंकियेलें ॥
भावें देव मिळे भावें देव मिळे । संतचरणीं लोळे सर्व काळ ॥
संताची आवडी म्हणोनी अवतार धरी।योगक्षेम भारी चालवी त्याचा
संतचरणीं सेवा आदर उपचार । एका जनार्दनीं साचार करीतसे ॥
संत भलते याती असो । परि विठ्ठल मनीं वसो ॥
तया घालीन लोळणी । घेईन मी पायवणी ॥

ज्ञाती संबंध । मज नाहीं भेदाभेद ॥
भलते ज्ञातीचा । विठ्ठल उच्चारी वाचा ॥
तेणें पावन देह चारी । एका जनार्दनीं निर्धारी ॥ ५५ ॥
असोनी उत्तम न करी भजन । संतसेवा दान धर्म नेणें ॥
काय त्याचें कुळ चांडाळ चांडाळ । मानी तो विटाळ यमधर्म ॥
सदा सर्वकाळ संतांची करी निंदा । पापाची आपदा भोगी नर्क ॥
स्वमुखें आपण सांगे जनार्दन । एका जनार्दन पूजन करी सुखें ५६
कर्म उपासना नकळे जयासी । तेणें या संतांसी शरण जावें ॥
सर्व कर्म भावें विठ्ठल नाम गावें । जाणिवे नेणिवेचे हावें पडूं नये॥
अभिमान झटा वेदाचा पसारा । शास्त्राचा तो थारा वहातां अंगीं॥
एका जनार्दनीं सर्व कर्म पाहीं । विठ्ठल म्हणतां देहीं घडतसे॥५७॥
नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जाती ॥
शस्त्रें आणि गोळे भलता प्रकार । परिसासी संस्कार होय हेम ॥
पर्जन्य वर्षतां जळ वाहावाटे । तें सम सगटे मिळे गंगेसी ॥
सर्व तेही जाय गंगाची होउनी । तैसा नाना प्राणी नाहीं नामीं ॥
एका जनार्दनीं नाम तें पावन । जप तप ध्यान न करी कांहीं॥५८॥
ऐकोनी संत कीर्ती । मना झालीसे विश्रांती ॥
नाहीं पुनरावृत्ती । जन्मांची तया ॥
धन्य संत जन । मज केलें वो पावन ॥
विश्रांतीचें स्थान । हृदयीं माझ्या ठसविलें ॥
बहु जाचलों संसारें । बहु जन्म केले फेरे ॥
ते चुकविले सारे । आजी कृपा करूनी ॥
शरण एका जनार्दन । माझें हरिलें मीपण ॥
तुम्हीं कृपा करून । अभय वर दिधला ॥ ५९ ॥
सदा वसे अंगीं शांती । चारी मुक्ती दासी होती ॥
तेथें वसे हरीचें वास । एका सोवळें उदास ॥

कामक्रोधाची वार्ता । अंगीं नाहीं पैं सर्वथा ॥
एका जनार्दनीं निष्काम । सदा परिपूर्ण मंगलधाम॥१०६०॥

अज्ञानी विश्वासें साधुसी वंदी । ज्ञानीया तो सदा तया निंदी ॥
ऐसी उभयतांची क्रिया । पहातां चर्या एकची ॥
वंदूं निंदू कोणी ऐसा एक भाव । तेथें तो देव वसे सदा ॥
ज्ञास अज्ञानाचा निवाडा होय । एका शरण जनार्दनीं जाय ॥६१॥

कायीक वाचीक मानसीक । सदा वसे राम एक ॥
तो नर अथवा नारी । हो कां पतीत दुराचारी ॥
सदा वसे राम ध्यानीं । आणीक कांहीं नाहीं मनीं ॥
एका जनार्दनीं मनीं । राम पाहे मनीं ध्यानीं ॥ ६२ ॥

सर्वांगीं सुवास परी तो उगला न राहे ।
सभोंवते तरुवर चंदन करिताचि जाये ॥
धणी धाय परी त्याची भूक न धाये ।
सागरीं भरितें परी सरिता न समाये ॥
वैरागरमणी पूर्ण तेजाचा होय ।
भेटले हरळ हिरे करितचि जाय ॥
एका जनार्दनीं पूर्ण झालासे निज ।
आपणासारिखे परी त्या करितसे तुजें ॥ ६३ ॥

ऐसी शांति ज्यासी आहे । त्याचे घरीं देव राहे ॥
हा तो अनुभव मनीं । पहा प्रत्यक्ष पुराणीं ॥
धर्माघरीं वसे । अर्जुनाचे रथीं बैसे ॥
अंकीत दासाचा होय । एका जनार्दनीं देव ॥ ६४ ॥

## संतांचें महत्त्व.

(तुकाराम).

अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥
तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥
बाळकाचे चाली । माता जाणुनि पाउल घाली ॥
तुका ह्मणे नांव । जनासाठीं उदकीं ठाव ॥ ६५ ॥

अमृत तें प्रेम जिव्हा ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥
सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥
सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप तयामाजीं ॥
तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव नारायण ॥ ६६ ॥

आपुलिया हिता जो असे जागता । धन्य मातापिता तयाचिया ॥
कुळीं कन्यापुत्र होती जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥
गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ॥
तुका म्हणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ६७

उदकीं कालवी शेण मळमूत्र । तो होय पवित्र कासथानें ॥
उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥
दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाचीच मूर्ति ॥
तुका म्हणे जेव्हां फिरलें कपाळ । तरी अमंगळ योग होती ॥ ६८ ॥

उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥
नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥
उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥
भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यांसी ॥ ६९ ॥

उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥
लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥
जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि राशि गुणांचीच ॥
तुका म्हणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ७०

काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥
कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥
बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरि । आणीक भीकारी नेणें दुजें ॥
तुका म्हणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची॥७१
काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥
काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥
तुका म्हणे वत्स धेनुवेचा चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत॥७२॥
कोणा पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं इंद्रादिक दुराविलें ॥
ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरीच्या खुणा प्रगटोनि ॥
बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥
तुका म्हणे मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ७३ ॥
घातलें दुकान । देती आलियासी दान ॥
संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥
मागल्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥
तुका म्हणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ७४ ॥
जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचि ना ॥
तुम्ही संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥
अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायांपें विठ्ठला ठेवीं मज ॥
तुका म्हणे ऐसी करा मिरवण । मग तो रक्षण करील माझें॥७५॥
जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥
आणिक नये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥
नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥
तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ७६ ॥
जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥
गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥

ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें॥
तुका म्हणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजीं ॥ ७७ ॥

ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥
देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥
कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥
तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनि ॥ ७८ ॥

ज्यासी आवडी हरिनामाची । तोचि एक बहु शुचि ॥
जपतो हरिनाम बीज । तोचि वर्णामाजी द्विज ॥
तुका म्हणे वर्ण धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ॥ ७९ ॥

तुम्ही पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥
आतां बाधूं न सके काळ । जाली विषम शीतळ ॥
भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रामीं ॥
तुका म्हणे भये । आतां स्वप्नींही तें नये ॥ १०८० ॥

देवाची पूजा हें भूताचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥
रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरी सकळही ॥
तुका म्हणे संतपण याचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ८१ ॥

धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥
येथें उपकारासाठीं । आले घर ज्या वैकुंठीं ॥
लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥
मधुरा वाणी ओठीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥ ८२ ॥

पडोनिया राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥
न लगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करी भावें ॥
सहज ते स्थिति । उपदेशपरयुक्ति ॥
तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ८३ ॥

प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ॥
न पुसतां आतां नये । सोडी बैसतांही सिरे ॥

अवघा त्याचा होत । जीव भावाही सहित ॥
वदे उपचाराची वाणी । कांहीं माग म्हणउनि ॥
उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धांवे मागें ॥ ८४ ॥

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥
विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥
तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भये नर्का जाणें ॥८५॥

भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥
परी आम्ही असों एकाचिये हातीं । नाचवितो चित्तीं त्याचें तैसें ॥
वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥
तुका म्हणे तुम्ही बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥ ८६ ॥

भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठी । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥
काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥
मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें ॥
तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥८७॥

वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥
ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितों येविशीं ॥
असा जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्ध हीण ॥
तुका म्हणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥ ८८ ॥

वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥
नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥
पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥
तुका म्हणे याती । हो का तयाची भलती ॥ ८९ ॥

शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥
मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा कारणीं ॥

सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥
तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ १०९० ॥
संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥
कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥
काया कुरवंडी । करुन ओंवाळून सांडी ॥
तुका म्हणे भावें । हात जोडी असो ठावें ॥ ९१ ॥
संत केवळ दयाळ । हातीं दिधला गोपाळ ॥
पायीं ठेवितां कपाळ । जाला प्रेमाचा सुकाळ ॥
कानीं पडितां वचन । जाले त्रैलोक्याचे कान ॥
ज्यांचा मस्तकीं पडतां हात । जाला देहबुद्धिपात ॥
तुका म्हणे देवाधिदेवा । त्याची करूं पावे सेवा ॥ ९२ ॥
संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥
कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥
तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ९३ ॥
हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःखनिवारिता नारायण ॥
न लगे वाहणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराव ॥
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ९४ ॥
हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥
मोहरा होय तोचि अंगीं । सूत न जळे ज्याचे संगीं ॥
तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ १०९५ ॥

(ज्ञानदेव)

योगियां दुर्लभ तो म्यां देखिला साजणी ।
पाहतां पाहतां मना नपुरेचि धणी ॥

देखिला देखिला माय देवाचा देवो ।
फिटला संदेहो निमालें दुजेपण ॥
अनंतवेषें अनंतरूपें देखिलें म्यां त्यासी ।
बापरखुमादेविवर खुण बाणली कैसी ॥ ९६ ॥
जनीं वनीं हरि आहे निरंतरीं । बोलिली वैखरी व्यासमुखें ॥
जगजीव ईश्वर भरला चराचर । लक्षालक्ष पार अलिप्तपणें ॥
चहूं देहां भासी व्याला तत्त्वें तत्त्वेसी । हरी वैराटेसी एक वृक्ष ॥
ज्ञानदेवो म्हणे वृक्षही वृक्ष न होणें । असोनि नसणें सुमनीं जैसें ९७
पंचबाणें माझें हृदय भेदलें । पांचेविण पावलें च्यान्ही सांडूनियां ॥
सकळै माझें गोत मुसे आलें । ब्रह्मरसें जालें बाईये वो ॥
बापरखुमादेविवरु ब्रह्मरसें विवळला ।
मजसहित निमाला ब्रह्मरूपींगे माये ॥ ९८ ॥
जेथें पाहे तेथें व्यापिलें अनंतें । तयाविण रितें कोण ठाये ॥
गगनाविण ठावो नाहीं जैसा रिता । तैसा या अच्युताविण कांहीं ॥
तेथें माझ्या चित्ता करी रहिवासु । न करी उदासु ऐसीयातें ॥
निवृत्तीतें मन ठविलें चरणीं । नामाची निशाणी अखंडित ॥ ९९ ॥
चित्तासी व्यापक व्यापुनियां दुरी । तेंचि माजिघरीं नांदे सदा ॥
विसे मध्य सुख मुक्तलग हरी । शांति वसे घरीं सदोदित ॥
नाहीं या शेवट अवघा निर्घोष । गुरुतत्त्वें वाट चैतन्यासी ॥
मुक्ताई संपन्न मुक्त पैं सेजुळे । सर्वत्र उभविले मुक्ति चोख ११००
शांति क्षमा वसे देहीं देव पैसे । चित्त समरसें मुक्त मेळु ॥
निर्गुणें उपरमु देव पुरुषोत्तमु । प्रकृति संगमु चेतनेचा ॥
सज्ञानीं दिवटा अज्ञानीं तो पैटा । निवृत्तीच्या तटा नेतु भक्ता ॥
मुक्ताई दिवस अवघा हृषीकेश । केशवेंविण वास शून्य पैसे ॥ १ ॥
ज्ञानप्राप्तीलागीं व्हावें अती नीच । म्हणवी जो उच्च सिद्ध नोहे ॥
अहंता समूळ करावा कीं त्याग । काम क्रोध सांग शिवूं नये ॥

सात्विक वैराग्य परिपूर्ण शांति । दैविक संपत्ति सांडी केवीं ॥
व्हावें निराभास तरीच ही प्राप्ती । ज्ञानेश्वरा भ्रांति फिरे नाहीं ॥ २ ॥
सुवर्णाचें भांडें दुधाचें आधण । कुसुंबा घालुनि नाश केला ॥
तोडुनि चंदन कर्दळीचें वन । बाभुळा रक्षण बैसविलें ॥
उत्तम भूमिका कमाविली पाही । धोत्रा लवलाही पेरियला ॥
ज्ञानदेव म्हणे ऐसें न करावें । शरण रिघावें सद्गुरूशी ॥ ३ ॥
देव देव म्हणुनि व्यर्थ कां फिरशी । निजदेव नेणशी मुळीं कोण ॥
देवा नाहीं रूप देवा नाहीं नांव । देवा नाहीं गांव कोठें कांहीं ॥
ज्ञानदेव म्हणे भजा आत्मा देवा । अखंडीत सेवा करा त्याची ॥ ४ ॥

## कलिप्रभाव.

(नामदेव).

तरावया संसार जडजीव प्राणी । नाव नवखणी नवही मुखें ॥
बैसा नावेवरी नाहीं भेदाभेद । श्रवणाचे छंदें नाव गेली ॥
अठराही आवले नावेसी लागले । साही रंगीं भरले सिरवताती ॥
चहूं मुखें जनाचा नकळे विचार । सेवी अगोचर सहस्रमुखा ॥
वारील वारील हाचि पैं निर्धार । नामा पैलपार उतरला ॥ ११०५ ॥

माझा भाव तुझे चरणीं । तुझें रूप माझे मनीं ॥
सांपडलों एकमेकां । जन्में नव्हेरे सुटिका ॥
त्वां मज केलेंरे विदेही । म्यां तुज धरिलें हृदयीं ॥
त्वां तोडिली माझी माया । मी जडलों तुझ्या पायां ॥
नामा म्हणे गा सुजाणा सांग ठकिलें कोणकोणा ॥ ६ ॥
आम्ही परीट चोखट । शुद्ध केलें वस्त्र ॥
बोध साबण लाऊनी ठायीं । पाप दडविलें पायीं ॥
शांति शिळेवरी धुतलें । ज्ञानगंगीं निर्मळ झालें ॥
परब्रह्म होऊनी ठेलों । नामा म्हणे सुखरूप झालों ॥ ७ ॥

## अद्वैतपर अभंग.

( तुकाराम ).

जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥
डोळा बैसलें बैसलें । रूप राहोनि संचलें ॥
न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहे तिकडे सरिसा ॥
तुका ह्मणे ससपदीं । उभा दिठीचिये आधीं ॥ ८ ॥
दाता नारायण । स्वयें भोगितां आपण ॥
आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥
देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥
तुका ह्मणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ९ ॥
सेवटींची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥
काया वाचा मन । चरणीं असें समर्पण ॥
जीवपरमात्मा ऐक्यासी । सदा वसो हृदयेसी ॥
तुका ह्मणे देवा । कंठीं वसावें केशवा ॥ १११० ॥
आह्मी तरी आस । जालों टाकोनि उदास ॥
आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥
भलते ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो ॥
तुमचें तुह्मांपासीं । आम्ही आहों जैसीं तैसीं ॥
गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥
तुका ह्मणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ११ ॥
तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥
तूं माझा आकार । मी तों तूंच निर्धार ॥
मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ॥
मी तुजमाजीं अचळ । मजमाजीं तूं सबळ ॥
तूं बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजीं सुखें ॥
तुका ह्मणे देवा । विपरीत ठायीं नांवा ॥ १२ ॥

आम्ही न देखों अवगुणां । पापी पवित्र ह्याह्मणा ॥
अवघीं रूपें तुम्हीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥
मज भक्तीसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥
तुका ह्मणे घोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥ १३ ॥

अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो ध्यावा भार तोचि बाधी ॥
बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥
अखंड तें खंडें संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥
तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसें दशे सुखरूप ॥ १४ ॥

अज्ञान हा देह स्वरूपीं मीनला । सर्व वोसावला देहपात ॥
ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योति ॥
तुका म्हणे चित्त स्वरूपीं राहिलें । देहविसावलें तुझ्या पायीं ॥१५॥

रूपीं जडलें लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥
देहभाव हरपला । तुज पाहतां विठ्ठला ॥
कळों नेदी सुखदुःख । तान हरपली भूक ॥
तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ १६ ॥

देणें सुखें माझें निवालें हें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥
कवतुकें करुणा भाकितसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥
मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समूळ गेली ॥
तुका म्हणे सुख जालें माझ्या जीवा । रंगलें केशवा तुझ्या रंगें ॥ १७ ॥

तुझें अंगभूत । आह्मी जाणसों समस्त ॥
पैरा वावतसे जना । गुढारसें नारायणा ॥
ठोका ठार मारा । घरचिया संव चोरा ॥
तुका ह्मणे भेदा । करूनि करितों संवादा ॥ १८ ॥

पिकलिये सेंदे कडूपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें ॥
काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि जाली ॥

आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥
तुका ह्मणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं१९
पडिलों बाहेरि आपुल्या कर्तव्यें । संसाराचा जीवें वीट आला ॥
एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडलिया ॥
दोनी जालीं नांवें एकाच्या मंथनें । भुस सार गुणें वेगळालीं ॥
तुका म्हणे कोठें वसे मुक्ताफळ । सिपल्याचें स्थळ खंडलिया ॥२०

मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ॥
ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभावा ॥
आला होता गेला पुर । धरिला धीर जीवनीं ॥
तुका म्हणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥ २१ ॥

याजसाठीं केला होता आटाहास । सेवटींचा दिस गोड व्हावा ॥
आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥
कवतुक वाटे जालिया वेचावें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥
तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं

मज अंगाच्या अनुभवें । काई वाईट बरें ठावें ॥
जालों दोहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥
वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥
तुका ह्मणे घेऊं देवा । सर्व करूनि बोळावा ॥ २३ ॥

पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥
कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आलें एकपणें ॥
मृत्तिकेचे घट जाले नानापरी । मृत्तिका अवधारीं एकपणें ॥
तुका ह्मणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक एकपणा ॥ २४ ॥

ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ॥
तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण जाला हरि ॥
चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥
तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥ २५ ॥

वेद जया गाती । आम्हां तयाची संगती ॥
नाम धरियेलें कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥
ॐकाराचें बीज । हातीं आमुचें तें निज ॥
तुका ह्मणे बहु मोठें । अणुरेणुया धाकुटें ॥ २६ ॥

पटे ढाळूं आम्ही विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥
निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥
बळिवंत जेणें रचिलें सकळ । आह्मां त्याचें बळ अंकितांसी ॥
तुका ह्मणे आम्ही देखतचि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥२७॥

बोलणेंचि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥
एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥
पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टी धाय ॥
तुका ह्मणे मनें । हेंचि संकल्प वाहाणें ॥ २८ ॥

डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीचें ॥
काय तें वानावें वाचेचें पाल्हवें । वेदां न बोलवे रूप ज्याचें ॥
आनंदाच्या रसें ओंतीव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥
तुका ह्मणे मी तों सगळाच विराळों । विठ्ठलचि जालों दर्शनानें २९

कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुह्मी देवा संतजन ॥
विचित्र विदानी नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥
काय वानरांची अंगींची ते शक्ति । उदक तरंती वरी शिळा ॥
तुका ह्मणे करी निमित्याचि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ॥३०

माझ्या मुखें मज बोलविलें हरि । सकळां अंतरीं नारायण ॥
न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आम्ही ॥
तुका ह्मणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकवितां ॥३१॥

हेंचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥
ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥

वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥
तुका म्हणे घाल तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥२२॥
आपला तो एक देव करुनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥
येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसान ॥
अविनाश करी आपुलिया ऐसें । लावी मना पिसें गोविंदाच्या ॥
तुका म्हणे एका मरणेंचि सरे । उत्तमचि उरे कीर्ति मागें ॥ २३॥
देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनि ॥
नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥
करुणा वचनीं लाहो एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥
तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥२४॥

थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥
हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंग सरलें तें ॥
अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥
तुका ह्मणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ २५ ॥

मान अपमान गोवे । अवघें गुंडूनि ठेवावे ॥
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥
शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥
आली ऊर्मी साहे । तुका ह्मणे थोडें आहे ॥ २६ ॥

चालें हें शरीर कोणाचिये सत्तें । कोण बोलवितें हरीविण ॥
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥
मानसाची देव चाळवी अहंता । मीचि एक कर्त्ता ह्मणोनियां ॥
वृक्षाचेंही पान हालें त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥
तुका ह्मणे विठो भरला सबाहीं । तया उणें कांहीं चराचरीं ॥२७॥

ऐसें कां हो न करा कांहीं । पुढें नाहीं नास ज्या ॥
विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदूनि ॥

… । … खोट …॥
तोडीं जाणिवेची कळा । होईं वृत्तीसी वेगळा ॥
तुका म्हणे नभा । परता आणूचाही गाभा ॥ ३९ ॥
न करीं रे संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥
या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या थारा आनंदाचा ॥ ४० ॥
विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥
आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥
कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥
तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४१ ॥
पुसावें तें ठाई आपुलया आपण । अहंकारा शून्य घालूनियां ॥
येर वाग्जाळ मायेचा अहंकार । पंचमाशीं थार अज्ञान तें ॥
फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥
तुका म्हणे अवघे ब्रह्माचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नांव ॥
माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया तयापरी ॥
तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणातळीं हारपते ॥
दुजे नाहीं येथें बळ कोणासाठीं । आणीक ते भटी विचाराची ॥
तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसी तैसी ॥ ४२ ॥
अमर आम्हीं अमर आम्ही । खरें कीं पाहा खोटें हें ॥
न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ॥
कैचा धाक कैचा धाक । सकळिक हें आपुलें ॥
देवचि मरे देवाचि वरें । तुका म्हणे खरें तुम्ही ॥ ४४ ॥

नाहीं शब्दाधीन वसे आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥
हर्षामर्षें अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥
न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चिंता ॥
तुका म्हणे सुख देहनिरसनें । चिंतन चिंतनें तद्रूपता ॥ ११४५ ॥
साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥
भोगाचे सांभाळीं द्यावें कळिवर । संचिताचा थार मोडूनियां ॥
महत्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥
तुका म्हणे मग कैचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥ ४६ ॥

भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करूनी ठेवा ॥
शांती धरणें जिवासाठीं । दया उत्तम गोमटी ॥
देह लेखावें असार । सत्य पर उपकार ॥
तुका म्हणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ४७ ॥
त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥
मग जैसा तैसा राहे । काय पाहें उरलें तें ॥
अंतरीचें विषम गाढें । येऊं पुढें नेदावें ॥
तुका म्हणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ४८ ॥
शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥
रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥
कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥
सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥ ४९ ॥
पंडित तो भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥
अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वांभूतीं विठ्ठल आहे ॥
रिता नाहीं कोणी ठाव । सर्वांभूतीं वासुदेव ॥
तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥ १०५० ॥
चित्ताचा चाळक । त्याचें उभयसूत्र एक ॥
नाचवितें ताच छंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥

चंद्र कमळणी । नाहीं धाडील सांगोनि ॥
तुका म्हणे उठी । लोहचुंबकाचे दृष्टी ॥ ५१ ॥

योगियाची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान
येरयेरांवरी जावयाचें उसणें । भाग्यस्थळीं तेणें झाडावेसी ॥
केलिया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो कान्हाविसो ॥
तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥५२॥

ठेवा जाणीव गुंडून । येथें भावचि प्रमाण ॥
एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥
तर्कवितर्कासी । ठाव नलगे साक्षासी ॥
तुका म्हणे भावेंविण । अवघा बोलती तो सीण ॥ ५३ ॥

मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता॥
सुख पावे शांती धरुनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥
तुका म्हणे लागे थोडाच विचार । परी हे प्रकार नागवती ॥५४॥

मुक्त होता परी बळें जाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥
पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणें कोण करिता तो ॥
तुका म्हणे व्यर्थ गेलें वांयांविण । मृग पावे शीण मृगजळीं ॥५५

तापल्यावांचून नव्हे अलंकार । पिटूनियां सार उरलें तें ॥
मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाति । नासें शत्रु होती मित्र तेचि ॥
कळिवर बरें भोगूं द्यावें भोगा । फांसिलें तें रोगा हातीं सुटे ॥
तुका म्हणे मन करावें पाठेळ । साहावेचि जाळ सिजेवरि ॥ ५६ ॥

वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदत अंतरा वज्राऐसें ॥
कोणी न सहावें काशाही कारणें । संदेह सिधाम देह बळी ॥
नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ॥
तुका म्हणे जरी गिळे अहंकार । तरी वसे घर नारायण ॥ ५७ ॥

कोडें जाला जरी देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥
येरांनी सांगावी देखा आहाणी । विचारजाणिवी करावया ॥

बाळा आणिकांची नेणे तान भूक । सुखें पाहे मुख आपुलिया ॥
तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव । शब्दाचें गौरव कामा नये॥५८॥
ऐसें कळियुगाच्या मुळें । जालें धर्माचें वाटोळें ॥
सांडूनियां रामराम । ब्राह्मण म्हणती दोमदोम ॥
शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरती काळीं ॥
तुका म्हणे वृत्ति । सांडुनि गदा मागत जाती ॥ ५९ ॥
अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥
त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥
काम क्रोध मद्य अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥
करितां पाप न धरी शंका । म्हणे तुका कोणीही ॥११६०॥
नाहीं आम्हीं विष्णुदास । करीत आस कोणांची ॥
कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥
असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुल्या ॥
तुका म्हणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥ ६१ ॥

---

## दंभ पाखंड.

( नामदेव ).

या विठोबापरतें आन दैवत म्हणती । ते शब्द नायकवती कानीं माझ्या
पाखांडी म्हणती वरोचि असावें । हा ब्रह्मकटाह करूं शके न अनारिसा
तोही जरी म्हणेल अहंब्रह्मास । तरी न पहावी वास येहीं नयनीं ॥
कोटि कोटि ब्रह्मांडें एकएक्या रोमीं । व्यापोनियां व्योमीं वर्ततसे ॥
ऐसा माझा विठो सर्वांघटीं सम । न संडावें वर्म नामा म्हणे॥६२॥
यज्ञादि कर्मे करूनि ब्राह्मण । दंभ आचरण दावी लोकां ॥
लोकांसी दाविती मीच कर्मनिष्ठ । अभिमान खोटा वागविती ॥
वागविती वाक्य जाण ऋषेश्वर । नको येरझार नानामतें ॥
नानामतें अधोऊर्ध्वसात जावीं । नको गोवागोवीं नामा म्हणे॥६३॥

गोसावीपणाचा दाखविती वेष । नाहीं निदिध्यास हरिनामीं ॥
वरी वरी आर्त दाविती झगमग । अंतरीं तो संग विषयाचा ॥
व्यर्थ लोकांपुढें हालविती मान । विटंबन केली संसाराची ॥
नामा ह्मणे मन गुंतेल पांडुरंगा। आतां ऐसा सांगा कोण रीती॥६४॥
डोई बोडून केली खोडी । काया वागविली बापुडी ॥
ऐसा नव्हे तो संन्यास । विषय देखोनि उदास ॥
मांजराचे गेले डोळे । उंदीर देखोनि तळमळे ॥
वेश्या झाली पाटाची राणी । तिला आठवे मागील करणी ॥
नामा म्हणे वेष पालटे । परी अंतरींचें ओसपण न तुटे॥११६५॥
तोंवरी रे तोंवरी वैराग्याचें ठाण ।
जंव कामिनी कटाक्ष बाण लागले नाहीं ॥
तोंवरी रे तोंवरी आत्मज्ञान बोध ।
जोंवरी अंतरीं कामक्रोध उठले नाहीं ॥
तोंवरी रे तोंवरी निरभिमान ।
जंव देहीं अपमान झाला नाहीं ॥
नामा ह्मणे अवघी बचमच गाळी ।
विरक्ती तो जाळी द्वैत बुद्धि ॥ ६६ ॥
चंद्रसूर्यादि बिंबें लिहिताती सांग ।
परि प्रकाशाचें अंग लिहितां नये ॥
संन्यासाचीं सोंगें आणिताति सांग ।
परि वैराग्याचें अंग आणितां नये ॥
नामा म्हणे कीर्तन करिताति सांग ।
प्रेमाचें तें अंग आणितां नये ॥ ६७ ॥
मुखीं नाम हातीं टाळी । दया उपजे कोणे काळीं ॥
काय करावें तें गाणें । धिक् धिक् तें लाजिरवाणें ॥
हरिदास म्हणोनि हालवी मान । कवडीसाठीं घेतो प्राण ॥

हरिदासाचे पायीं लोळे । केशी धरोनि कापी गळे ॥
नामा म्हणे अवघे चोर । एक हरिनाम हें थोर ॥ ६८ ॥

काय करूनि तीर्थाटणें । मन भरिलें अवगुणें ॥
काय करावें तें तप । चित्तीं नाहीं अनुताप ॥
मनःसंकल्पाचीं पापें । न जाती तीर्थाचेनि बापें ॥
नामा म्हणे सर्व सोपें । पाप जाय अनुतापें ॥ ६९ ॥

करीना साधन जिवासी बंधन । कोणे काळीं मन नोहे शुद्ध ॥
करूं जातां तप अभिमानरूप । त्रिविधादि ताप कैसा निवे ॥
नित्यानित्य करी विवेक आपण । तेणें अभिमान वाढतसे ॥
नामा म्हणे जन्म विसरोनियां गेलों । मरोनि राहिलों देहातीत ॥
कांडितांचि कोंडा न निघे तांदूळ । शेरा कैचें फळ अमृताचें ॥
कण्हेरीच्या मूळा सुगंध तो नाहीं । कसाबाची गाई जिणें कैचें ॥
रुईदूध जरी येईल भोजना । लोभियाच्या धना वेंच नाहीं ॥
निष्फळ हें जिणें भक्तिविण मन । नामा म्हणे जाण नये कामा ७१

काय चाड आह्मां बाहेरल्या वेषें । सुखाचें कारण असे अंतरीं तें॥
भीतरी पालट जंव नाहीं झाला । तोंवरी न बोला जाणपणें ॥
चंदनाचे संगतीं नीच महत्त्वा पावली । नांवें परि उरली पाऊट देहीं॥
नामा ह्मणे ऐसें सांगा मज कोणी।जेणें केशव येऊनि हृदयीं राहे ७२

## श्रीकृष्णचरित्र.

( नामदेव ).

चरणासी शरण तुझिया जे येती । तेचि उतरती भवसिंधू ॥
लक्ष्मीनें ज्यातें असे आराधिलें । ठेवीं तीं पाउलें स्तनावरी ॥
आवडीनें शिवें मस्तकीं वंदिलें । ठेवीं तीं पाउलें स्तनावरी ॥
नामा ह्मणे ऐशी करिताती स्तुती । शिंपियेली क्षिती अश्रुपातें ॥

त्रिविधतापें प्राणी होताती संतप्त । शीतळ करीत कथामृतें ॥
अमृतापरीस तुझी कथा अधिक । सांगतसे ऐक देवराया ॥
स्वर्गीं जें अमृत प्राशन करिती । पुण्य सरल्या येती मृत्युलोकां ॥
तुझी कथा देत अच्युतपदासी । न विचारीं मानसीं याति कांहीं ॥
नाहीं चतुराई बोबडे हे बोल । संतोषे विठ्ठल नामा म्हणे ॥७४॥
गोकुळा येवोनी भेटे नंदादिकां । वैकुंठनायका सांगतसे ॥
कंसानें मांडिला अधर्म बहुत । मारावें त्वरित तयालागीं ॥
लावोनियां आग आपण विझविली । तेचि परी केली नारदानें ॥
सांगोनियां ऐसें विणा सांवरोन । निघाला तेथून नामा म्हणे ॥७५॥
खांद्यावरी पांवा कस्तुरीचा टिळा । चालत गोपाळ गाईमागें ॥
यमुने पावलीं गोपा पाचारीत । सिदोऱ्या शोभत पाठीवरी ॥
अंतीं पंक्ति करी त्या गोपाळांच्या । संगें गोविंद त्यांच्या अखंडित ॥
नामा म्हणे बोनें त्रिटों देऊं नका । वैकुंठनायका सांभाळावें ॥७६॥

---

## श्रीकृष्णमाहात्म्य.

### बाळक्रीडा.
(नामदेव)

चक्रवाक पक्षी वियोगें बाहाती । झालें मजप्रती तैसें आतां ॥
चुकलिया माय बाळकें रडती । झालें मजप्रती तैसें आतां ॥
वत्स न देखतां गाई हुंबरती । झालें मजप्रती तैसें आतां ॥
जीवनावेगळे मत्स्य तळमळती । झालें मजप्रती तैसें आतां ॥
नामा म्हणे मज ऐसें वाटे चित्तीं । करीतसे खंती फार तुझी ७७
मांडीवरी घेत यशोदा सुंदरी । आळवी श्रीहरि नाना युक्ती ॥
तूंचि माझा बाप तूं माझी माउली । तूं माझी बहिणुली कान्होबाई
गणगोत माझें तूंचि माझा सखा । संसार लटिका तुजवीण ॥
तूंचि माझा धनी तूंची माझें जीवन । चुंबीत वदन वेळोवेळां ॥
नामा म्हणे भार वाढी मांडीवरी । ठेवी भूमीवरी कृष्णजीला ७८

कपाळीं कपाळ लावी चुंबी रडे । आक्रंदोनी पडे पृथ्वीवरी ॥
आवडीचें चिन्ह सांगवेना वाचें । जाणावें जयांचें त्यांचें त्यांनीं ॥
मानेवरी मान टाकूनि राहिली । वाचाही खुंटली बोलवेना ॥
आम्ही तुजविण न राहूं क्षणभरी । उदास न करी चित्त आतां ॥
नामा म्हणे मृगजन्म त्यांचा खरा । लक्षितां विचारा ज्ञानी बहू ७९
पट्टाची मी राणी वडील मानाची । जे गति मृगाची तेचि मज ॥
आईन सांगातें न सोडीं संगती । निश्चय हा चित्तीं दृढ केला ॥
तुझीं बाळें घरीं कष्टती क्षुधेनें । जाई वेगीं स्तनें पान देई ॥
बाळांकडे जाई पाहें कंठीं काळ । न करीं उतावीळ मन आतां ॥
नामा म्हणे ऐसें संवादले फार । तिघांचें अंतर एकविध ॥ ११८० ॥

( तुकाराम ).

अग्निकुंडामाजी घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥
पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी सर्वाठायीं ॥
अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हांक मारी ॥
तुका ह्मणे अग्नि जाहाला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ८१ ॥

---

## पंढरीमाहात्म्य.

( निळोबा ).

नारद येऊनि पंढरियेसी । स्थळ पुंडलिकासी सांगती ॥
भीमा पुष्पावती संगम । योजिला आश्रम तयाप्रती ॥
विष्णुपदें उमटलीं जेथें । करविला तेथें रहिवास ॥
निळा ह्मणे पिंडदान । करिती सज्जन जे स्थळीं ॥ ८२ ॥

भुक्तिमुक्तीचें माहेर । वसविलें पंढरपुर ॥
सुख विश्रांतीसी आलें । संतां पाचारिलें सज्जनां ॥
कथा कीर्तनें सोहळा । छबिने मेळा पताकांचा ॥
निळा ह्मणे पंचक्रोशी । नामें घोषीं दुमदुमित ॥ ८३ ॥

पंढरिये केला वास । निज भक्तांस तारावया ॥
म्हणे यारे अवघे वर्ण । आदि ब्राह्मण करूनिया ॥
जया वैकुंठासी जाणें । तया पेणें हें पंढरी ॥
निळा ह्मणे सुकाळ केला । भक्तां वोळला कुवासा ॥ ८४ ॥

( नामदेव ).

देव गुज सांगे पंढरीसी यारे । प्रेमें चित्तीं ध्यारे नाम माझें ॥
काया वाचा मन दृढ धरा जीवीं । सर्व मी चालवीं भार त्यांचा ॥
भवसिंधु तारीन ध्यारे माझी भाक । साक्ष पुंडलिक करूनि बोलें ॥
कटके जरी असे नामयासी पुसा । आहे त्या भरंवसा नामीं माझ्या ८५
वाघाचिया गळां बांधलीसे गाय । तैसी तूंगे माय लोभापर ॥
तैसें मज संसारीं घालीसील खेवां । कैसें तुझ्या जीवा गोड वाटे ॥
विषाचें गरळ पाजिसी केवळ । हृदय कोमळ कैसें तुझें ॥
नामा म्हणे मज आदीअंतीं एकू । जननी आणि जनकू पांडुरंग ८६

सोय सोडिली घराची । जोडी केली विठ्ठलाची ॥
मायबापासी टाकिलें । ध्यान देवाचें लागलें ॥
स्त्री पुत्र बंधु बहीणी । केली सर्वांची सांडणी ॥
गणगोत इष्टमित्र । सर्व जोडिलें विठ्ठलपात्र ॥
गोणाई म्हणे नामा । भली केली बारे सीमा ॥ ८७ ॥

ज्यातें ध्यानीं ध्याती योगी । तो मज येतो भेटीलागीं ॥
तया रामासी विन्मुख होणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥
व्रतें तपें ज्या साधिती । तो मज नित्य ध्यातो चित्तीं ॥
जो अगम्य वेदपुराणां । तो मज येतो समरंगणा ॥
नामया स्वामीच्या दर्शनें । मग कैंचि भवबंधनें ॥ ८८ ॥

( तुकाराम ).

जननी हे म्हणे आह्मा काय जाळें । शरीर रक्षिलें काय काजें ॥
काय काज जालो हरिविण जिणें । नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥

हें दुःख न सरे हरि न भेटे तों । त्यामार्गेचि जातों एका वेळे ॥
एकवेळ जरी देखतें मी आतां । तरी जीवापरता न करितें ॥
करितां हे मात हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका म्हणे ॥८९॥
कृष्णाचिया सुखें भूक नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ॥
कळलेंचि नाहीं झाले किती दिस । बाहेरील वास विसरली ॥
विसर कामाचा तुका म्हणे जाला । उद्वेग राहिला जावें यावें ॥९०॥

## किरकोळ.

### झोंप.

(एकनाथ)

उठाजी मायबाप कशी लागली झोंप ।
हुजूर जाऊनियां येवढी चुकवा खेप ॥ ध्रु० ॥
रात्रंदिवस तुम्ही सावध असा ।
तुमच्या नगरीचा आह्मां नाहीं भरंवसा ।
उजेड पडतां गळा पडेल फांसा ॥
तुमची नांदणूक आम्हां दिसेना बरी ।
तुमच्या शेजारीं हो एक मूळ वाद करी ॥
हिंडतां देशांतरीं लक्ष चौऱ्याशीं जागा ।
अजून आठवेना आला मूळच्या मार्गा ।
आमच्या बोलण्याचा तुह्मां येईल राग ॥
मागल्या ठेवण्याचा कांहीं ऐवज काढा ।
त्याचे सत्तेनें आम्हीं बोलूं घडघडा ।
एका जनार्दनीं धरा बळकट मेढा ॥ ९१ ॥

### भटीण.

(एकनाथ).

अगे ऐके भटणी । कां बोलसी चावटणी ॥
जन्मांतर पाळिलें म्हणोनी । उपकार फेडिसी ॥

काय बोललीस वो । अवघा सारा फोल ॥
अंगीं नाहीं भक्तीची ओल । भटणी तुझ्या ॥
कामक्रोधें माजली । विषयानें भुलली ॥
गुरुकृपा नाहीं जाली । भटणी तुजला ॥
अहंकार सोडूनी देई । सद्गुरूसी शरण जाई ॥
भक्तिसुखें तूं राहीं । हो भटणी ॥
भट बोलला बोली । भटणीची अहंता गेली ॥
भटणी ती स्थिर झाली । एका जनार्दनाचे पायीं ॥ ९१ ॥

वासुदेव.

( ज्ञानदेव ).

बाबा ममतानिशी अहंकार दाट । रामनामें वासुदेवीं वाट ।
गुरुकृपें वोळलें वैकुंठ । तेणें वासुदेवो दिसे प्रगट गा ॥
वासुदेवा हरि वासुदेवा । रामकृष्ण हरि वासुदेवा ॥ ध्रु० ॥
आला पुंडलिक भक्तराज । तेणें केशव बोलला सहज ।
दिधलें विठ्ठलमंत्र बीज । तेणें सर्व काज गा ॥
रामकृष्णवासुदेवें । वैष्णव गाताती आघवें ।
दिंडी टाळ प्रेमभावें । वासुदेवीं मन सामावे गा ॥
शांति क्षमा दया पुरी । वासुदेवो घरोघरीं ।
आनंदे ओसंडेल अंबरीं । प्रेमें डुले त्रिपुरारी गा ॥
वासुदेवीं ज्ञेय ज्ञान । ध्यानीं मनीं नारायण ।
वासुदेवो परिपूर्ण । कैसें धरलेसें चैतन्य गा ॥
वासुदेवीं वाहुनि टाळी । पातकें गेलीं अंतराळीं ।
वासुदेवो वनमाळी । कीर्तन करूं मेळीं गा ॥
ज्ञानदेवा वासुदेवीं । प्रीति पान्हा वजळी दिवी ।
टाळ धिपळी करूनि जिवीं । ध्यान महादेवीं गा ॥ ९२ ॥

मन चित्त धू । विषयावरी थू ॥
एक नाम मांडी । दुजा भाव सांडी ॥
हरि आला रंगीं । सज्जनाचे संगीं ॥
सकळ पाहे हरी । तोचि चित्तीं धरी ॥
नमन ललाटीं । संसारेसि साटीं ॥
वाम दक्षिण । चहूं भुजीं आलिंगन ॥
ज्ञानदेवा गोडी । केली संसारा फुगडी ॥ ९४ ॥
पावया लुब्ध झाल्या पाबळा । गाई परे वळारे कान्हो ॥
विसरल्या चार विसरल्या पार । तल्लीन साचार कृष्णमूर्ति ॥ध्रु०॥
पाणिया निघाल्या गाई चरती कळंबाठाई । हाकितसे लवलाही सर्वगाई
ज्ञानदेवीं गाई हाकितु पावे सोई । हरिनाम दोही सत्राविये ११९५

## चोवीस नामांचा महिमा.

( नामदेव ).

येई तूं गोविंदे नामामृत धारी । सित्य हें उच्चारी गोविंदातें ॥
गोविंद सित्य झालि छंद । पावे तूं हृदय आत्मिरूपें ॥
गोविंद ही ध्यानें निवती अष्टांगें । गोविंदे गे वेगें वेष धरूं ॥
गोविंद गोपाळ मुकुंद केशरी । येई तूं लवकरी सांवळिये ॥
गोविंद हें नाम जतीं वनीं दिसे । प्रत्यक्ष तें ठसे पंढरीसी ॥
वेणूनादीं काला गोविंदें पैं केला । धांवतचि आला पैंयापाशीं ॥
ती हीच वो माय उभी बाळमूर्ती । नाम जे जपती पांडुरंग ॥
नामा म्हणे पांग गोविंद हा दवडी । वेगें लवडसवडी करीं माये ९६

## पुंडलिक-भक्तिसामर्थ्य.

(निळोबा).

आराधिला पुंडलिकें । जननी पुजूनियां जनकें ॥
त्याच्या भावासी भुलला । भेटी धांवोनियां आला ॥
सहस्र सोळा परिवारेंसीं । वस्ति केली तयापाशीं ॥
निळा म्हणे पाचारिले । देवसमुदाय आणिले ॥ ९७ ॥
भक्त देखोनियां श्रीहरी । केला करीं वास पुढें ॥
म्हणे नवजें येथूनियां । युगें गेलिया कल्पकोटी ॥
प्रसन्न झाले निजभक्तासी । म्हणती मुक्तीसी वांटीन येथें ॥
निळा म्हणे कृपावंत । राहिले तिष्ठत मग उभे ॥ ९८ ॥
संतसनकादिक देव । भेटावया आले सर्व ॥
देवा भक्तातें पूजिती । महिमा अद्भुत तो वर्णिती ॥
पावन केली पुंडलिकें । म्हणती नरनारी बाळकें ॥
निळा ऐकोनियां वाणी । मिठी घालूं धांवे चरणीं ॥ ९९ ॥

### भूपाळ्या.

(तुकाराम)

माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं ॥
धरोनियां बाहीं । भव तारीं दातारा ॥
चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी ॥
मुगुट सकळां मणि । धन्य तूंचि विठोबा ॥
करीं तिमिराचा नाश । दीप होऊनि प्रकाश ॥
तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥
पाहें गुंतलों नेणतां । तुज असो माझी चिंता ॥
तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥ १२०० ॥
हें सांगतां तुम्हां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहारचि न करी ॥
परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान हे घडी पुरों देत नाहीं ॥

काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं । पोटा आलों तईंपासूनियां समर्थ ॥
तुका ह्मणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणादुसरियापासुनी

## आशीर्वाद.

(तुकाराम)

आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥
कल्याण ते असें क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥
भक्तिभाग्य गांठीं धन । त्या नमन जीवासी ॥
तुका म्हणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ २ ॥
तयासाठीं वेंचूं वाणी । आइकों कानीं वारता ॥
क्षेम माझे हरिभजन । समाधान पुसतां त्यां ॥
परत्रींचे जे सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥
तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें सर्वा तीं ॥ ३ ॥
असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥
सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥
विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥
आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ४ ॥

## प्रार्थना व शेजआरती.

(तुकाराम).

आपण शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं ।
लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥
देई गे विठाबाई प्रेमभातुकें ।
अवघियां कवतुकें लहानां थोरां सकळां ॥
असो नसो भाव आलों तुझिया ठाया ।
पाहे कृपादृष्टी आतां पंढरीराया ॥
तुका म्हणे आम्ही तुझीं वेडीं वांकुडीं ।
नासें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ १२०५ ॥

## उत्तराधिपदें.

( तुकाराम )

राम कहे त्याके पग हूं लागूं । देखत कपट अभिमान दुरौभागूं ॥
अधिक याती कुलहीन नहिं जानूं । जाने नारायन सो प्रानी मानूं ॥
कहे तुकां जीव तन डारूं वारी । राम उपासिहुं बलियारी ॥ ६ ॥

ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥
इतने गीते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥
अंतरजामी जानत साचा । मनका एक उपर बाचा ॥
तुकाप्रसु देसबिदेस । भरिया खाली नहिं लेस ॥ ७ ॥

मेरे रामको नाम जो लेवे बारोंबार ।
त्या के पाऊं मेरें तनकी पैजार ॥
हांसत खेलत चालत बाट ।
खाना खाते सोते खाट ॥
जातनसु मुजे कछु नहिं प्यार ।
असतेक नाहिं हिंदु भेद चमार ॥
ज्याका चित लगा मेरे रामको नाम ।
कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव ॥ ८ ॥

क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछूं दास तुम्हारा ॥
तनजोबनकी कोन बराई । व्याधपीडादिस काटहि खाई ॥
कीर्त गाऊं तो नाम न मेरा । काहे झुटा पछताऊं फेरा ॥
कहे तुका नाहिं समजत बात । तुम्हारे शरन है जोडत हात ॥ ९ ॥

बारबार काहे मरत अभागी । बहुरी मरन संकपा तोरे भागी ॥
ये हि तन करते क्या ना होय । भजन भगति करे वैकुंठे जाय ॥
रामनाम मोल नहिं बेचे कवरि । वो हि सब माया छुरावत सारी ॥
कहे तुका मनसुं मिल राखो । रामरस जिव्हा नित चाखो ॥ १० ॥

### ललित.

(तुकाराम).

पुरविली आळी। जे जे केले ते ते काळीं ॥
माय तरी ऐसी सांगा। कृपाळुवा पांडुरंगा ॥
घेतलें तुतरी। उचलोनी कडियेवरी ॥
तुका म्हणे घांस। मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ११ ॥
कथेची सामग्री। देह अवसानावरी ॥
नको जाऊं देऊं भंगा। गात्रें माझी पांडुरंगा ॥
आयुष्य करीं उणें। परि मज आवडो कीर्तन ॥
तुका म्हणे हाणी। या वेगळी मना नाणीं ॥ १२ ॥
पतित पतित। परि मी त्रिवाचा पतित ॥
परि तूं आपुलिया सत्ता। मज करावें सरता ॥
नाहीं चित्तशुद्धि। स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥
अपराधाचा केलों। तुका म्हणे किती बोलों ॥ १३ ॥
जाली होती काया। बहु मळिन देवराया ॥
तुमच्या उजळली नामें। चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥
अनुतापें झाला झाडा। प्रारब्धाचा केला तोडा ॥
तुका म्हणे देह पायीं। ठेवूनि झालों उतराई ॥ १४ ॥

---

### कृष्णाचे बाळपणांतील खेळ.

#### गोरसाची चोरी.

(तुकाराम).

याल तर या रे लागें। अवघे माझ्या मागें मागें ॥
आजी देतों पोटभरी। पुरे म्हणाल तोंवरी ॥
हळूहळू चला। कोणी कोणाशीं न बोला ॥
तुका म्हणे सांडा घाटे। तेणें नका भरूं पोटें ॥ १२१५ ॥

अवघेंचि गोड जालें । मागीलये भरी आलें ॥
साह्य झाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥
थडिये पावतां तो वाव । मागें वाहावतां ठाव ॥
तुका म्हणे गेलें । स्वप्नींचें जागीं जालें ॥ १६ ॥
बहु बरा बहु बरा । यासांगातें मिळे चारा ॥
म्हणोनी जीवें साटीं । घेतली कान्होबाची पाठी ॥
बरवा बरवा दिसे । समागम याचा निमिषें ॥
पुढती पुढती तुका । सोंकला सोंकवितो लोकां ॥ १७ ॥
तुझिये संगती । जाली आमुची निश्चिंती ॥
नाहीं देखिलें तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥
घरीं ताकाचें सरोवर । येथें नवनीताचे पूर ॥
तुका म्हणे आतां । आम्ही न वजों दवडितां ॥ १८ ॥
कामें पीडिलों माया । बहु मारी नाहीं दया ॥
तुझ्या राहिलों आधारें । जालें अवघेंचि बरें ॥
तुझे लागलों संगती । आतां येतों काकुळती ॥
तुका म्हणे तुझ्या मिषा । कान्होबा हे गोळी पीडा ॥ १९ ॥

---

## विरहणी.

(एकनाथ).

कसा मला टाकुनी गेला राम ॥ ध्रु० ॥
रामाविण जीव व्याकुळ होतो । सुचत नाहीं काम ॥
रामाविण मज चैन पडेना । नाहीं जिवासी आराम ॥
एकाजनार्दनीं पाहुनि डोळा । स्वरूप सुंदर घनःश्याम ॥ १२२० ॥
काम क्रोध वैरी हे खळ । लोभ अहंकार आशा बरळ ॥
सर्व बळीवंत लागले सबळ । तेणें बांधिलें आमुचें निखळ ॥
नको नको वियोग हरी । येई येई तूं लवकरी ।

[illegible]

विरहाचें दुःख फिटलें । धन्य झालें संसारीं ॥
विरह गेला सुख झालें वो माय ॥
पुढतोपुढती आनंद न समाय ॥ ध्रु० ॥
संतसंग घडला धन्य आजी । मोह ममता तुटली माझी ॥
भ्रांति फिटोनी गेली सहजीं । विरह गेला सुख झालें आजी ॥
धन्य संतसंगती । अवघी झाली विश्रांती ॥
एकाजनार्दनीं चित्तीं । विरह भ्रांती निरसली वो ॥ २२ ॥

(मुक्ताबाई).

अमृत टाकून कांजीची आवडी । साजेना झोंपडी काय त्याला ॥
वरासी अखंड गंगेचें स्नान । गेलें वांयावीण जिणें त्याचें ॥
पोंवळ्याहून अधिक दिसती रानगुंजा । शृंगाराच्या काजा विटंबिल्या
आनारा परिस चोखट इंद्रावन । चवी कडुपण हीन त्याचें ॥
रंगाचीं बाहुलीं दिसती साजिरीं । वेगळेचे वरी नग त्यालीं ॥
म्हणे मुक्ताबाई पुरे तें दर्शन । गुरुवीण संतपण आहे कोठें ॥ २३ ॥

(नामदेव).

आला तो सोपान वंदियेलें त्या पायीं । पांडुरंगा ठायीं मानियेला ॥
रंजल्यागांजल्याचा घेतला समाचार । संतमाय थोर अनाथाची ॥
आमचीं मायबापें भेटलींत आज । समाधान सहज आलिंगितां ॥
नामा म्हणे मज कळलें याचें प्रेम । देवें केले श्रम काय गुणें ॥ २४ ॥
तूं माझा स्वामी मी तुझा रंक । पाहतां न दिसे वेगळिक ॥
मी तूं पण जाऊंदे दुरी । एकचि घोंगडें पांघरूं हरी ॥
रखुमादेविवरा विठलराया । लागेन मी पायां वेळोवेळां ॥ २५ ॥





अंबुला विकुनी पवित्र झाली । पोटींचीं बाळें कौतुकीं मारिलीं ॥
पापा वेगळी मी जाले वो नारी । विठ्ठला घरीं नांदतसे ॥
आशा तृष्णा नणंदा मारिल्या । शेजारीं राहविल्या संतसंगें ॥
बापरखुमादेविवर विठ्ठल भोगिला । मज पै लाधला गुणेविण २६

## फकिर.

( एकनाथ ).

आशा टाकुनी फकीर जाला । परी भिक्षा मागणें जन्म गेला ॥
तैशी नोहे परमार्थ रहाटी । शुद्ध मन करीजे पोटीं ॥
सर्वांगभूतीं नांदे एक देव । वाउगा कां वाढाया अहंभाव ॥
जे जे प्राणी स्तुति केली । ती ती देवासी पावली ॥
ऐसा धरी दृढ भाव । एका जनार्दनीं मागे ठाव ॥ २७ ॥

## बुद्धिरूपी सखीशीं संवाद.

( ज्ञानदेव )

सखी सांगे सार शांति क्षमा दया । प्रपंच विलया जाळ पोशी ॥
सखी ह्मणे एका दुजी ह्मणे अनेका । अनेकीं सिमयका गुरुगम्य ॥
सावध निबंध आध्याचा उफल । रसनेचा पाळव रसना तोयें ॥
ज्ञानदेव सांगे रखुमादेवी जप । अगम्य संकल्प एक दिसे ॥ २८ ॥

## सौरी.

( एकनाथ )

तंतुपट जैसी एकत्व दिसती । तैसी भगवद्भक्ति सर्वांभूती ॥
सर्वांसी व्यापक विठ्ठल दिसावा । म्हणोनी त्याच्या पायीं मन धावे ॥
एका जनार्दनीं व्यापक विठ्ठल । तेथें साहीं बोल आन दुजा ॥ २९ ॥

## श्रीज्ञानदेवमहाराजांच्या भेटीविषयीं श्रीनामदेवाची आळ.

(नामदेव)

ज्ञानदेव माझें सौख्य सरोवर। त्यांत जलचर स्वस्थ होतों ॥
दुर्दैव तापानें आटलें तें नीर। वर्षी रघुवीर कृपामेघ ॥
ज्ञानदेवावीण व्याकूळ हे प्राण। तूं जगज्जीवन देवा होसी ॥
विठाबाई तूंरे जाणसी ना जाण। रक्षीं मज कोण दुजें येथें १२३०

देई भक्ति रस प्रेमा। देवा घाली आज्ञा जन्मा ॥
प्रेम येई हातां जरी। जेथें नादूं ती पंढरी ॥
ज्ञानदेवीं भेट व्हावी। ज्ञान गोष्ट कां सांगावी ॥
नामा न बुझावा जनीं। कोण नाचेल कीर्तनीं ॥
पुरावा नामयाच्या आर्ता। देवा सांगे जगन्माता ॥ ३१ ॥
देव कळवळले चित्तीं। त्यासी मायेची संमती ॥
मायबापांचा त्या लळा। नामा घेईना कां आळा ॥
बाप जगताचा स्वामी। आई प्रत्यक्ष लक्षुमी ॥
नामा थोरांचें लेंकरूं। छंद त्याचा अनिवारु ॥
छंद नाम्याचा पुरविण्या। देव वेची प्रेमनाण्या ॥
हाटी उदमी भावीक। विठुराजा त्या ग्राहिक ॥ ३२ ॥

तिघा जनांलागीं केलें समाधान। सांगितली खूण अंतरींची ॥
कळियुगीं जग आल्याली करिती। साहावेना कीं यांसी कांहीं केल्या
पापी उद्धरिले पतीत तारिले। जड पावविले मोक्षपंथीं ॥
नामा म्हणे यांचे करितां समाधान। कळलें अंतःकरण मन यांचें ३३
निसंगासीं संग नलगे आणिकाचा। परमार्थ हा साचा गहन केला
जड या जीवाचें हरविलें अज्ञान। नेलें उतरून भवसिंधु ॥
ज्ञानियासी केली सिंधुसंजीवनी। झालें जनीं वनीं एक तारूं ॥
नामा म्हणे सत्य बा माझ्याचें बोलणें। करीं निबलोण पदीं त्याचे ३४

## विनवणी.

( सांवतामाळी )

ऐकावे विठ्ठल धुरे । विनंती माझी हो सत्वरें ॥
करी संसाराची बोहरी । इतुकें मागतों श्रीहरी ॥
कष्ट करितां जन्म गेला । तुझा विसर पडला ॥
माळी सांवता मागे संतान । देवा करीगा निःसंतान ॥ २५ ॥

कां गा रुसलासी कृपाळू बा हरी । तुजविण दुसरी भक्ती नेणें ॥
दीन रंक पापी हीन माझी मती । सांभाळा श्रीपती अनाथनाथा ॥
आशा मोह माया लागलीसे पाठीं काळ क्रोध दृष्टी पाहतसे ॥
सांवता म्हणे देवा नका ठेऊं येथें । उचलोनी अनंते नेई वेगीं ॥ २६ ॥

भली केली हीन याति । नाहीं वाढली महंती ॥
जरी असतां ब्राह्मण जन्म । तरी हें अंगीं लागतें कर्म ॥
स्नान नाहीं संध्या नाहीं । याति कुळ संबंध नाहीं ॥
सांवता म्हणे हीन याती । कृपा करावी श्रीपती ॥ २७ ॥

नामाचिया बळें न भिऊं सर्वथा ।
कळिकाळाच्या माथा सोटे मारूं ॥
वैकुंठीचा देव आणूं या कीर्तनीं ।
विठ्ठल गाऊनी नाचों रंगीं ॥
सुखाचा सोहळा करूनी दिवाळी ।
प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ॥
सांवता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा ।
तेणें भक्तिद्वारा वोळंगतो ॥ २८ ॥

( चोखामेळा )

ऊस डोंगा परी रस नोव्हे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥
कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥
नदी डोंगी परि जळ नोहें डोंगें । काय भुललासी वरलिया रंगा ॥
चोखा डोंगा परी विठ्ठल नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥ २९

नकाजी मोकलूं चक्रपाणी दुणेदारा ॥
जोडूनियां कर चोखा विनवितो देवा ।
बोलिला उत्तरीं परी राग नसावा ॥ १२४० ॥

हीन याती माझी देवा । कैसी घडेल तुझी सेवा ॥
मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्यारीती ॥
माझा लागतांची कर । सितोडा घेताती करार ॥
माझ्या गोविंदा गोपाळा । करुणा भाकी चोखा मेळा ४१

( गोरा कुंभार )

ब्रह्ममूर्ती संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जनां ॥
ब्रह्मादिक ज्याची वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संत कृपें त्वरित उद्धरती ॥
अखंडित गोरा त्यांची वास पाहे । निशिदिनीं ध्याये संत संगा ४२

केशवाचें ध्यान धरोनि अंतरीं । मृत्तिकेमाझारीं नाचतसे ॥
विठ्ठलाचें नाम स्मरे वेळोवेळ । नेत्रीं वाहे जळ सद्गदीता ॥
कुलालाचें वंशीं जन्मलें शरीर । तो गोरा कुंभार हरीभक्त ॥४३॥

( नामदेव )

ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जनां ॥
ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी । नाम घे वदनीं दोष जाती ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो ॥
अखंडित नामा त्याचा वास पाहे । निशिदिनीं ध्याय सत्संगती ४४





आशा नाहीं ज्याला । दैव कां मारी तयाला ॥
जेव्हां सुखाचि उन्नती । मोह पायांसी लागती ॥
सर्वां चित्तीं समभाव । सर्व मानी वासुदेव ॥
नामा म्हणे अंगीं प्रेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ ४५ ॥
सत्त्वसमाधानि कर्मनिष्ठ जाण । अखंडित ध्यान रामकृष्ण ॥
सत्संग सर्वदा साक्ष सर्व देहीं । सर्वांभूतीं पाहीं अंशमात्रें ॥
आपणासमान सर्वत्र पाहाती । अन्य सर्वांभूतीं रामाविष्णु ॥
नामा म्हणे ऐसें सकळिकें संमत । नामीं सर्वोचित भक्तिमार्ग ॥४६
धन्य नरदेहीं संतसंग करी । त्रैलोक्य उद्धरी हेळामात्रें ॥
नेणें सुख दुःख शरीराचें भान । अखंड भजन केशवाचें ॥
कर्म करूनियां होय शुचिष्मंत । नामामृतीं प्रीत सर्वकाळ ॥
नामा म्हणे ऐसें वर्ते देहभावीं । मूढजनां दावी भक्तिमार्ग ॥४७॥
संतसंगतीचें काय सांगूं सुख । आपणपारिखें नाहीं तेथें ॥
साधु थोर जाणा साधु थोर जाणा । साधु थोर जाणा कळियुगीं ॥
मृत्युलोकीं तोचि सर्वांभूतीं सम । शरीराचा भ्रम नेणें कदा ॥
नामा म्हणे गाय दूध एक सरे । साधु निरंतर वर्ते तैसा ॥ ४८ ॥
वासनेविरहित होवोनी एकवट । असावें निकट संतसंगें ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । करावें दास्यत्व हरिभक्तांचें ॥
नामा म्हणे केशवा तरीच शरणागत । नाहीं तरी पतित म्हणा मातें ४९

( एकनाथ ).

अर्पूनियां देवा भावाचे मोदक । भावें विनायक पूजा करूं ॥
दैविलें राजसुख हरलें जन्मदुःख । गेली तहानभूक मायाजाळ ॥
चित्त दूर्वांदळ अर्पूनी चरणीं । गेलें हारपूनी कायावाचामन ॥
एका जनार्दनीं विकट विनायक । स्मरणेंचि पातक नाशीतसे ॥ ५०
ओंकारसार कथा सारदेवता । अक्षरीं अक्षरता वदवी स्वयें ॥
जय जाणे जय सारखे । जय जाणे निजसार जें । निजरूप ध्रु०

भलाई करते बुराई होती तोबी भलाई करना ।
बाळ बालकी झडती यारो आंग आंगसे देना ॥ ध्रु० ॥
एक पलंगपर दो बैठे एक जागा एक सोया ।
अनुहातकी नौवत बाजे चोर कहांसे आया ॥
शहर म्याने तेजी छुटा कसबू हो पुकार ।
दस दरवाजे बंद रहे तब निकल गये अस्वार ॥
मा कहेती मेरा मेरा बाप कहे तेरा ।
कहत कबीरा सुन भाई साधू नहीं घर तेरा मेरा ॥ ५२ ॥

वोही राम पछानोजी । मेरा कहना मानोजी ॥ ध्रु० ॥
परनारीकू पंढ बना है परनिंदाकू बहिरा ।
परधन देखत अंधा हुवा जब आपका जग सारा ॥
सदा रहत उदासी निंदा स्तुती न जाने कोई ।
ये धेनु ये बाघ न जाने सब आत्मा है भाई ॥
भेद नहीं अभेद हुवा मन राम भया जग सारा ।
कहत कबीरा सुन भय साधु जगमों रहकर न्यारा ॥ ५३ ॥

इस तन धनकी कौन बढाई । देखत नयनोमें मट्टी मिलाई ॥ ध्रु०॥
अपने खातर मेहेल बनाया । आपही जाकर जंगल सोया ॥
हाड जले जैसे लकरीकी मोळी । बाल जले जैसी घास की पोळी ॥
कहत कबीरा सुन मेरे गुनिया । आप मुवे पिछे डुबगई दुनिया ५४

तनका नहीं भरोसा बे देखे काल तमासा बे ॥ ध्रु० ॥
बडे राजमों साज बिराजे मत जानो सुख भेला ।







कौन किसीका नहीं रे यारो आखर जात अकेला ॥
चोप चापके पगरी बांधी बालम पेच सवाई ॥
मुच्छा मुरोडकर दरपन देखे ढाल फिरंग करमाही ॥
शाल दुशाला पट्टु ओढे खावे गरम मसाला ।
जब आवेगा जमका फांसा होवे गरदी हल्ला ॥
कहत कबीरा सुनभाई साधु मारग सीधा सवारा ।
नजर खोलकर देखो यारो ये सब झूट पसारा ॥ ५५ ॥

सुनसुन हो भया हो भया । मालदार मैं पाया ॥ ध्रु० ॥
लिया रामनाम का भाला । काम क्रोध मार डाला ॥ सु० ॥
राम नामका घोडा । ये तो तीन लोकमें बडा ॥
त्रिगुण शिखर पर जाना । वहां नाम रामका जपना ॥
कहत कबीरा सुनरे प्यारा । चुका ले जनममरनका फेरा ॥ ५६ ॥

साहेबसे लगनिया लगीहो ॥ साहेब० ॥ ध्रु० ॥
जबसे कृपा किनी सतगुरु सामी । काम क्रोध मद त्यागी हो ॥सा०
बेहद काढ कीनी गुरु मुक्ता । देव लोक सब त्यागी हो ॥ साहेब०
कहत कबीर सुनो भाई साधो । कसबे भये बैरागी हो ॥सा० ५७

हरी भजनकूं सानरे मतकर मोह तूं रे ॥ ध्रु० ॥
नयन दिये दरसन करनेकूं । स्रवण दिये सुन ग्यान रे ॥
चरन दिये तीरथ करनेकूं । हात दिये कर दान रे ॥
कहत कबीरा सुनभाई साधु । कांचन निपजत खान रे ५८

खेती करो हरि नामकी मनवा खेती करो हरि नामकी ॥ ध्रु० ॥
पइसा न लागे रुपिया न लागे कवडी न लागे फुटकी ॥
मनके बैल सुरत पोहावे दास लगाऊं गुरु ग्यानकी ॥
कहत कबीरा सुन भाई साधु भक्ति करो हरिहरकी ॥ ५९ ॥

राम भजनकूं दिया कमलमुख राम भजनकूं दिया ॥ ध्रु० ॥
लख चौऱ्यांशी फेरे फिरकर सुंदर नरतनु पाया ॥

खाया पिया सुखसे सोया नाहक जमाना खोया ॥
जो मुख निशिदिनीं रामनाम नहीं । वहां तुम कछुं नहीं किया ॥
कहत कबीरा सुनभाई साधु । आया वैसाही गया ॥ १२६० ॥

तेरा अच्छा बी होयगा । तेरा भला बी होयगा ॥ ध्रु० ॥
गुरुनाथकी सेवा करले भूखेंकू कुछ देना ।
साहेब घरका हिसाब थारो जमाबंदिसे रखना ॥
इस दुनियामें भलि भलाई करसे बावा आपनी ।
दुर्जनका संग मत कर यारो दुनिया बडी तुफानी ॥
कहत कबीरा सुनभाई साधु बोले दिलसे बाता ।
रामनाम तुं भजले प्यारे वोही सबका दाता ॥ ६१ ॥

हरि बोलो भाई हरी बोलो भाई । हरी ना बोले वांकूं राम दुन्हाई ॥
काहेकू पढता खिन खिन गीता । हरिनाम लिया सो सब कुच होता ॥
मेरा मेरा कर कर क्या फल पाया । हरीके भजन बिन झूट गमाया ॥
कहत कबीर हरिगुन गाना । गावत नाचत वैकुंठ जाना ॥ ६२ ॥

हम बिगरे तो बिगरे भाई । तुम बिगरी तो राम दुन्हाई ॥ ध्रु० ॥
गंगाके संग सरिता बिगरी । ओ सरिता गंगा हो निबरी ॥
पारसके संग लोहा बिगरा । ओ लोहा कांचन हो निबरा ॥
चंदनके संग तरवर बिगरा । ओ तरवर चंदन हो निबरा ॥
संतनके संग कबिरा बिगरा । ओ कबिरा रामही हो निबरा ॥ ६३ ॥

सफेत कलंदर फकीर । बावा सफेत कलंदर फकीर ॥ ध्रु० ॥
काम क्रोध मद मत्सर टाको । उन्मनी ज्या घर बठो ॥
मारो आसन बैठो त्रिकुटपर । करतारकी जिकरी ॥
अंदर भगवा कियोरी बावा । जोग जुगूत भरपाई ॥
खुदाके नामपर लगन लगाई । चुकी कमलपर लखिर ॥
ऐसी फकीरकी थोरी बावा जो । सकुल सब तारी ॥
कहत कबीरा सुनभय साधु । सिताराम गुरु प्यारी ॥ ६४ ॥

चलो जावोजी कदर नही जानीरे ॥ ध्रु० ॥
छोटासा कुवा थोडासा पाणी । उसमे डुब रह्या अभिमानी ॥
मंदिर जाकर फत्तर पूजत है । तीरथ जा पूजो पानी ॥
कहत कबीरा सुन भाई साधु । जीन्ने जानी उन्ने मानी ॥ ६५ ॥

कायकू देह धरोरे अभागी ॥ काय० ॥ ध्रु० ॥
इस सुख भया इस सुख पायो । निज क्यौं बिसरोरे ॥
अभागी काय० ॥ शामसुंदरकी सेवा चूकी । उपजत क्यौं
न मरोरे ॥ अभागी काय० ॥ कहत कबीरा सुन भाई
साधु । नहीं तों नरकीं परोरे ॥ ६६ ॥

कोई कछु मन लागा ॥ ध्रु० ॥
दिलबी लागा मनबी लागा । जो वा मन गले धागारे ॥
साचा दिलसू साहेब राजी । झूठा सामान भागा ॥
हंसाकी चाल तो हंसाही जाने । और क्या जाने कागा ॥
कहत कबीर सुनो भाई साधु । भाग वंदी वा जागा ॥ ६७ ॥

मत कैव करता हासी । दिवाने साहेब राखो खुसी ॥
मुसक देखकर बिली दवडी । कुदी मारकर फसी ॥
सान भाव पंथ देख कर । शीर मुंडोल कसी ॥
कहत कबीर सुन भाई साधु आपने दिलकी खुसी ॥ ६८ ॥

भजोरे भया राम गोविंद हरी ॥ ध्रु० ॥
जप तप साधन । कछु नहीं लागत । खरचत नहीं गठरी ॥
संतत संपत सुखके कारन । ज्यासे भूल परी ॥
कहत कबीर ज्या मुख राम नहीं । वो मुख धूल परी ॥ ६९ ॥

## हिंदुस्थानी पदें.

(नामदेव)

हम तो भुले ठाकुर जाने । तुम क्यौं भाई झूट दिवाने ॥
नाला अपआप सागर हुवा । काहेके कारण रोता है कुवा ॥
चंदनके साती निंब हुवा चंदन । क्यौं कर रोवे देखो एहिंगन ॥
गुरु के मेहेरसे नामा भये साधु । देखत रोने लगे जन हे भोंदू १ ॥ ७० ॥
सांप कुच छोडे विख नही छांडे । उडुक भाहे जेसे बकध्यान मांडे ॥
काहेको किजे ध्यान जपना । जबते सुध नही मन अपना ॥
सिंघ अच भोजन जो नर जाने । ऐसेही फल देव बखाने ॥
नामेके स्वामी लाहूके झगडा । राम रसायन पिवो दे रगडा ॥ ७१ ॥
मैं अपराधी बाप मैं अपराधी । साचिली तुम्हारी भक्ति न साधी ॥
घणो अग्यान अगीना भंगी । कीय काम कुसगा संगी ॥
यहू अग्यान इही वरी घाटो । निखर कमाई नछट नाटो ॥
कीया दान गोष्पद सब जाने । पैटा परबस मेर प्रवाने ॥
सरसीर दोष नरायन नामीं । ऐसा बबक हमरा स्वामी ॥
नरक निवार नरहरी नामा । कीलेमे कसराह दिवाना ॥ ७२ ॥
कैसें तीरत बहु कुटील भयो । कली कह चीहन देसी नहीं नडीयो ॥
कैसी सेवा कैसें ध्यान । जैसे उजल बग उनमान ॥
भाव सुजंग भणयो हारी । सुरतीसी बाणा सती सजारी ॥
नामदेव भणे बहु इही गुणी बाध्य । डाइणी प्रभ सकल राजर बाध्य ७३

दास अनंत मेरो निजरूप ।
दर्शन निमष तापत्रय मोचन परसन मुक्त करत ग्रहे कूप ॥
मेरी बांधी भक्त छुडावे बांधे भक्त न छुटे मोहें ।
एक समय मोको ग्रहे बांधे तो फिर मुपे जबाब न होये ॥
मै गुणबंद सकलकी जीवन मेरी जीवन मेरे दास ।
नामदेव जाके जी ऐसी तैसो ताको प्रेम प्रगास ॥ ७४ ॥

## याचना.

( तुकाराम )

तूंचि अनाथाचा दाता । दुःख मोह नासावया चिंता ॥
शरण आलों तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥
संतसंगति देईं चरणसेवा । जेणें तुझा विसर न पडावा ॥
हाच भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥
मज भाव प्रेम देईं कीर्ति । गुण नाम वर्णावया स्तुति ॥
विघ्नां सोडवूनि हातीं । विनंति माझी परिसावी हे ॥
आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धनें ॥
सांकड न पडे तुज जेणें । तुजें भक्तीविण मायबापा ॥
जोडोनियां कर पायीं ठेवीं माथा । तुका विनवी पंढरीनाथा ॥
रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवीं देवा मनोरथा ॥ ७५ ॥

हातींचें न संडावें देवें । शरण आलों जीवेंभावें ॥
आपुलें ऐसें म्हणावें । करितों जीवें निंबलोण ॥
बैसतां संतांचे संगतीं । कळों आलें कमळापती ॥
आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ जाला ॥
यती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड ॥
कलिष्ठ रुचि ठेवूनि गोड । देखत नाड कळतसे ॥
भरती भेटी येणों किती । तोचि लाभ तयाचे संगतीं ॥
म्हणोनि येतों काकुळती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥
सुखें निंदोत हे जन । न करीं तयांशीं वचन ॥
आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे ते ॥
आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित ॥
तरी मी तसाचि पतित । तुका म्हणे मज संत हांसती ॥ १२७६ ॥
कोण सुख धरोनी संसारीं । राहों सांग मज वा हरी ॥
अवघ्या नाशिवंता परी । थिता दुरी तूंही अंतरसी ॥
प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास ॥
कुंभ ओतिलें नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥

बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा ॥
वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरे मागुता जन्म धरी ॥
क्षण एक तोही नाहीं विसांवा । लक्ष चौऱ्यांशीं घेतल्या धांवा ॥
भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥
आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनी राहेन द्वारीं ॥
तुझा दास मी दीन कामारी । तुका म्हणे करीं कृपा आतां ॥७७॥
ऐका पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत ॥
आम्हां जरी तारील संचित । तरी उचित काय तुझें ॥
उसनें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन ॥
काय गा मिरवूनी भूषण । वांयां थोरपण जनांमध्यें ॥
अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान ॥
उपकार तरी धनमंत्रीपणें । जरी देणें घेणें नाहीं आशा ॥
शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशीं घालूनी राखे दीना ॥
पार पुण्या नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥
आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसी तरीच सही ॥
वचन आपुलें सिद्धी नेई । तुका म्हणे तई मज कळसी ॥ ७८ ॥
आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरी तारीं मारीं ॥
जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥
शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें ॥
मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहुनी ॥
मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती ॥
सकळ खुंटलिया युक्ति । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥
सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव ॥
आतां करीं कळे तो उपाय । तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥
राहिलों धरूनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास ॥
आणीक नेणें मी सायास । तुका म्हणे यास तुझें उचित ॥ ७९ ॥

(एकनाथ).

गोमटें नागरकटी धरुनी कर । उभा तो सुकुमार वैकुंठींचा ॥
रूपाचें रूपस पाहतां सावकाश । धणी धाय मानस तया पाहतां ॥
आठवे कल्पना मनाचीया मना । बुद्धि ते चरणा विनटली ॥
एका जनार्दनीं इंद्रियांची चाली । सर्व हारपली पंढरी पाहतां ८०

ठेवणें अनंत जन्मांचें । सांपडलें आजी साचें ॥
पुंडलीकें तें पोखलें । जगा उपकार केले ॥
महा पातकी चांडाळ । मुक्त होय दरुशनें खळ ॥
पाहतां भीवरेचे तटीं । पाप पळतें बारा वाटीं ॥
एका जनार्दनीं निश्चय । वेदादिकां हा आश्रय ॥ १२८१ ॥

वाचें विठ्ठल बोलावें । मग पाऊल टाकावें ॥
ऐसा ज्याचा नेम धर्म । मुखीं विठ्ठलाचें नाम ॥
सर्व काळ वाचें । विठ्ठल नाम वदती साचें ॥
कुळधर्म आमुचा । म्हणे एका जनार्दनाचा ॥ ८२ ॥

अर्जुनाचे रथीं असला जगजेठी । म्हणोनी कर ठेउनी कटीं उभा येथें
धरुनी गोवर्धन उभा सप्त दिन । म्हणोनी कर जघन ठेउनी उभा ॥
कंसादि मल्ल मारी जरासंध । ते चरणारविंद उभे विटे ॥
धर्माघरीं उच्छिष्टपात्रें काढीकरें । म्हणोनी श्रमें निर्धारें ठेविले कटीं कर
पुंडलीक भक्त देखोनी तल्लीन झाला । एकाजनार्दनीं ठेविला कटीं कर

तापत्रयें तापलिया पंढरीसी यावें । दरुशनें मुक्त व्हावें हेळामात्रें ॥
दुःखाची विश्रांति सुखाचा आनंद । पाहतां चिदानंद विठ्ठल देव ॥
संसारीं तापले त्रितापें आहाळले । विश्रांतीये आले पंढरीसी ॥
सर्वांचें माहेर भाविकांचें घर । उभा विटेवर स्वयमेव ॥ ८४ ॥

१—ह्या ठिकाणीं " सर्वांचें माहेर भाविकांचें घर । एका जनार्दनीं देव । उभा विटेवर स्वयमेव ॥ " असे चरण आहेत. एकनाथाच्या अभंगांतील शेवटीं " जनार्दनीं " असें येत असतें त्याप्रमाणें येथें नसल्यामुळें " एका जनार्दनीं देव " हा तिसरा चरण घुसडून दिला आहे, त्याचा येथें विशेष उपयोग नाहीं.

तारावया भोळे भक्त । कृपावंत पंढरीनाथ ॥
करुनी मीस पुंडलीकाचें । उभा युगाचि विटेवर दिसे ॥
ऐसा भक्तासी भुलला । तारावया उभा ठेला ॥
जनीं जनार्दन । शरण एका जनार्दन ॥ १२८५ ॥
विषयीं जो लंपट । तया नावडे ही वाट ॥
पंढरी सुभट । नावडेचि पापिष्ठा ॥
अमृत फळें पूर्ण आलीं । कागा जैसी परी झाली ॥
तैसीच हे चाली । पापिष्ठाची जाणावी ॥
धनलुब्धका नावडे धर्म । मद्यपिया नावडे कर्म ॥
जारासी संतसमागम । नाठवेचि सर्वथा ॥
स्त्रीलुब्ध परद्वारीं । काय तया गीता निर्धारीं ॥
एका जनार्दनीं हरी । नको संग तयाचा ॥ ८६ ॥

प्रेमळ प्रेमळ अंतरीं प्रेमळ । नाहीं काळ वेळ तयालागीं ॥
प्रेमभावें गाय विठ्ठलचि ध्याय । मग सुखा उणें काय संसारीं या ॥
जनार्दनाचा एका रंगला चरणीं । निजरंगीं रंगोनी मिळोनि गेला ८७

कमळ नेत्र पाहतां मन माझें भुललें ।
योगी ध्याती जया तें रूप पंढरीये आलें ॥
आनंदु वो परमानंदु ध्यातां ।
समाधि उन्मनी वोवाळणी तत्वतां ॥
योग याग तप नलगे आचरण कांहीं ।
सुलभ सोपारा वसे सर्वां ठाई ॥
वेद शास्त्र श्रमले पुराणें भांडती ।
शेषादिकां न कळे कुंठित मती ॥
एका जनार्दनीं पाहतां आनंदे मन ।
तद्रूपचि झालें जनीं सर्व जनार्दन ॥ ८८ ॥

मोकळा मार्ग पंढरीचा । नाहीं साधन करणें साचा ॥
योग अभ्यासाचा । श्रमचि नको ॥

जाय जाय पंढरपुरा । पाहे दीनांचा सोयरा ॥
पुंडलीकें थारा । दिधला जया आवडी ॥
तेथें करितां वसती । नाहीं तया पुनरावृत्ती ॥
जन्म मृत्यूची खंती । न करी कांहीं ॥
पावन तीर्थ महीवरी । समान या नाहीं दुसरी ॥
एका जनार्दनीं निर्धारीं । प्रेमें वारी करिती ॥ ८९ ॥

ऐसे संत भार । ऐसें भीमातीर ॥
ऐसा जयजयकार । सांगा कोठें ॥
समुद्रवलयांकित । तीर्थें असती पावन ॥
परी ऐसें महिमान । नाहीं कोठें ॥
ऐसा नामघोष आनंद सोहळा ।
न देखें आणिके स्थळां माझे नेत्रीं ॥
एका जनार्दनीं पंढरीवांचुनी ॥
आनंद माझे मनीं नाहीं कोठें ॥ १२९० ॥

भाविकासी नित्य नवें हें सोपारें । पंढरी उच्चार करितां वाचे ॥
हो कां अनामिक अथवा शुद्र वर्ण । ज्ञातीसी कारण नाहीं देवा ॥
एका जनार्दनीं भलती ज्ञाती असो । परी पांडुरंग वसो हृदयामाजी ॥

## स्वाभिमाय.

(तुकाराम)

बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोइरा करीं आतां ॥
करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ॥
सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥
पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पहावें विटेवरी ॥
विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ १२९२ ॥

नव्हे आराणूक परि मनीं चाड । होईल तो साह्य पांडुरंग ॥
पंढरीसी जावें उद्देश मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥
नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन जाओं नको ॥
तुका म्हणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणें याजसाठीं ॥

सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगा सारिकें तें ॥
नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥
चंद्रभागे स्नान विधि तो हरिकथा । समाधान चित्ता सर्वकाळ ॥
तुका म्हणे काला वैकुंठी दुर्लभ । विशेष तो लाभ संतसंग १२९४

वैकुंठीचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥
धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥
पितृसेवापुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥
अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पांहुणा वैकुंठींचा ॥
धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याति । तुका म्हणे मुक्ति पायीं लोळे

धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वास भाग्य तया ॥
ब्रह्मज्ञान तेथें असें घरोघरीं । धन्य त्या नरनारी चतुर्भुज ॥
नाहीं पापा रिघ काळाचें जीवन । हरिनामकीर्तन घरोघरीं ॥
तुका म्हणे तींहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित जीव ॥

जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥
हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें ॥
भवसिंधु सुखें । उतरी कासे लावूनि ॥
थोर भक्तांची आस । पाहे भोंवताली वास ॥
तुका म्हणे कृपादानीं । फेडी आवडीची धणी ॥ ९७ ॥

आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥
नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ॥
आघात निवारी । छाया पीतांबरें करी ॥
उभा कर कटीं । तुका म्हणे याजसाठीं ॥ ९८ ॥

जाली हरिकथा रंग ओरसला । उचितासी आला पांडुरंग ॥
वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धणीवरि ॥
प्रेम देऊनियां अवघी सुखी केलीं । जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥
तुकें हें कुशळ देखियेलें संतीं । म्हणउनि पुढती आणियेलें ॥ ९९ ॥

---

## पाखंडखंडन.

(तुकाराम)

अमूर्तासि मूर्त म्हणती । झाला गेला मूढ मानिती ॥
जो शून्याचाहि साक्षी । सर्वोत्तम सर्वलक्षी ॥
ज्याच्या तेजें सूर्य जाण । चंद्र अग्नि प्रकाश मान ॥
सर्वनियंता देव । स्वयंप्रकाश स्वयमेव ॥
जो भोगवी अदृष्टा । ज्ञान अज्ञानाचा द्रष्टा ॥
सर्व करूनि अकर्ता । सर्वत्रहि ज्याचि सत्ता ॥
जो शस्त्रांसें तुटेना । विद्युत्-अग्निनें जळेना ॥
जो हृदयीं ज्ञानघन । सर्वजीवांचें जीवन ॥
ऐसा चेतन निराकार । त्यासी कल्पिती आकार ॥
परिपूर्ण अविनाश । त्यासी मानिती विनाश ॥
अव्यक्तासि व्यक्ती । मानुनि करी स्थूलभक्ती ॥
तेचि मूढमति नर । व्यर्थ जन्मले पामर ॥
त्यांचे धर्मादिक व्यर्थ । नेणें सूक्ष्म पुरुषार्थ ॥
त्यांचें निष्फळ शब्दज्ञान । नेणती देवाचें महिमान ॥
आत्मज्ञान विरसलें । तुका म्हणे वाया गेले ॥ १२०० ॥
तीर्थी धोंडा पाणी । त्याला देव म्हणती प्राणी ॥
भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥
देव हृदयांत उघड । सांडुनि बाहेर धांवे मूढ ॥
मृगनाभींत कस्तुरी । मृग धांवे वनांतरीं ॥
ज्याने देहासि निर्मिलें । जीव त्यातें विसरले ॥
ज्याच्या सत्तेनें वर्तती । मूढ त्यातें न जाणती ॥
जैसें गर्भीच जन्मली । आपुल्या मातेला नेणती ॥
तैसें नेणूनि चेतन । पूजी दगड अचेतन ॥
त्याला शाहिले बोधिती । त्याच्या मुखें हात पोळिती ॥

ज्याचा शौचकूप घडविती । त्याला देव ठरविती ॥
पूजा उपचार अर्पिती । अत्यादरें नमस्कारिती ॥
परी तो ऐके बोले न पाहे । मूढ त्यासी मानीताहे ॥
सर्वभूत व्यक्ती । मध्यें चैतन्याची शक्ती ॥
माता पिता आचार्य अतिथी । गुरू सचेतन मूर्ती ॥
त्याला शरण तूं जासी । तरीच कल्याण पावसी ॥
जें अलक्ष लक्षविती । पूर्णब्रह्म सहज स्थिती ॥
त्यातें न भजती मूढ । व्यर्थ पूजिती दगड ॥
देह मी पदार्थ माझे । मानी स्त्रीपुत्रादि वोझे ॥
ऐशा जीवा कृपण म्हणे । खर वृषभ जाणणें ॥
त्यांनीं जें जें केलें । कर्म धर्म वाया गेलें ॥
ऐसे कपिलमुनि सांगत । तृतीयस्कंधीं मातेप्रत ॥
आणि अंधतम नर्की जाती । ऐसी बोले वेदश्रुती ॥
विद्वांसो हि देवा । त्याची कोणी न करी सेवा ॥
ज्याच्या वचनें जोडे ज्ञान । त्याला न भजे अज्ञान ॥
जड पूजुनि जड जाले । व्यर्थ जन्मुनिया मेले ॥
परी त्या हृदयस्थां नेणती । अजागल मूढमती ॥
जेणें अघटीत घडाविलें । पिंडब्रह्मांड रचिलें ॥
रेतबिंदू जो चेतवी । त्याला कोणीहि नाठवी ॥
केला बिंदूचा प्रकार । त्याला न करी नमस्कार ॥
नाना चमत्कार । करूनि असे निर्विकार ॥
अनंत विद्या शक्ती कळा । ज्यानें निर्मिल्या सोज्ज्वळा ॥
जैसे करी जोजो जीव । तैसे भोगवी न करी कीव ॥
सर्व सत्ता ज्याच्या हातीं । त्याला कोणी न पाहाती ॥
ज्याच्या सत्ताबळें । प्राण सर्वांचाहि चळे ॥
सूर्य चंद्र पवन पाणी । ज्याची आज्ञा शिरसा मानी ॥

आज्ञा मानुनिया शिरीं । मृत्यु वेळेवरी संहरी ॥
ज्याच्या सत्तें वृक्षवेली । फळतसे वेळचे वेळीं ॥
केवळ सत्तामात्रें जाण । केले सर्व रंग निर्माण ॥
अनेक वर्ण ठसे । केले हातावीण कसे ॥
पंचभूतिं सहज वैर । असूनि केले निर्वैर ॥
ज्याचा अंत नाहीं पार । पूर्णब्रह्म अपरंपार ॥
जो सर्वांचा आधार । स्वयें असे निराधार ॥
जो निर्गुण निरंजन । भक्तजनमनरंजन ॥
जो दुष्टांसि दंडन । करी पाखंडखंडन ॥
जो चिदानंदघन । अज अव्यय सनातन ॥
ज्याचें आश्चर्य वर्णिलें । जेथें वेद मौनावले ॥
ऐसा देव हृदयकमळीं । असोनि न जाणें जवळीं ॥
तो मेला अथवा गेला । ह्मणोनि धोंडा मांडियेला ॥
त्याची प्रतिष्ठा करिती । जैसे मढें शृंगारिती ॥
त्यांत प्राण नाहीं आले । अवघें विटंबन जालें ॥
त्याचे नेत्र उंदिर नेती । वस्त्र छेदुनि मग मुतती ॥
मांजर नैवेद्यहि खाती । परी तो उघडी नेत्रपाती ॥
ऐसियातें देव म्हणे । सत्य चैतन्यातें नेणें ॥
नरदेहीं चेतन नेणें । तरी काय पशूपक्षी जाणें ॥
तें तो सहज अज्ञान । हे तो पढतमूर्ख जाण ॥
जाणें तानमान कळा । विद्या चौदाहि सकळा ॥
परी आत्मज्ञानावीण । सर्व निरर्थक शीण ॥
वेदशास्त्र पढियेले । कांहीं सार्थक न केलें ॥
तुका म्हणे स्वहित मुकले । निज वस्तू जे चुकले ॥१२०१॥
मूढ जन अज्ञान । त्यासी सकळें आत्मज्ञान ॥
तया असत्कर्मी प्रीति । ज्ञानी वैसोनि सांगती ॥

तेचि जाणावे चांडाळ । पापरूपी महाखळ ॥
कृपाळू म्हणावे ते केवी । अंधा आडमार्गी लावी ॥
त्यासी दंडी यमधर्म । जे करविती अधर्म ॥
सत्य उपदेश जो करी । तोचि गुरू चराचरीं ॥
म्हणोनि शुद्धमार्ग दावा । तुका विनवी पंडितबावा॥१३०२॥

माता पिता देव आणीक स्वजन । पती गुरू जन जरी जाले ॥
परी ते सेवका सोडविना गजरी । अत्मज्ञान अंतरीं देऊनिया ॥
तरी ते प्राणिया पूजावया योग्य । नव्हेचि अयोग्य जाणा शत्रू ॥
दुर्गतीदायक अज्ञानापासूनी । सोडविती जनी पूज्य गुरू ॥
तुका म्हणे प्रेमें धरा त्याचे पाय । जो चुकवी अपाय जन्ममृत्यू ॥

झाड आपल्याचे तोडिती । व्यर्थ सोलें त्या म्हणती ॥
तैसे जड देव । मूढ कल्पिती निर्दैव ॥
देवपणा नसूनि देव म्हणती । भावना विपरीत करिती ॥
अविद्येनें ख्याती केली । बुद्धी पंडिताची गेली ॥
द्रव्य साधावया लीन । धूर्त वेश्या जेवि प्रवीण ॥
तैसे पंडित अर्थ साधिती । मूढजना ठकविती ॥
सत्य उपदेश न करी । घालिती जडाचिये भरी ॥
व्यर्थ पांडित्याभिमान । सोडिना प्राणांतिहि जाणा ॥
परस्पर आंधळे । मार्ग सत्याचा न कळे ॥
पाप आणि गोणी । तुका म्हणे रिती दोन्ही ॥ १३०४ ॥

गर्दभाला गज ह्मणती । रंका राव प्रतिपादीती ॥
तैसा अज्ञानाचा भाव । धातू दगडा ह्मणती देव ॥
ऐसि मूढ जनाचि भक्ती । देव भलत्यास ह्मणती ॥
केळ ह्मणूनि गाजर घेती । ऐसे मूढ मंदमती ॥
तुका ह्मणे अज्ञान जन । नेणें देवाचें लक्षण ॥ १३०५ ॥

देव धातूचे करिती । दारोदार मिरविती ॥
व्यर्थ झळफळ दाविती । घंटागजर लाविती ॥

त्याची हेळना करिती । त्यावर द्रव्य मिळविती ॥
त्याच्या मुसक्याहि बांधिती । रीण फेडूनिया घेती ॥
पोट भरावया भांड । जैसे वाजविती तोंड ॥
तैसा दंभाचार करी । नांही भक्ती अभ्यंतरीं ॥
बंड पाखंड माजविले । जन अनाडी नाडीले ॥
कोणी न करी विचारा । अंध चाले परंपरा ॥
आमचे वडील करीत आले । म्हणोनि आह्मि करितो भले ॥
ऐसे वेदविरुद्ध बोले । मेंढवळनी चाल चाले ॥
आत्मज्ञानावीण । व्यर्थ करीतसे शीण ॥
तुका ह्मणे मूढजन । देव नेणोचि चेतन ॥ १२०६ ॥
देव नयनांत उघडा । मूर्ख पूजिती दगडा ॥
दगडाचे घडविले । लिंग शाळुंकेत बसविले ॥
ऐसे मूढ जीव भूलले । चेतन शक्ती विसरले ॥
जेणें लिंग चेतन केलें । अवघें विश्व निर्मियेलें ॥
त्यासी न जाणीती मूढ । पूजि लिंग भरा दगड ॥
ज्याचे टरफल झडे । मूढ त्याच्या पाया पडे ॥
गोंडे सहानि सुसकुट पाळे । त्याला देवी ह्मणती भळे ॥
त्याचा चमत्कार बोलती । मूढ पामर मंदमती ॥
परी सर्वभूतिं नेणें । कळा एक चेतनपणें ॥
त्याचे सद्गुरू दावी ज्ञान । त्याला न भजें अज्ञान ॥
डोळे विवेकाचे फुटले । तुका ह्मणे व्यर्थ कष्टले ॥ १२०७ ॥

ज्यांचे देव तीर्थ पाणी आणि पाषाण । सद्गुरुदर्शन दुर्लभ त्यां ॥
गुरुभावसेवा मूढासि न घडे । तीं झाली बुडवे अज्ञानांध ॥
सूर्याच्या प्रकाशा तेचि न पाहाती । अंधारीं राहाती अभागी जे ॥
तीर्थोतीर्थी मूढ धावती अज्ञान । गुरुमुखें ज्ञान ऐकेनाची ॥
त्यांचे देव दगड पुजूनि जाले जड । स्वरूप उघड दिसेनाची ॥
ऐसे कृष्ण स्वामी सांगताती जाण । वचन प्रमाण वेदोक्त जे ॥

परी ते अज्ञाना न सांगें सज्ञान । धूर्त ठक जाण पोटभरू ॥
गुरू घरोघरीं जाले ब्रह्मज्ञानी । मांसमदिरापानी चांडाळ ते ॥
आपण बुडाली जगा बुडविती । अधर्मी गोविती भाविकासी ॥
वेदबाह्य लंड बोलती पाखंड । त्यांचे काळे तोंड जगामाजी ॥
धन्य ते सद्गुरु सत्य सांगे ज्ञान । जावो राहो प्राण तुका म्हणे १३०८

उदकमय तीर्थं तीर्थं नव्हे जाण । मृत्तिका पाषाण देव नव्हे ॥
जीव चेतनासी चेतनचि देव । संत स्वयमेव देव खरे ॥
मूढ बाळकासी व्हावयास ज्ञान । चेतनचि जाण पूज्य गुरू ॥
दगडाचा पंतोजी सांगेनाचि ज्ञान । कल्पांतिहि जाण बाळकासी ॥
तैसे या जीवासी ज्ञान पाववया । त्याहुनि श्रेष्ठ तया पाहिजे देव ॥
देव स्वयें जड नेणेचि आपणा । तो जीव चेतना काय तारी ॥
त्यासी तारिता हा सद्गुरु चेतन । परी मूढ जन न भजे तया ॥
गुरुसि त्यागुनी जडासि भजले । तेही न तरले तुका म्हणे १३०९

दगडाचे देव पूर्वी नव्हते जाण । जन हे अज्ञान झालें जेव्हां ॥
तेव्हां कविजनें दगड मांडिले । जनासि नाडिले पोटासाठीं ॥
जन हे अनाडी दगडा मानिले । गुरूसि त्यागिलें मूढपणें ॥
हजारों रुपये नासुनिया जाण । मंदिरीं पाषाण पूजिताती ॥
परी गुरूवीण न पवेचि देवा । करा त्याचि सेवा तुका म्हणे १३१०

अनुतापी सच न्हाय । तीर्थी बुडविती देह ॥
पापकर्म आचरती । तीर्थस्नानें शुद्ध मानिती ॥
सत्य वेदोक्त आचरण । त्यांत न करी अघमर्षण ॥
शोध सत्याचा न करी । पडिले जडाचिये भरी ॥
ऐसे आडरानीं भरले । तुका म्हणे वाया गेले ॥ १३११ ॥

शतगयाश्राद्धे केलीं जरी पाही । तरी मुक्ती नांही प्राणियासी ॥
गयावळ मूर्खलोकासि घेरिती । धन हे हरिती छळूनिया ॥

परी मूढलोक नेणें त्यांचि युक्ती । पितरांची मुक्ती मानीतसे ॥
त्या धूर्तीच्या हातें पाठी थापटाविती । कृतार्थ मानिती आपणासी ॥
देख बेटा तेरे पितर सरग भये । ऐशा वचनीं पाहे विश्वासले ॥
परी ते स्वर्गासी गेले किंवा नाहीं । अनुभव कांहीं न कळे मूढा ॥
काय त्यांनीं मक्ता मुक्तीचा घेतला । कैसे पितराला स्वर्गी धाडी ॥
जैसें ज्याचें पुण्यपाप तें भोगावें । पुत्रानें करावें काय तेथें ॥
परी एकामागें येक ते धावती । व्यर्थचि पावती महाकष्ट ॥
कष्टार्जित द्रव्य दंभानें नाशिलें । आपणा ठकविलें मूढपणें ॥
परी सत्यासत्य नेणेचि मर्मांत । धन्य मी जनांत मान्य जालों ॥
ऐशा मेंढवळें जन हे बुडाले । तेचि चाल चाले ज्ञानावीण ॥
आंधळ्याचे कंठीं लागले अंधळे । घात येकेवेळे मागें पुढें ॥
सत्यक्रियाकर्म परोपकार धर्म । नेणें मुक्ति वर्म तुका म्हणे १२१२

चौवर्ण लक्षण शास्त्रानें कथिलें । जाणुनि वहिलें चित्तीं धरा ॥
ज्या वर्णलक्षणें युक्त जो असेल । त्या वर्णाचा पावेल अधिकार तो ॥
ब्राह्मणाचें चिन्ह अंत्यजा असती । तरी ते पावती ब्राह्मणत्व ॥
ब्राह्मण असूनि चिन्ह अंत्यजाचे । तरी पावे साचें अंत्यजत्व ॥
लक्षणें ब्राह्मण क्षत्रियादि जाण । जाति अप्रमाण शास्त्र बोले ॥
भीडभाड काही शास्त्रासि ते नाहीं । मेंढवळनि पाही त्रास पावे ॥
परी शुभाशुभ न विचारि मनीं । मूढपणें जनीं भांडतसे ॥
शूरपणा नाहीं कैसा तो शिपाई । विचारुनि पाही मनामाजीं ॥
शुद्ध करावया सामर्थ्य आणावें । तरीच म्हणावें क्षत्रिय त्यासी ॥
अथर्वसह वेद ब्रह्म जे जाणती । तेचि ते पावती ब्राह्मणत्व ॥
विद्या ज्ञान गुणें अधिकार पावले । तेचि ब्राह्मणले सर्व जनीं ॥
गुण नसता केवळ जातिमात्रें जाण । न मिळे सन्मान जनामाजीं ॥
पिता जो परीक्षा देउनि ओळखा । त्याच्या मूळ सुखा न पुसे कोणी ॥

ऐसा हा विचार सज्ञान जाणती । अज्ञ मूढा प्रती नेणवेची ॥
चार वर्ण गुण कर्म स्वभावानें । ठरविले शास्त्रानें तुका म्हणे१२१३

शेंदुर लाउनिया धोंडा । पाया पडती पोरें रांडा ॥
त्याच्यापुढें जीव वधिती । विना अपराधे मारिती ॥
सजीव तुळसी तोडिती । निर्जिव दगडा वाहती ॥
बेल तोडूनिया मूढ । लिंग पूजिति दगड ॥
जीव पायाखालीं तुडविती । पिंपळा प्रदक्षिणा घालिती ॥
वृक्ष वडाचा पूजिती । योग्य पती उपेक्षिती ॥
पढिले मेंढवळन । कोणी न करी विवेचन ॥
तुका म्हणे मूढजन । नेणें नित्य सत्यचेतन ॥ १२१४ ॥

देवी खंडोबासि गेला । जीव तेथेहि वधिला ॥
करी कंदोरी येउनी । मारि पशूंच्या दावनी ॥
मांस खाउनि मद्य पिती । नांव देवाचें करिती ॥
रासपूजाहि करिती । जीव मारुनि पोट भरिती ॥
दुष्ट करिती चांडाळकर्म । म्हणती आमुचा कुळधर्म ॥
पाप करूनि पुण्य मानिती । असत्याते सत्य म्हणती ॥
करूनि अधर्म । केला म्हणती स्वधर्म ॥
ऐसे मूढ जीव भुलले । तुका म्हणे मार्ग चूकले ॥ १२१५ ॥

सत्य गेलें मोळ्यावारी । असत्याचि चाले थोरी ॥
यज्ञ करूनिया जाण । घेती पशूचें ते प्राण ॥
उत्तम वर्णांत जन्मले । कर्म कसायाचें केलें ॥
यजमानस्य पशून् पाही । मूढ दिक्षित नेणें कांहीं ॥
अहिंसा परमो धर्म । नेणुनि करिती हिंसाकर्म ॥
यज्ञदिक्षा अवलंबिती । दंभें याज्ञिक म्हणविती ॥

धरूनि जिविकाचा लाग । अग्निहोत्री करिती याग ॥
जैसी वेश्या विकूनि अंग । चालवी संसार तो सांग ॥
तैसे यज्ञाचे निमित्त । केले विषयीं ठेउनि चित्त ॥
वेदशास्त्राचें वचन । नेणें मूढ ब्राह्मणजन ॥
पुढिल्याचा जीव घेती । आपुलें कल्याण इच्छिती ॥
करिती चांडाळकर्म । म्हणती वेदोक्त स्वधर्म ॥
कर्म करूनि नरकाचे । म्हणती भोगूं सुख स्वर्गाचे ॥
आपुले मतीचे पाखंड । करिती अनाचार लंड ॥
स्वयें बुडवुनि बुडविती । जगा अधर्मी गोविती ॥
ऐसें वेदविरुद्ध केलें । तुका म्हणे नरकीं गेले ॥ १३१६ ॥

देवें निर्मियेले । कैसे पदार्थ चांगले ॥
त्याला सांडुनि चांडाळ । भक्षी मांस अमंगळ ॥
वरी मद्यहि सेविती । पुढील नेणें अधोगती ॥
मस्त होउनि डोलती । बोलूं नये बोलती ॥
द्रव्य जाउनि फजिती । जन तोंडावरीं थुंकिती ॥
प्रेतरूप देहस्थिती । मुखीं माशा चोपावती ॥
जिता नर्करूप जाण । नाही जगांत सन्मान ॥
धड प्रपंच ना परमार्थ । हारविला निज स्वार्थ ॥
कष्ट कर्म केलें । तुका म्हणे नर्कीं गेले ॥ १३१७ ॥

आपण बहुत लग्नें करिती । विधवा तैसिच ठेविती ॥
सुख आपण लुटिलें । तिला वंचित ठेविलें ॥
ऐसे प्राणी आणि ब्राह्मण । पक्षपाति स्वार्थी जन ॥
जाले वृद्ध जरी बोचरे । स्त्रियेवीण तच सारे ॥
तरुण विधवा मनांत जळे । आपण छपरपलंगीं लोळे ॥
आपुल्या जीवा इच्छि सुख । देती तरुण विधवे दुःख ॥

चांडाळासी नये कीव । तिचा जाळितसे जीव ॥
तिणें पोट वाढविलें । गुप्त विषय सेविलें ॥
झाडपाला खाऊनि मरे । काम त्यालाहि नावरे ॥
कामदेवाचा हा घाला । काय करील ती अबला ॥
पुढें पोट पाडिलें । दुःख कठीण सोसिलें ॥
तिचें कांहिं न चाले जाण । शेरी जाति दंड निर्वाण ॥
तिणें गुप्त खटपट केली । व्यर्थ जन्मुनी वाया गेली ॥
परी निर्दयासि दया । अंतरीं आली नाहीं माया ॥
तिला गुप्त पाप करविती । आपणा उंच वर्ण म्हणविती ॥
तिचि गमाविली अबरू । कैसे शूरबाहदूर गबरू ॥
ऐसे द्विज भ्रष्ट जाले । तिच्या हातें भोजन केलें ॥
उघड येक पती न करिती । चोरुनि दाहापाच करविती ॥
जालें शास्त्रज्ञ आंधळे । कैसे तयासि न कळे ॥
आपण स्त्रियासहित निजे । विध्वा पतीवीण झिजे ॥
बिन शस्त्रानें मारिती । तिला अग्निवीण जाळिती ॥
आम्हा अधिकार आहे पाही । पुनर्विवाह विध्वे नाहीं ॥
ऐसे मूढ जन बोलती । मोठ्या आनंदें डोलती ॥
कोणाचें न चले कांहिं । सभा जिंकुनि आलो पाही ॥
काय केला पुरुषार्थ । विध्वेवरी धरिलें शस्त्र ॥
अन्यायानें करिती जल्प । विचारि ना पुण्यपाप ॥
पढूनिया जाले मूढ । न कळे वेदार्थ हा गूढ ॥
व्यासादिकें केलें । मूढें नियोग उपेक्षिलें ॥
यासी साक्षी आहे जाण । पहा भारत प्रमाण ॥
आणि कल्माषपाद स्त्रियेला । नियोग वसिष्ठानें केला ॥

ऐशी कथा अनेक आहे । भारत भागवतीं पाहे ॥
मिथ्या अभिमानें बोलसी । मूढा व्यर्थ काय डोलसी ॥
सर्वां नियोग मान्य आहे । डोळे उघडूनी पाहे ॥
वेदोक्त हें कर्म । सर्व मानीताहे धर्म ॥
ऐसे असोनिया अंध । कैसे जाले बुद्धिमंद ॥
पढूनिया मूढ जाले । मेंढवळनि चाल चाले ॥
कर्म कसायाचे करिती । आपणा अहिंसक म्हणविती ॥
ही काय हिंसा नोहे । तरुण विध्वा झुरताहे ॥
समाज जीवकळा । कैसी नकळेचि खळा ॥
सोमयाग करिती । बांधुनि तोंड मेंढा मारिती ॥
तया कैची येईल दया । बोले विध्वा समाज वांया ॥
आम्हा उघड पती न करिती । आपण स्त्रिया मिळविती ॥
औसि मरूनिया मास । जरी जाला नाहीं त्यांस ॥
पुनर्विवाहाचि घाई । कैसी लागलीसे पाही ॥
कलप करूनि मिशादाढि । नटूनि थटूनि वरात काढी ॥
परी विध्वेचि न करी चिंता । मूढ अधम पुरता ॥
ऐसे दुर्जन हे खळ । न करी विध्वेचि कळकळ ॥
तेचि जाणावे पतीत । आपस्वार्थी जे निश्चित ॥
पक्षपात करूनि मेले । तुका म्हणे नर्की गेले ॥ १८ ॥

---

## प्रासंगिक अभंग.

### तुकोबावर सद्गुरुकृपा.

(तुकाराम)

माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे खेपा कांहीं कोठें ॥

जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥
तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥१९॥

आतां नेम जाला । याच कळसीं विठ्ठला ॥
हातीं न धरीं लेखणी । काय भुसकट ते वाणी ॥
जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥
तुका म्हणे घाटी । चाटू कोरडा शेवटीं ॥ १३२० ॥

स्तुति तरी करूं काय कोणापासीं । कीर्ति तरी कैसी वाखाणावी ॥
खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरिवरी ॥
म्हणवावें त्याची खुण नाहीं हातीं । अवकळा फजिती सायकाश ॥
तुका म्हणे हेंगे तुमचें माझें तोंड । होऊनिया लंड आळवितों॥२१॥

सांगा दास नव्हें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनी ॥
कोणासाठीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥
नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटें ॥
तुका म्हणे आम्हां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं तुजविण कांहीं

अनन्यासी ठाव एक सर्वकाजें । एकाविण दुजें नेणे चित्त ॥
न पुसतां आली देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥
लेकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥
तुका म्हणे किती घातली लांवणी । समर्थ होउनी कैवल्यासाठीं २३

नाहीं जों वेचलों जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥
जाणिवलें आतां करीं ये उद्देश । जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥
ठायींचेंचि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ जालें ॥
तुका म्हणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिलें खरें जाल्यावरी ॥ २४ ॥

नाहीं आइकत तुम्ही माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥
ऐसी ते करीन बैसलिया ठाया । तूंचि बुझावया जवळी देवा ॥

करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनी वास ॥
तुका म्हणे आला आज्ञेसी सेवट । होऊनिया नीट पायां पडो २५

रूपें गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चित ॥
तुम्हीं देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥
जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडित होतीं ॥
तुका म्हणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ २६ ॥

---

## धरणेकऱ्यास उपदेश.

(तुकाराम).

गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥
आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥
तुका म्हणे आळी । जैसी सुरेचि वेगळी ॥ २७ ॥

सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतूंपण कामा नये ॥
येईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांडीजेला ॥
खद्योतें दावावी रवी केवीं वाट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥
तुका म्हणे तो ज्ञानाचा सागर । परि सेवी अगर भिजों भेवें ॥२८॥
ज्ञानियांचा राजा गुरु महाराव । म्हणती ज्ञानदेव ऐसें तुम्हां ॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥
ब्रह्मादिक जेथें तुम्हां ओळगणें । इतर तुळणें काय पुरे ॥
तुका म्हणे नेणें युक्तीची ते बोली । म्हणोनि ठेविली पायीं डोई २९

ऐसा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥
जें या मनासी आवरूं । अंत पोटीं वाव धरूं ॥

नाहीं निरोपाची पावली बारता । करावी ते चिंता ऐसी काहीं ॥
तुका म्हणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ २१ ॥

आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥
काय करूं आतां न गमेसें जालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥
घर लागे पाठी चित्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पहावया ॥
तुका म्हणे जीव गेला तरी जाव । धरिला तो देव भाव सिद्धी २२

विकल तेथें विका । माती नांव ठेवूनि बुका ॥
हा तो निवाड्याचा ठाव । खऱ्या खोट्या निवडी भाव ॥
गव्हवारे हा विधि । पोट वाढविलें चिंधी ॥
लावूं जाणे विल्हे । तुका साच आणिक कल्हे ॥ २३ ॥

भोक्ता नारायण लक्षुमीचा पति । ह्मणोनि प्राणाहुती घेतलिया ॥
भर्ता आणि भोक्ता कर्त्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥
विश्वीं विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥
कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका ह्मणे २४

तारतम वरी तोंडाच पुरतें । अंतरा हें येतें अंतरींचें ॥
ऐसी काय बरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्या ऐसें ॥
भोजनांत द्यावें विष कालवूनि । मोहचाळवणी मारावया ॥
तुका ह्मणे मैंद देखों नेदी कुडें । आदरेंचि पुढें सोंग दावी ॥ २५ ॥

कुटुंबाचा केला त्यागा । नाहीं राग जंव गेला ॥
भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चुकेना ॥





अक्षराची केली आटी । जरी पोटीं संत लिंद्य ॥
तुका ह्मणे मागें पाय । तया जाय स्थळासी ॥ ३६ ॥

आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥
यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत ॥
जाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥
अनुतापीं न्हाऊं । तुका ह्मणे रवी पाहूं ॥ ३७ ॥

पुत्राची वारता । शुभ ऐके जेवीं माता ॥
तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥
नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥
तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ३८ ॥

वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळां ॥
तूं माय माउली कृपेची सावली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥
कां वा मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें जालें हृदय तुझें ॥
तुका ह्मणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ३९.

तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगा ॥
लागलीसे आस पाहें तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटें ॥
कामगोड मज न लगे हा धंदा । तुका ह्मणे सदा हेंचि ध्यान ॥ १२४० ॥

धांव घाली आई । आतां पाहातेसी काई ॥
धीर नाहीं माझे पोटीं । जालों वियोगें हिंपुटी ॥
करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥
तुका ह्मणे डोई । कधीं ठेवीन हे पायीं ॥ ४१ ॥

भेटीची आवडी उतावीळ मन । लागलेंसें ध्यान जीवीं जीवा ॥
आतां आवडीचा पुरवावा सोहळा । येउनि गोपाळा क्षेम देईं ॥
नेत्र वरमळिले पाहिलें मारग । गंगा अश्रुपात वहातसी ॥
तुका ह्मणे तुझी करा साचपणा । तुझीच्या वचना आसुगिला ४२.

मी तव बैसलों धरूनियां ध्यास । न करीं उदास पांडुरंगा ॥
नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥
भुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ॥
तुका ह्मणे येऊनियां देई भेटी । कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥४३॥

कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥
तैसें जालें माझ्या जिवा । कधीं भेटसी केशवा ॥
चुकलिया माये । बाळ हुरू हुरू पाहे ॥
जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४४ ॥

कीर्तन ऐकावया भुकले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ॥
वदित हें भाग्य होइल कोणे काळीं । चित्त तळमळी ह्मणकसि ॥
उतावीळ बाह्या भेटिलागीं दंड । लोटांगणीं धड जावयासी ॥
तुका ह्मणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं ॥४५॥

देवा बोलें आतां बोला । त्वां कां धरिला अबोला ॥
भेऊं नको देई भेटी । तूं कां पडिलासी संकटीं ॥
माझ्या जीवींचें मी जाणें । म्हणसी मुक्ती आम्हां देणें ॥
तुका ह्मणे नलगे कांहीं । चित्त राहो तुझे पायीं ॥ ४६ ॥

काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥
काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥
काय तुझें आम्हां करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥
तुका ह्मणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ४७

या रे पांडुरंगा केंव्हां येशी भेटी । जाहालों हिंपुटी तुजवीण ॥
तुजवीण सखें न वदे मज कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥
ओंवाळावी काया चरणांवरोनी । केंव्हां चक्रपाणी भेटशील ॥
तुका ह्मणे माझी पुरवीं आवडी । वेगीं घालीं उडी नारायणा॥४८॥

अपराध जाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥
तुझें लडिवाळ तुज कृपा याची । क्यां वाट पाहावी कवणाची ॥
मायबाप माझा रुक्मादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥
तुका ह्मणे कोणे गोष्टीचें संकट । न घालीं मज भेट नारायणा ॥४९

पहावा नयनीं विठ्ठलचि एक । कांहीं तरी सार्थक संसाराचें ॥
कोठें पाहों तुज कां गा लपालासी । कांहीं बोल मशीं नारायणा ॥
वाटतें उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वांचोनियां ॥
नको ठेवूं मज आपणा वेगळें । बहुत कळवळे तुजलागीं ॥
तुका म्हणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण ॥१२५०॥

॥ संतवचनसुधा समाप्त ॥

# संतवचनसुधेंतील अभंगांची सूचि.

ध.



न.

फ.



ब.

ह



क्ष.



ज्ञ.



॥ सूची समाप्त ॥

अक्षम—अक्षम, पंगु.
अक्षय—अक्षय.
अगुण—निर्गुण, द्वाड, खोडकर.
अंगुलें—अंगठी.
अंगीजणें—अंगीकारणें.
अघोरजप—पिशाचमंत्रजप.
अचूक—नेमकें.
अठरा—अठरा पुराणें.
अठोनीवेठोनी—अडवातिडवा, वेडावाकडा.
अडबंद—करदोटा, कडदोरा.
अडांखा—धोरण, युक्ती, नाका.
अढळ—स्थिर (ढळ—चंचळ, विनाशी).
अत्यंत—अत्यंत अनुपम, पुष्कळ.
अथीलपणा—श्रेष्ठपणा, पहिलेपणा.
अनन्यभाव—एकभक्ति, स्थिरभक्ति.
अनर्गल—निष्प्रतिबंध, स्वच्छंदी
अनाद्य—ज्याच्या पूर्वी कोणीहि उ-त्पन्न झाला नाही, सर्वांच्या आधि उत्पन्न झालेला.
अनामिक—अंत्यज, महार, न्हावी.
अनारिसें—वेगळें, अन्य.
अनु—अन्य, आणिक.
अनुताप—पश्चात्ताप.
अनुहतध्वनि—अविच्छिन्न योगादि धारण करून त्यायोगें जो दाह नादाचा ध्वनि ऐकू येतो तो.
अनाळ—हाल, आपत्ति.
अनोळखा—न ओळखण्यासारखा.

अभुक—भुकरहित स्थिति, तृप्ति.
अभेद्य—भेदभावरहित, नाशरहित.
अरोथा—अपूर्व इच्छा.
अवकळा—तेजोभंग, फजीति, निस्ते-जस्त्व.
अवगणी—सोंग.
अवगणें—ओळखणें.
अवदशा—दुर्दशा, वाईट स्थिति.
अवधी—समाप्ति, मर्यादा.
अवस्वरा—अवसर.
अव्हेरिलें—उपेक्षिलें, सोडून दिलें, दुर्लक्ष केलें.
अयुक्—एक.
अशोभी—अशुभि.
असट—पातळ, पाणचट.
असमाई—असह्य, न मावण्याजोगा.
असुक—असुख, दुःख.
असरया—आश्रया.
असोशी—हांव, उत्कंठा.
अष्टांग—योगाचीं आठ अंगें (यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा आणि समाधी, हीं आठ अंगें).
अहर्निश—अहोरात्र, सतत.
अहिक्य—ऐक्य.

आ.

आइत व आइती—सामग्री, तयारी, सामान, साहित्य.





उजरी—उत्कृष्ट, उत्कर्ष.
उदंडें—पुष्कळ, एकसारखें.
उद्देशी—उद्देशीं.
उद्वेजणें—उगवणें.
उद्वेग—उदासीन, निरपेक्ष.
उधातु—तीन (नंदभाषा).
उन्मन—लीन, निश्चेष्ट, थोर.
उन्मनी—मनाची लीनता होते, अशी पांचवी अवस्था (जागृती, स्वप्न, सुषुप्ति, तुरीया व उन्मनी ह्या मनाच्या पांच अवस्था होत)
उन्मलित—पडलेला.
उन्हवणी—ऊनपाणी.
उपणणें—झडपणें, पाखडणें.
उपरति—पश्चात्ताप.
उपाधि—त्रास, पीडा, कटकट.
उपेग—उपयोग.
उबगा—कंटाळा.
उभारा—स्थिरता.
उमस—अवकाश, उसंत, विस्तार, उद्भव.
उमाणें—उमजणें
उरी—बाकी, ठाव, स्थिती.
उल्लंघ—उल्लंघणें.
उसंतणें—शेवटास नेणें, आटोपणें.
उसाळणें—हर्षविणें.
उसाळी—हर्षवितें.

ऊ.

ऊर्मी—मनाचे तरंग.

ऋ.

ऋणिया—ऋणकरी, देणेदार.

ए.

एकावली—एकेरी हार.
एकीसवा—एकविसावा, एकेठिकाणीं.
एक्याच—उगाच, न बोलतां, स्तब्धपणें

ओ.

ओणवा—वांकलेला.
ओळला—वळला.

औ.

औट—साडेतीन (३॥)
औठडें—औटपीठ, चवथेस्थान. (त्रिकूट, श्रियाट, गोलाट व औटपीठ हीं चार महाकारणस्थानें आहेत.)

क.

कंई—केव्हां.
कंकर—खडा, निसारा.
कडवसा—कडूपणा, कवडासा, प्रतिबिंब.
कडवा—कडू.
कडाविड—सिडुकमिडूक.
कडसणी—विचार.
कडिये—कडेवर.
कणव—करुणा.
कंद—कांदा, मूळ.
कतक सोनें.
कप—कापूस, कापसाप्रमाणें जलद् पेटणारा, दुसरा पदार्थ.
कप्याडें—कड्या.
करमर—शास्त्रविशेष.
करमुर—काळा.
करवडी व करपंडी—पोटाची सांच, अति क्षुधा लागल्यामुळें "करपड वाळली" असें म्हणतात.
कर्णधार—नावाडी.
कर्दळी—केळ.

ख.

खंड—मक्ता, ठराव.
खंती—किळस, कंटाळा, घाण.
खत—व्रण, खवंद, क्षत.
खतेला—खचलेला, भरलेला.
खद्योत—काजवा.
खलेती—जींत पत्रें घालतात ती थैली.
खळ—छंद, नाद, आंगण.
खाई—छाया.
खाण—ठिकाण, स्थान, वस्ती, भक्ष्य, जेवण खाण.
खाणोरा—खादाड.
खातड—खातेरांत राहणारा.
खात—खपून चोरून नेणारा.
खालें—खालीं.
खुडा—अवयव आखडलेला.
खेदी—दुःख देई, दुःखी.
खेपलें—पडलेलें.
खोकर—मोडकळीस आलेलें, फुटकें.
खोडणें—वाईट चाल, खोडी लागणें.
खोडावणें—खोडाविडी होऊन पडणें लुला होणें.
खोळ—[illegible]
खोसा—खिसमसणार.

ग.

गडसंद—अडचण, पेंच, कसोटी.
गदा—आयुधविशेष, हत्यार.
गदारोळ—मोठी गर्जना, पांडित्य, निरूपण.
गभस्ति—सूर्य.
गयनी—निवृत्तीच्या गुरूचें नांव.
गरुडटका—गरुड अग्रभागी असलेला, पताका.
गवांदी—अन्नसत्र, अन्नछत्र.
गव्हांत—पांगळ्याच्या खुंटातील टेंकूण.
गहिला—वेडा.
गळाळा—घोट.
गांजिवा—जाळें पिशवीएवजी.
गाव्याळ—कपटी, आंतल्या गांठीचा.
गांडमणी—गुह्य, गुप्त.
गांडा—दुर्बळ, नपुंसक, गांडू.
गांदणें—मळणें, पीडावणें.
गांवढळ—अडाणी.
गिन्हें—गरीब.
गुज—गुह्य, गुप्तगोष्ट.
गुढार—लमाण, डोंबारी, वैदू.
गुढी—ध्वज, पताका.
गुंत व गुंती—घोटाळा.
गुपणें—गुंतणें, जुळवणें.
गुमान—अभिमान, पर्वा.
गेठा—गळ्यांतील दागिना.
गोजिरें—आवडतें.
गोठी—गोष्टी.
गोत—कुळ, गोत्र वंश.
गोमटें—सुंदर.
गोरवें—गोरवानें
गोरांजन—पुरुष अथवा स्त्री ईश्वरप्राप्त्यर्थ जाळून घेतात त्याला म्हणतात.
गोन्हवाडी—गुराडी.
गोवळ—गवळी, मूत.
गोवा—गोंधळ, घोटाळा.
गोवार—शेणखळा.
गोही—साक्ष, जबानी.
ग्यानगड—ज्ञानाचे गड (किल्ला), ज्ञानभांडार.
ग्वाही—साक्षी जबानी.

घालन—धोका, संकट.
घुमरी—पुष्कळ, ओतप्रोत.
घुसमाडणें—श्वास कोंडणें, कोंडमारा करणें.
घुळी—पोळ, सांड.
घेरें—मोठें, घबाड.
घोंघाणिमा—घामट घायको.

च.

चपे—सांदीस, कोपऱ्यांस.
चपेट—सपाटा, सपाटा, चापटी.
चपेटा— ,, ,, ,,
चराचर—स्थावर (वृक्षादि) जंगम (मनुष्यादि).
चर्मक—चांभार.
चर्या—तऱ्हा, प्रकार.
चाकाटणें—चकित होणें.
चांगा—चांगला, उत्तम, चोख.
चाप—चलाख, चपळ, चंचळ.
चाट—बडबड्या, बहुभाषी.
चाटु—स्वैंपाकाची पळी, सुंदर.
चाड—कथा, किंमत, योग्यता, चाह.
चाम—चामडें, चर्म.
चार—उपचार, सेवक, चार वेद.
चापटी—वाचाळपणा.
चाळक—चाळविणारा, प्रेरक.
चिकरणें—विखरणें, सभोवार विक-लित करणें.
चिंतर्जी—चिंताक्रांत.

शब्द करून ओरडणारा प्राणी.
चुंबळ—चोंबडें, आशाळभूत.
चेटणें—चेतणें, चेष्टा करणें, चेतन-रूपानें व्यापार करणें.
चेडा—चेटक.
चेत—चित्त.
चेपणें—चालू होणें.
चोख—स्वच्छ, निर्दोष, निर्मळ.
चोखट—चोख, चांगला, शुद्ध निर्मळ.
चोजवणें—चकित करणें, मोठ्या उल्हासानें करणें.
चोपडूं—लोणी.
चोहटा—चव्हाटा.
चौ—चार.
चौघाचार—चौघांस न्याय, पंचाईत.
चौवार—चव्हाटा.

छ.

छंद—नाद, चाळा.

ज.

जडीबुटी—मांत्रिक शक्ति, जाड्याबुट्या.
जति—यति अवसान, बौद्धपंथी यति, संन्यासी.
जत्ती—शक्ति, अधिकार, जमा.
जनाचार—लोकरूढी, पंचाईत.
जमान—जामीन.
ज्येष्ठज—ज्येष्ठ (जेष्ठा) जन (जहित), महाजन.

जिव्हार—अंतकरण, बीज, वर्म.
जिणे—वांचणें.
जीवघातें—जीवाचा नाश करून.
जुग—युग.
जुंझार—योद्धा, पराक्रमी.
जुंतणें—जुंपणें.
जुंती—जुंपणी.
जेगट—वाद्यविशेष.
जेठी—पहिलवान्, मल्ल.
जेवा—जेवण.
जोड—संपादणी.
जोडी— ,,
जोतिला—जोडला.
जोहर—अग्नि, आग.
जोहारणें—नमणें, जोहार करणें.
ज्यालेपण—जिवंतपण, जन्म.

झ.

झकणें—अंकित होणें.
झड—झडप.
झणी—झटकन्, लवकर, कदाचित्, नाही तर.
झळई—मृगजळ.
झांसा—दहशत.
झोंटी—केश, शेंडी.

ट.

टकणें—शकणें, करूं शकणें.
टकळा—घोष.
टका—अग्रभाग.
टांचे—टंचाई.
टाहो—घोष, टकळी, आरोळी, आक्रोश.
टेवा—ढब, डौल.
टोंका—माप, कांटा, ताजवा.
टोप—टोपी, शिरस्त्राण, मुकुट.

ठ.

ठकणें—ठकवणें, फसवणें.
ठसा—छाप, शिक्का.
ठाकण—ठिकाणा.
ठाडा—उभा.
ठाणमान—बांधा, रचना, सुरेखपणा.
ठाव—राहण्यास जागा.
ठावें—जागा, ठिकाण, माहीत.
ठेंगा—सोडगा, काठी.
ठेणें—राहणें.
ठोंबरा—करलासुधा धान्य.
ठोंबा—दांडू, टिकोऱ्या.

ड.

डसू—चावण्याकरितां, दंश करण्यास.
डसवणें—चिटकिवणें, एकरूप करणें.
डाई—ढूपी, शहरांत, गोत्यांत.
डाक—एकप्रकारचें वाद्य.
डांग—काठी.
डाय—द्वेष.
डाग—डांग, दोष, तापविलेल्या लोखंडाचा दिलेला डाग.
डिंगर—मूल, लेकरूं.
डिवणें-उपद्रव देणें, मारणें, इजा करणें.

दिढी—दृष्टी.
दिंडी—एक तंतुवाद्य.
दिनकाल—दररोज, प्रतिदिवशी.
दिनांनिशी—अहोरात्र.
दिवसें—कणकेचा एक पदार्थविशेष.
दी—दिवस.
दुचाळा—कातरी, चिमटा, दोन टोंकाचें हत्यार.
दुजिया—दुसऱ्याला.
दुडी—घागर.
दुणवणी—दुप्पट करणें.
दुधाणी—दूध तापविण्याचें भांडें.
दुम—धुम, धाव.
दुमाला—पिछाडी, पाठ.
दुलड—गळ्यांतला दागिना.
दुश्चित—खिन्न.
दुणें—दुप्पट.
देखणा—पाहणारा, पाहण्या लायक.
देखी—देखणें, दृष्टि, अवलोकन.
देखोणा—ज्ञानाचा, विचाराचा.
देखोदेखी—पाहून.
देवळसी—देवपिसा.
देवाईल—देऊळ, देवालय.
देहुडा—देह.
दैवहत—दुर्दैवी.
दो—दोन.
दोंदें—मोठ्या पोटाचा, ढेरपोट्या.
दोम—भिक्षेच्या वेळीं फकिरांचा म्हणण्याचा शब्द.
दोहावा—दूध काढावें, दोहन करावें.
दोरा—एक दागिना, सुताच्या गांठी, कंगण्या वगैरे.

ध.

धगी—धग, आग, उष्णता.
धडफडा—खरा, खरोखरी.
धडफुडी—धड फाडणारी, खरोखरी.
धण—समाधान, तृप्ती, भर, पूर्ति.
धणी—समाधान, आशा.
धंद—सोंग, ढब, ढंग.
धसा—कुदळ, मुसळ.
धाटे—घाटे.
धाणें—तृप्त होणें.
धाय—हंबरडा.
धारण—धुसळखांब, घराचा मुख्य खांब.
धाव—चीक, गूळ.
धिंग—धूम, ओतप्रोत.
धिंद—धिंदवडा.
धिंदधिंद—डांगोरा, दवंडी, जाहिरात, प्रसिद्धि.
धीर—अवकाश, विलंब.
धुडका—धडकी.
धुडवणी—पोकळ, डोलारा, वायफळ.
धुनी—धुणारी, नदी.
धुर—अग्रेसर, मुख्य, धूर.
धूड—पोकळ, अवडंबर.

न.

नंदनु—मुलगा, आनंद देणारा.
नंदुली—नणंद.
नव्हाची—न होण्याची.
नळी—नरडी.
नाकळे—ताब्यांत न येणें, न समजणें.
नागर—रम्य, सुंदर.
नागवणें—लुबाडणें, अनावर होणें.
नागीवा—नागवा, उघडा.

[illegible]

परते—पलीकडे, बाजूला.

परमाई—वीरसू, वीरमाता.

परवडी—चातुर्यानें, एकामागून एक प्रकार.

परवा—परका.

परापवाद—लोकांचा मिथ्या दोष.

परावी—परकी, परक्या.

परावें—परकें.

पराश्रम—दुसऱ्याचा आश्रय

परियेळ—परळ, ताटली, तबक.

पवाडे-वर्णन, पोवाडे स्तुति, गुणकीर्तन.

पसारा—विस्तार, पसरणें.

पहुडणें—पडणें, निजणें, बसणें.

पव्हे—पाणपोई, पाणछत्र.

पाईक—सेवकपणा.

पांकुळणें—शिथिल होणें, विस्कळणें, सैल होणें.

पांस—शुभ्र, स्वच्छ, पंस.

पांसर—कपा, गाय व म्हैस यांची एका बाजूचीं दोन स्तन.

पांग—धणी, आशा, पराधीनता.

पांगणें—पराधीन होणें.

पांगोरा—झाडाच्या मुळ्यांची बारीक मुळें

पाठोवाठी—पाठोपाठ.

पाणपेळ—ओढ्याचें जनावर, ओहोल.

पाडेवार—महार.

पात्र—योग्य, पूज्य.

पाधाणी—अडाणी बायका.

पानसरा—आडवा.

पानेढी—पाताआड, कायदा.

पान्हेरी—पोवई.

पापरी लात.

पावळी—तिरी.

पायरव—वरदळ.

पायरिका—पायरीच्या.

पायवरणी—पायाचें पाणी.

पार—पलीकडे.

पारणी—पारणें. ( उपोषणाच्या दुसरे दिवशीं भोजन करून उपोषण सोडतो तें )

पारावार—अंत.

पारियाचा—पाऱ्याचा ( पारा म्हणून एक धातु आहे. )

पारुषणें—सोडणें, तुच्छ करणें.

पाल्हेवा—सगळ.

पास—पसंत, स्वच्छ.

पाहुनर—पाहुणचार.

पिटणें—दुःख देणें, त्रासणें.

पिटपिट—चिरचिर, टुरटुर.

पिलाणें—पुढेपुढें, धांवणें.

पिशवी—गोमुखी.

पिशुन—चाहाड, दुष्ट.

पुंजाळणें—भक्तीच्या योगें नेत्र तेजस्वी होणें.





रळी—विनोद, थट्टा.
राऊळ—देऊळ, देवालय.
रांडवडा—शिव्यागाळी.
रातणें—रमणें, रिझणें.
राढी—राड, चिखल.
रिघे—जाई, शिरे.
रीस—रोष, क्रोध.
रूपडें—सुंदर रूप.
रेमट—लांबट गोष्ट.

ल.

लचाळ—गचाळ, छेदरा.
लठिकें—खोटें.
लमलाहो—खरी.
लवलाहो— ,, ,, ,,
लवी—लवण, मीठ, बाकणें.
लहणें—रोकड, प्रीति, प्रेम.
लाह—बहुत, पुष्कळ.
लक्षपीक—लाक्षपीक, दशोंती.
लागपाठ—लागाबांधा, लागोपाठ, पाठोपाठ.
लागभाग—लागाबांधा.
लागवडी—गर्भाधानस्थिति, लावणी.
लागवरी— ,, ,, ,,
लागो—लागलेंच.
लाड—मोठें.
लाडणें—लाडावणें.
लाणी—लावणी, मालमत्ता, कापणी.
लाही—मढीव चीप.
लास—डाग.
लासें—डागानें, चिन्हानें.
लाहणें—पावणें, होणें, मिळणें.
लाहे— ,, ,, ,,
लाहा—मोठा, लहू.
लाहाणें—पावणें.
लाहातें—चिरकाळचा लाभ.
लाहो—छंद.
लुगडें—वस्त्र.
लुडा—लुळा.
ले—बहुत, पुष्कळ.
लोकभांड—लोकांत पुष्कळ बोलून भिकेवर पोट भरणारा, लोकांशीं भांडणारा.
लोलिंगत—आसक्त, कंपव.
लोवाळ—पुष्क लोंकरीचा, केसाळ.
ल्हाणें—पावणें.

व.

वक्त्रें—मुखानें.
वंचणें—वगळणें, फसवणें.
वजणें—जाणें.
वर—वार ( प्रसूतीनंतर पडते ती ).
वरवळ—बाह्यरंग, हलवें, तिरस.
वरपडला—स्वाधीन झालेला.
वरळा—कोंड व धान्य यांचें मिश्रण, भूस.
वराक—नीच, दीन हलकट.
वरी—पुष्कळ, वरी ( धान्यविशेष ).
वर्म—महत्त्व, चिलखत, कवच, मर्म.
वल्लभ—स्वामी, पति, मित्र.
वहिली—चांगली.
वहिलें—लवकर, त्वरित.
वक्षस्थळ—छाती.
वा—उघा, वाजविणें.
वाइला—वाजविला.
वाइलें—वाहिलें.
वाकळा—गोदडी.
वाखणें—लखणें.

वोज-स्वच्छता, निर्मलता, चांगुलपणा.
वोनें—चांगलें, स्वच्छ.
वोडवणें--प्राप्त होणें, मिळविणें.
वोढणें --नेसणें. पांघरणें.
वोरस--स्नेहभरित पान्हा.
वोल्हावणें--भिजणें, भारावणें.
वोसंग मांडी.
वोसणणें--बरळणें, बडबडणें.
वोळंगती वळतात, येतात.
वोळणें- वळणें.
वोळंघ--खोटें, मीष, कौतुक.
वोळसा--छंद चटक, व्यसन.
व्याली -आई, प्रसूत झाली.
व्यासी--व्यासकृती.

शा.

शर्त--पाणी, तेज, पराक्रम, शिकस्त.
शमी--शांत करी.
शादी--बहुरूपी.
शास्त--शासन.
शिखा--शेंडी.
शिणसी —कष्टसी, दमसी.
शिराणी—उपभोग, आश्चर्य.
शीक -शिक्षा.
श्वपच-चांडाळ, कुत्रे शिजवून खाणारे.

स.

संगीत--यथास्थित, यथायोग्य, गायनयुक्त
संगीन--,,
संचले--सांठले.
संचीत- नशीब, सांठलेलें.
सठवे—साहावे.
सतंत—स्वतंत्र, स्वेच्छाचारी.
संतसंघट्टणें--संताच्या संगतीनें.
सत्पद—चांगलें स्थान.
सत्रावी—ज्ञानशक्ति.
संदी—कानाकोपरा, अडचण.
संपुष्ट—देव ठेवण्याचें पात्र.
सपश्रुळीत—सुरेख, चांगला.
सपुरता—पूर्ण, समर्थ, सबळ.
संभ्रम -निष्कारण भ्रांती, डौल.
संमोखणें--समजावणें, सांत्वन करणें.
सर—बरोबरी, सारखेपणा.
सरण--चिता.
सरणें—चालणें लागणें, संपणें.
सरवदा--डाकोचा.
सरा--दारू, मद्य, बाजूला व्हा.
सरिसा—सारखा.
सरी--बरोबरी, सारखेपणा.
सरोवरी—आदरातिथ्य.
सर्वांघटीं--सर्वांतर्यामीं.
संवरित—वेष्टित, आच्छादित,
संवसारी--बरोबरी, सारखेपणा.
सवा--कडे, कडून, पक्षीं.
सवाद--वाद, रुचि, आवड.
संहार--नाश.
सहिष्णु--सहनशील.
सहोदर--भाऊ.
सळ—अभिमान, आग्रह, छळ, वैर,
सा--साहा.

साकडे —संकट, अरिष्ट.
सांग--परिपूर्ण, सहा अंगें.
साच--खरें, सत्य, शाश्वत.
साचें - खरें, चांगलें.
साजणी --सखी.
साजिरी- सुंदर.
साटी- बदला, संगत.
साटोवाटी--भरती, बदला.
सांडीमांडी—खटपट.
सांडे- नीच, सांडून जाई.
सांडोवा -कुरवंडी, त्याग.
सांत--सतत, लागोपाठ.
सांद -कानाकोपरा, अडचण.
सादर--तयार.
सादवणें--शब्द करणें.
सादावणें-- ,,
सादृश्य -- सारखें.
सान--लहान.
सावडा--भोळा, भोळसर.
सायाधावा--साह्य मदत.
सामरस्य--समरसत्व, ब्रह्म.
सामा--सामान, माल, सामग्री.
सायास- श्रम.
सायुज्यता--जीवेश्वराचा अभेद दाखविणारी मुक्ति.
सार- बल.
सारणें--गरणें, आटोपणें, सिद्ध करणें.
सारणें --सरशी, बरोबरी.
सालमाड्या—साल अखेर हिशेब घेणारा.
सावया--साह्य करणारा, कैवारी.
सावळ--लुगडें.
सावळें-- ,, ,, ,,

साहे -साह्य, मदत.
सिक--शिक्षा.
सिंचणें —शिंपडणें.
सिंचवणी--शिपडण्याचा पदार्थ.
सितरणें--ठकविणें.
सिदोरी--भाकरी (दहीभात वगैरे खाण्याचे पदार्थ बांधून नेतात.)
सिलें--हत्यारें, शस्त्रें, शिळे.
सीस--डोकें.
सुडका--चिंधी, फाटका.
सुतणें—निजणें, दोऱ्यानें गुंफविणें.
सुनाळी--शोध, पत्ता, थांग.
सुनृतू--एकप्रकारचा खेळ.
सुदा—सुदे, सरळ, चांगला.
सुनाट--शून्यरूप, व्यर्थ.
सुपती -निद्रा, गार्दी, चांगला.
सुभट -- सुरेख, चांगला, विस्तीर्ण योद्धा, पति.
सुरकवडी सुरकुंडीचा खेळ.
सुरवाडिकपणें सुखदायकपणें.
सुराणी—उपभोग, आवड.
सुषुप्ती--गाढ झोप.
सेकीं—शेवटीं, परिणामीं.
सेखी-- ,, ,,
सेंद —एक कडू फळ.
सेल-खेळांतील एक पदार्थ, उत्तम वांटा.
सैर- स्वच्छंद, यथेष्ट.
सोपान —सोपें, जिना.
सोपारें—सोपें.
सोम —सौम्य.
सोमवल—सोमल.
सोर—नातेवाईक, जार, आकांत.

सौरी—चौचाल, निर्लज्ज स्त्री, मुरव्या.
स्वयंभू – साक्षात्, प्रत्यक्ष, स्वतः होऊन आपण उत्पन्न झालेला.
स्वैर—स्वच्छंद, यथेष्ट.

ह.

हत्यारा—हत्या करणारा
हरपली —नाहीशी झाली.
हलरू—गीत गाणें.
हरी—ओळ, रांग, माळ, विष्णु.
हाऊ – बाऊ.
हाक —हक्क.
हाकलणें—हाकून देणें, ओरडणें, हाका मारणें
हाट—बाजार, हट्ट.
हांडोरिया—अज्ञान, अनाडी.
हालतुका—अटकळीचा.
हीतसर—गजरा.
हातसोका—हात सवईचा.
हातोफळी—हातोहाती, तत्काळ.
हायाहाबा—हायहाय.
हाय—अपेक्षा, उत्कंठा, हाव.
हारपती नाश पावती.
हारवळणें—हरपणें, सांडणें,
हारास—ऱ्हास, नाश, क्षय, हानि.
हारिस—हर्ष, आनंद.
हारी—ओळ, रांगा, माळ.

हीनपणा—गरीबपणा.
हुतुतु —एक प्रकारचा खेळ.
हुंदकणें—झाडणें, हुंदका देणें, हिसका देणें
हुबरी— एक प्रकारचा खेळ.
हुरहुर —तळमळ.
हेंकाड-एककल्ली, हट्टी, हेकड, हेकेखोर.
हेंगें—इकडे.
हेंड—पशूचा कळप.
हेंडगा – चिपाडांचा भारा.
हेंदोवणें—हेलकावणें.
हेवा—उत्कट इच्छा, मत्सर.
हेळा—लीळा, क्षण, त्वरित.
होठी--
होड—पैज.

क्ष.

क्षणी—नेम मारणारे, वेळीं, क्षणभर.
क्षर—नाशवंत, अशाश्वत.
क्षरणें—पाझरणें, वाहणें.
क्षरला—नष्ट झाला.
क्षीदक्षीण—हाल, अपेक्षा, दुर्दशा, उदासीन.
क्षीर—अमृत, दूध.
क्षेदक्षीण— दिलगीर, दुःख.
क्षेम—आलिंगन, कुशल.
क्षेत्रपाळ – सर्वांचा राजा, शेताचें रक्षण करणारा.

**संतवचनसुधेंतील कठीण शब्दाचा कोश समाप्त.**



